# माझ्या गोष्टी

## खण्ड पहिला



प्रकाशक :

मॉडर्न बुकडेपो, बुकसेलर्स, आनंदाश्रमासमोर, पुणें.



नटसम्राट्

**श्री० नारायण श्रीपाद राजहंस**

ऊर्फ

**बालगंधर्व**

यांना

त्यांचा अल्पसा सन्मान करण्याच्या

सद्भावनेनें

# समर्पण

**ना. वि. कुलकर्णी**

# प्रस्तावना

रा. नारायणराव कुलकर्णी हे आपल्या अनेक नाटकांच्या व कादंब-च्या द्वारें महाराष्ट्रीय वाचकांच्या परिचयाचे आहेत. इतकेंच काय प्रेमासही पात्र झाले आहेत. अशा स्थितींत त्यांच्या गोष्टींच्या पुस्तव प्रस्तावना लिहिणाराचें काम म्हणजे नूतन परिचय करून देण्याचें व नव्हे हें उघडच आहे. किंबहुना प्रो. फडके, प्रो. पोतदार यांजसार त्यांच्या पूर्वीच्या कांहीं पुस्तकास प्रस्तावना लिहिणारांसही हें काम क लागलें नसेल. तथापि ते व त्यांचें वाङ्मय यांशीं महाराष्ट्रीय वाचका सर्वसामान्य परिचय असला तरी प्रस्तुत नवीन पुस्तकाच्या प्रसंगानें य परिचय करून देण्याचा प्रयत्न अस्थानीं नव्हे इतकेंच नव्हे अवश्यकही आहे.

सर्वसामान्य वाचकांकरितांच प्रत्येक लेखक लिहीत असला तरी वाङ जगतांतील हा बहुजन-समाज व त्यांशीं मानसिक संबंध जोडू पाहण लेखक यांच्या दरम्यान लेखक व टीकाकार यांचा प्रांत लागतो. वस् हे दोन्ही वर्ग लेखकाच्याच जातीचे होत. तरीही किंवा त्यामुळेंच ते ले कास कित्येकदां बहुजनाराधनेच्या मार्गांत आडवे आल्याप्रमाणें बा गोष्टींचा अथवा लघुकथांचाच प्रांत उदाहरणार्थ घेतल्यास इतर गो लेखक व टीका-लेखक यांनीं समाजांत कित्येक अपेक्षा निर्माण केले असतात. आणि सामान्य वाचक देखील नकळत नवीन पुस्तक त्या क वर घासून पाहतो. मराठी वाङ्मयांत गोष्टीसंबंधानें लेखकांनीं अ टीकाकारांनीं-लेखकांच्या व वाचकांच्या वाटाड्यांनीं—काय आक निर्माण केल्या आहेत; स्वतः नारायणराव कुलकर्णी यांचे संबंधांतील विचार त्यांच्या कृतीवरून काय दिसून येतात हें सांगणें । या प्रस्तावनेचा उद्देश आहे.

मराठी वाचकवर्गच काय पण पृथ्वीच्या पाठीवरील कुठलाही वाच वर्ग गोष्टींचा भोक्ता असतो. इतकेंच काय पण कोणत्याही ललित वाङ्म

कडे तो गोष्टींच्या तृषेनेंच पाहतो. नाट्यवाङ्मयाची चर्चा करीत असतां एका ाश्चात्य टीकाकारानें " Tell me a story ! " हीच सामान्य वाचकांची ालिश मागणी असते असें ठरविलें आहे. अशा स्थितींत सांगणारा व ऐक- ारा यांची हातमिळणी करून देणाऱ्या तिसऱ्याची जरूर नसावी. तथापि ्परिनिर्दिष्ट पूर्वापेक्षेमुळें वाचक स्वानंदाच्या बाबतींतही कित्येकदा परा- ीन होऊन बसल्याचें आढळेल. " गोष्ट " शब्द उच्चारण्यास लघुकथा ाब्दानें दुरुस्ती सुचविण्याचें आणि लघुकथा लिहिणारास तंत्राची दटावणी ाखविण्याचें युग सुरू झालें आहे. अर्थात् नवे शब्द आणि नवे नियम हे हमीच प्रगतीचे द्योतक असतात असें नव्हें. तथापि पायरी असो कीं ,पण असो पाऊल टाकणारास त्याकडे डोळेझांक करून चालत नाहीं.

रा. नारायणराव कुलकर्णी सुमारें बावीस तेवीस वर्षांपूर्वी गोष्टी लिहूं ागलें. यावरून मी त्यास सहज प्रश्न केला कीं, त्यावेळीं तुमच्या डोळ्या- ढें असलेले गोष्टी लिहिणारे कोण ? त्यावर त्यांनीं श्री. विठ्ठल सीताराम र्जर यांचें नांव घेतलें. आणि मनोरंजनाच्या विशेष भरभराटीच्या काळांत ीयुत गुर्जर व इतर अनेक प्रसिद्ध, अप्रसिद्ध लेखकांनीं, स्वतंत्र अथवा पांतरित स्वरूपांत मराठी वाचकांस पुरविलेल्या गोष्टी व आज प्रसिद्ध त असलेल्या गोष्टी यांत फारच मोठी तफावत आहे असें दिसून येईल. ाटकांच्या बाबतींत कित्येक नवीन लेखक " किर्लोस्कर देवलांचे–नटी त्रधारांचे दिवस गेले आतां ! " असें म्हणून गर्भितार्थानें विजय ध्वनित रतात. तीच स्थिति गोष्टींच्या बाबतींतही दिसून येईल. तीच गोष्ट कादं- ऱ्यांच्या बाबतींतही दिसून येईल. हरिभाऊ आपटे, मासिक मनोरंजनाचे खक यांचे दिवस गेले ही गोष्ट पुनः पुन्हां सांगणाराच्या उद्गारांतील नि एकच असतो आणि तो म्हणजे या क्षेत्रांत लेखकांनीं कल्पनातीत ल मारली आहे.

आणि हाच ध्वनि असल्यास विचारी वाचकांस अथवा टीकाकारांस तो मान्य ईल असें मला वाटत नाहीं. पूर्वी काय नव्हतें व आतां काय दिसूं गलें आहे हें पाहिल्यास शरीरें बहुधा पहिल्याहूनही निस्तेज असून कप- ांची झकपक मात्र वाढत आहे हें मनुष्यांकडे पाहून लक्षांत येणारें सत्यच तकाकडे पाहूनही पटूं लागेल. कांहींतरी विलक्षण नवीन सुरू झालें आहे

हा भ्रम केवळ एक दोन सामान्य पोषाखी विशेषांमुळें निर्माण झाला लघुकथांच्या अंगावर चढविण्यांत आलेला पहिला पोषाखी गुण म्हणजे भरजरी भाषेचा. कोट्या व उपमा यांची खैरात हा स्वतंत्र असा गुण नव्हे हें आमच्या राजकीय विषयासारख्या गंभीर विषयावर लिहिणारासही समजत नाहीं—कदाचित् भान रहात नाहीं—तेथें गोष्टी लिहिणारांस कोठून समजणार ! दीनदुबळें शरीर कपड्यांनीं झाकण्यास मना करणें निर्दयपणाचें होईल पण तेवढ्यावर आम्हीं पूर्वजाहून सशक्त व ताठ झालों म्हणणें म्हणजे केवळ वंचना होय. तीच स्थिति इतरही कित्येक नावीन्यांची होय आपल्या समाजांत क्वचितच दिसणारे व परकीय वाङ्मयांतून सहज हस्तगत होणारे प्रसंग तसेंच मनोविश्लेषणाच्या नावाखालीं पुरविण्यांत येणारे कामुक द्रव्यें हीं सर्व नव्या गोष्टींच्या नावीन्याचे आणि पुढील पावलाचे पुरावे म्हणून दाखविण्यांत येतात. आणि हें खरें आहे कीं या भडक पोषाखी गुणावर कित्येक लेखक वर्ष दोन वर्षें " नाणावलेले " होऊन बसतात ! बिचारे सामान्य वाचक ! ज्याचा गाजावाजा होईल, ज्याच्या पुस्तकावर तीनरंगी विकारोत्तेजक चित्र असेल, ज्यावर साप्ताहिकांतून परीक्षणांचा व फोटोंचा मारा होईल असें आधुनिक कथावाङ्मय आशेनें हातीं घेतात, व अचंब्यानें खालीं ठेवतात. विचारी असल्यास अचंब्याचें रूपांतर तिरस्कारांत होतें. विकारी असतील त्यास क्षणभर तृप्ति लाभते. आणि अज्ञ अथवा पढतमूर्ख असतील त्यांस वाङ्मयानें मोठाच पल्ला गांठल्या सारखें वाटतें.

अखिल विश्वाबद्दलच्या सहानुभूतीमुळें अथवा असामान्य बुद्धिमानांच्या ठिकाणीं दिसून येणाऱ्या पृथक्करणशक्तीमुळें ज्यांचें लिखाण मानवी जीवनाचें रम्य चित्र वठवून मार्गदर्शक होईल असे लेखक कोटीबाजपणा अथवा तंत्रबद्धता यांच्या भांडवलावर निर्माण होत नसतात. त्यांच्या हृदयांतील प्रेममय सत्य व बुद्धीचें सत्यान्वेशी तेज स्वतःचें तंत्र घेऊन बाहेर पडतात भावनेच्या अथवा बुद्धीच्या प्रांतांत स्वयंप्रकाश उच्च स्थान पावणारे लेखक हंगामी वाङ्मयांत उदय पावत नाहींत. पहिल्या प्रांतांत हरीभाऊंचें स्थान अद्याप अढळ आहे आणि दुसऱ्यांत डॉ० केतकर यांचें स्थान हंगामी वाङ्मयाच्या धुळवडीमुळें बहुजनसमाजाच्या यावें तितकें लक्षांत आलेलें नाहीं

असामान्य लेखकांच्या दुर्भिक्षामुळें आणि हंगामी लेखकांच्या परवडी-ळेंच रा. नारायणराव कुलकर्णी यांच्यासारख्या स्वतःचें ध्येय व मर्यादा ोळखणाऱ्या व हंगामी हुल्लडीस बळी न पडणाऱ्या लेखकाकडे बहुजन-माजाचा स्वाभाविक संथ पण निश्चित ओढा असतो यांत आश्चर्य नाहीं. ढील बारा गोष्टी वाचणारास लेखकाच्या ध्येयाची व मांडणीची वेगळी ोळख करून द्यावयास नको. रा. कुळकर्णी महाराष्ट्रीय मध्यम वर्गाचे मळ निरीक्षक आहेत. त्यांतील गुणदोष आपुलकीनें पाहणें हाच त्यांचा ावसाय व हीच त्यांची करमणूक होय. व या करमणुकीचा कृतज्ञतापूर्वक ाबदला म्हणूनच स्वतः पाहिलेल्या नरनारीमंडित समाजास ते त्यांचींच ात्रें परत अर्पण करीत आहेत असें दिसून येईल. ते पोक्त नसले तरी विकारी ानीच्या पलीकडे गेले आहेत. किंबहुना त्यांचें वाङ्मयीन ध्येय त्यास ाहिरातीकरितां, मताभिनिवेषाकरितां अथवा अन्य अधम कारणाकरितां त्येक लेखकांप्रमाणें बेताल कधींच होऊं देत नाहीं. एकाच मनोविका-च्या अथवा मतातिरेकाच्या आधीन झालेल्या लेखणींतील जहरीपणा ांच्या नाटकांत अथवा कादंबरींत कोठेंच दिसणार नाहीं. तरी त्याची रपाई सर्वत्र संचारी अशा शांतचक्षूनें न्याहाळलेल्या बहुविध चित्रांच्या रें ते करून देतात. प्रस्तुत संग्रहांत "प्रेम" या लोकप्रिय विषयावर र्वथा उभारलेली अशी एकच गोष्ट आहे. आणि तीहि त्या विकाराच्या ात्यास फारच अळणी वाटेल. "प्रेमळ झुडूप" या त्यांच्या दुसऱ्या का सुंदर गोष्टींत त्यांनीं प्रेमास जागा दिली आहे. पण तीहि इतक्या ाच्या रांगेंत आहे कीं, त्या "सर्वदमन" विकाराची पोक्त मनानें ेलेली अशी ती एक मस्करीच वाटते. उलट, प्रेमाचा पत्ताहि नाहीं ाशा गोष्टींचाच प्रस्तुत संग्रहांत भरणा आहे व त्या मसाल्याखेरीजहि ुशल लेखक वाङ्मय रुचकर करूं शकतो हें त्या वाचणारांस दिसून येईल. "अनाथा" या गोष्टींत हिंदूची कुविख्यात अशी "मला काय त्याचें" वृत्ति एका अबलेच्या प्रेतसंस्काराच्या प्रसंगानें रंगविली आहे. "व्यव-हाराचा बळी" या गोष्टींत स्नेह आणि व्यवहार यांतील हळव्या मनाला ीडादायक वाटणारा विरोध रंगविला आहे. "आतां जमले" या एका ग्रजी नाटकाच्या आधारें लिहिलेल्या गोष्टींत श्रीमंत माहेराच्या वातावरणांत

रुतल्यामुळें खऱ्या वैवाहिक जीवनास मुकलेल्या स्त्रीच्या मनोविकासाचें चित्र आढळेल. "परिस्थितीनें घातलेलें कोडें" या गोष्टींत सुधारणेच्या गप्पा मारणाऱ्या समाजांतही पुरुषांचा नैसर्गिक गर्व कसा कायम राहातो हें द्रव्यार्जन करूं लागणाऱ्या विवाहित स्त्रीच्या चरित्रावरून दाखविलें आहे.

वरील अंगुलिनिर्देशावरूनही रा. कुलकर्णी यांच्या वाङ्मयसृष्टींतील विषयांचें स्वरूप व विशेष कळून येतील. साधी भाषा व सर्वसाधारण वाचकांच्या विचारास खाद्य देणारे विषय यांच्या सामुग्रीवर ते महाराष्ट्रीय बहुजन समाजाचें मनोरंजन तर करतीलच. पण न कळत विचारांत व दृष्टि-कोनांत सुधारणाहि घडवून आणतील.

सामान्य वाचक याहून अधिक खोलांत शिरत नाहींत. तथापि वाङ्मयाच्या दर्दी परीक्षकास रा. कुलकर्णी यांच्या यशाचीं कारणें व मर्यादा या लहानशा कथागुच्छांतही सहज दिसतील. रा. कुलकर्णी यांची दृष्टि समाजांतील अगर स्वभावांतील गुणदोषांवर प्रकाश पाडणाऱ्या अर्थपूर्ण प्रसंगावर (Significant Situation) वर खिळलेली दिसेल. कित्येक कथा-लेखक स्वभावपरिपोषांत दंग होतात, कित्येक चटकदार संभाषणांत गुंगतात तर रा. कुलकर्णी यांजसारखे कांहीं ज्यांतून इतर कथापात्रें आपोआप अंकुरतील असा बीजयुक्त प्रसंग निवडण्यांतच आपलें चातुर्य दाखवितात. आणि वर एके ठिकाणीं उल्लेखिलेला बालसदृश वाचकवर्ग स्वभावाचे पदर अथवा संभाषणांतील बौद्धिक तुषार याहून अर्थपूर्ण प्रसंगानेंच अधिक रंगतो. आणि या दृष्टीनें रा. कुलकर्णी यांच्या गोष्टी अधिक विस्तृत प्रांत जिंकूं शकतील.

पण कथारचनेच्या या अंगाबाबतही एक खुलासा करणें जरूर आहे. केवळ कल्पकतेच्या जोरावर नवे नवे प्रसंग कल्पून अथवा अन्य वाङ्मयांतून निवडून त्यावर गोष्टी रंगविणें ही श्रेष्ठ दर्जाची कला म्हणजेच असा कित्येक लेखकांचा व वाङ्मयपंडितांचाही समज दिसतो. ते कोटयांचा व कृत्रिम भाषेचा धिक्कार करतील व अखेर तंत्रशुद्ध विस्मयकारक प्रसंग व घटना म्हणजेच लोकोत्तर लघुकथा असें ठरवितील. जोपर्यंत तुमचे प्रसंग आणि तुमच्या घटना मानवी जीवनांतील—परमेश्वरी सृष्टींतील—थोर सत्याचें दर्शन

घडवीत नाहींत तोपर्यंत तुमची तंत्रशुद्ध तरतरी म्हणजे कागदाचा ताबूद होय. त्यास ताजमहालाची सर कशी येणार !

रा. कुलकर्णी यांचे कथाप्रसंग आकर्षक असतात, अर्थपूर्णही असतात. त्यांची भाषा अप्रासंगिक कोटया व उपमा यांच्या भेंडोळ्यापासून अलिप्त आहे. तरी याचा अर्थ ते गुण समजल्या जाणाऱ्या प्रचलित दोषापासून अलिप्त आहेत व उपयुक्त व प्रिय होईल, असें वाङ्मय लिहिण्यास अवश्य असे लागणारे गुण त्यांचे आंगीं आहेत एवढाच घ्यावयाचा. याहून अधिक व थोरांच्या वाङ्मयांत आढळणारे गुण त्यांच्या लेखनांत नाहींत म्हटल्यास त्यास राग येईल असें मला वाटत नाही.

माझें वरील मत कित्येकांस केवळ एकमजली घरास दोनमजली वाडा नव्हे म्हणून, अथवा द्वीपकल्पास द्वीप नव्हे म्हणून दोष लावण्यासारखें वाटेल. पण रा. कुलकर्णी यांच्या गोष्टी वाचतांना मला जाणवलेलें वैगुण्य कोणत्या स्वरूपाचें होतें हें मी अधिक स्पष्ट करूं इच्छितों. तें दाखविण्यांत माझा हेतु रा. कुलकर्णी यांच्या इच्छेप्रमाणें त्यांच्या कृतीची योग्य परीक्षा करणें हा तर आहेच; पण शिवाय वाङ्मयाच्या श्रेष्ठतेच्या माझ्या कल्पना कुठल्याही पोरकट व उथळ कलतीच्या जोरावर युगप्रवर्तक अथवा युग-समाप्तिकारक वाङ्मय निर्माण करतां येईल असें समजणारांच्या कल्पनेहून भिन्न आहेत हेंही सांगण्याचा आहे.

रा. कुलकर्णी यांचे विचार व कला एका मर्यादेपलीकडे जात नाहींत हें दाखविण्यास मी त्यांची त्यांतल्या त्यांत सुंदर गोष्ट उदाहरण म्हणून घेतों. "प्रेमळ झुडुप" या गोष्टींत रा. कुलकर्णी यांनीं निवडलेल्या प्रसंगास मी शंभरापैकीं शंभर मार्क देईन. अनेक वर्षांच्या ऋणानुबंधांचीं दोन प्रति-ष्ठित कुटुंबें पोरांच्या कल्याणाकरितां एका जमिनीच्या तुकडयाचें भांडण भांडत कोर्टाची पायरी चढतात. वादग्रस्त जमिनीच्या पुराव्यादाखल घेतलेल्या फोटोंत प्रणयचेष्टा करीत बसलेल्या एका अविवाहित जोडप्याचाही फोटो निघतो. त्यांतील तरुणी वादीची मुलगी होती व तरुण प्रतिवादीचा मुलगा होता !

या गोष्टीचा विषय अखिल मनुष्य जातीस प्रिय आणि मनुष्याच्या दोन

अवस्थांतील मनोरचनेंतील त्रिकालाबाधित भेदावर अधिष्ठित आहे. सारांश, विषय थोर, प्रसंग नितांतरम्य आहे. पण याच विषयाची मांडणी एखाद्या **मोपासांनें** अथवा **टागोरांनीं** कशी केली असती हें श्रेष्ठ वाङ्मयाच्या भोक्त्यांस सांगावयास नको. ज्या उच्च भूमिकेवरून मानवी दोषाकडे व दौर्बल्याकडे हे उच्च लेखक कधीं तीक्ष्ण तर कधीं वत्सल दृष्टीनें पाहतात त्यांचें चित्रण रा. कुलकर्णी यांच्यासारख्या प्रचलित जगावर बहुतांशीं संतुष्ट असलेल्या लेखकांकडून यथार्थतेनें होत नाहीं. यामुळेंच सुंदर प्रसंगाच्या चित्रांतही तीक्ष्ण दृष्टि अथवा विशाल दृष्टिकोन यांचा अभाव भासतो.

पण रा. कुलकर्णी यांच्या कलेच्या मर्यादा दाखवून देणें म्हणजे केवळ कोट्या अथवा कामजिज्ञासा यांनीं भरलेल्या व श्रेष्ठ ठरलेल्या वाङ्मयाहून त्यास कमी ठरविणें नव्हे. आणि खरा ज्ञाता या दोहोंची तुलनाच करणार नाहीं.

रा. कुलकर्णी यांचे गुणप्राय दोष व दोषवजा गुण सांगावयाचे झाल्यास ते वाङ्मय–प्रांतांतील एक संतुष्ट व संसारी लेखक आहेत. ज्या दैवी असंतोषामुळें थोर लेखक स्वतः जळतात व दुसऱ्यास प्रकाश देतात. त्याचा या मध्यमवर्गास प्रिय झालेल्या संसारी लेखकांत अभाव आहे. आणि त्यांचा हितचिंतक या नात्यानें मी त्यांचा हा दोष त्यांस सदैव लाभो असेंच इच्छितों. कारण तो दोष घालविणें म्हणजे वाङ्मयांत श्रेष्ठ होणें, आणि संसारांत दुःखी होणें होय.

अदूर दृष्टीस क्षणभर मानससरोवराप्रमाणें भासणारे वाङ्मयसृष्टींतील गलिच्छ जलसंचय आणि ज्यांत कोणीही विहार करावा पण ज्याचा कोणासच ठाव लागू नये असे महासागर यांची एवढी चर्चा करण्याचा हेतु श्रीयुत कुलकर्णी यांची हृदयांतील योग्यता ठरविणें हाच होता. बहुजन–समाज चर्चा करीत नसला तरी परीक्षा करूं शकतो. श्रीयुत नारायणराव कुलकर्णी यांच्या विपुल वाङ्मयकृतीचा महाराष्ट्रीय वाचकवर्गानें स्वीकार व सत्कार यापूर्वीच केला आहे. आणि हें त्याच्या गुणज्ञतेचें व श्रीयुत कुलकर्णी यांच्या यशाचेच द्योतक आहे. तेंच यश वृद्धिंगत होवो असें मी इच्छितों व त्याबद्दल मला दृढविश्वासही वाटतो.

१५।१२।३४ तुकाराम–आश्रम,
टिळकवाडी, पुणें.
श्रीकृष्ण केशव क्षीरसागर

## रसिकांचे सेवेसी—

माझे मित्र श्री. ग. गो. दिवाकर व श्री. एन्. टी. भिडे यांच्या माझ्यावरील विशेष लोभामुळेंच माझ्या अनेक गोष्टींपैकीं आज प्रस्तुत बारा गोष्टींचा प्रथम खण्ड आपल्या सेवेला सादर करतां येत आहे याबद्दल मला अत्यंत आनंद होत आहे.

या संग्रहांत समाविष्ट केलेल्या गोष्टी 'मनोरंजन', 'यशवंत', 'स्त्री', 'मधुकर', 'सूर्यकांत', 'तरुण भारत', 'मनोहरमाला' व 'नवाकाळ' इत्यादींतून यापूर्वी प्रसिद्ध झालेल्या असून 'अपराधांची यादी' ही नवी गोष्ट या संग्रहाकरितां म्हणून मुद्दाम लिहिली आहे.

श्री. एन्. टी. भिडे यांनीं माझ्या 'निर्माल्य' या संग्रहाच्या अगोदर 'माझ्या गोष्टी' चा प्रथम खण्ड प्रकाशित करण्यांत प्रेमानें आघाडी मारल्याबद्दल, श्री. दिवाकरांनीं सुन्दर छपाई केल्याबद्दल, श्री. श्री. के. क्षीरसागर, बी. ए. यांनीं या संग्रहास प्रस्तावना लिहिल्याबद्दल, नटसम्राट् श्री. बालगंधर्वांनीं गोष्टींच्या पुस्तकाचें अर्पण प्रेमानें स्वीकारून अल्पसा सन्मान मान्य करून घेतल्याबद्दल व कोल्हापूरचे शिरोडकर यांनीं काढलेला नवा सुन्दर फोटो दिल्याबद्दल, मला सदर सर्व सुहृदांचें अंतःकरणपूर्वक अभिनंदन करणें अगत्याचें वाटतें.

माझ्या रसिकांना माझ्या कादंबऱ्या, नाटकांप्रमाणेंच मी गोष्टीद्वारा केलेली सेवा आवडली आहे, असें कळलें म्हणजे माझ्या आणखी अनेक गोष्टींपैकीं निवडक गोष्टी पुस्तकरूपानें सादर करण्यांत मला उत्साह वाटेल.

पुस्तकाच्या कव्हरवर घालण्याकरितां किर्लोस्कर संगीत नाटक मंडळींतील सुप्रसिद्ध नटी सौ. गिरिजाबाई केळकर व कु. विमल कर्नाटकी यांनीं आपलें छायाचित्र मोठ्या हौसेनें दिल्याबद्दल त्यांचे आभार मानणें अवश्य आहे.

ना. वि. कुलकर्णी

# माझ्या गोष्टी

## अनाथा ! : : : १

तापीबाईच्या घरीं सहज जायचा एक दिवस प्रसंग आला. गेल्या वेळीं तापीबाई एकट्याच कांहीं शिसपेनीनें रोजनिशींत लिहीत असल्याचें नजरेस आलें. जातांक्षणीं वाटलें कीं कांहीं घरचा ' जमाखर्च ' लिहीत असतील; पण जरा जास्त लक्ष गेलें त्यावेळीं त्या कांहींतरी बराच गहन मजकूर लिहीत असाव्यात असा संशय आला. लिहितांना त्या एखाद्या तल्लीन झालेल्या लेखकासारख्या दिसत होत्या. दुःखद विचार त्यांच्या मनांत त्यावेळीं थैमान घालीत होते! डोळ्यांतून अविरत अश्रूवर्षाव चालला होता. त्यांचा कागदावरचा मजकूर धुवून जाईल याचेंहि तापीबाईंना मुळींच भान नव्हतेंसें दिसलें !

× × ×

मी आल्याचें पाहून तापीबाईंनीं लेखन थांबविलें. रोजनिशी बाजूला केली मला 'या' म्हटलें. त्यांची इच्छा आपली मनःस्थिति माझ्या लक्षांत येऊं नये अशी होती. त्याप्रमाणें ती लपविण्याचा त्यांनीं शक्यतो प्रयत्नहि केला. मला अतिशय चमत्कारिक वाटलें. बोलावें कीं न बोलावें, विचारावें कीं न विचारावें, थांबावें कीं, आल्या पावलीं परत जावें. थांबण्यानें तापीबाईंना बरें वाटेल कां गेल्यानें ! हें माझें मलाच समजेना. माझ्या मनाचा गोंधळ तापीबाईंना त्रासदायक होईल म्हणून मी बाहेर दिसूं दिला नाहीं. त्यांना आपल्या मनाची सावरासांवर करण्यांत माझ्याकडे लक्ष देण्याला तशी फुरसदहि नव्हती. त्यांनीं तेवढ्यांत पुन्हां मला, "या किं हो !" म्हटलें. तेवढ्यावरून मी तेथें बसावयाचें ठरविलें. जाऊन बसल्यावर मनाला कुठे रहावतें ! तापीबाईंना विचारलेंच मी कीं, "इतकें लिहीत काय होतां अन् अशा अगदीं उदास कां झालां आहांत !" माझ्या विचारण्यानें तापीबाईंचे डोळे पुन्हाः पाण्यानें भरून आले. मला कसेंसेंच झालें. कुटून विचारलें असें वाटलें. "तुम्हांला माझ्या विचारण्यानें त्रासच झाला म्हणायचा ! तुम्हांला त्रास दिला याबद्दल क्षमा करा." त्यावर पदरानें डोळे पुशीत पुशीत व बाजूस टेवलेली रोजनिशी माझ्यापुढें करीत, "छे ! छे ! तसें कांहीं नाहीं. पहा कीं त्यांत काय आहे ! वाईट वाटायचं, त्रास व्हायचा, डोळ्यांतून पाणी गाळायचं हें आतां माझ्या जन्मालाच लागलं आहे," तापीबाई म्हणाल्या. मी पडत्या फळाच्या आज्ञेप्रमाणें रोजनिशी हातीं घेतली. तापीबाईंनीं लिहावयाला सुरवात केली होती, तेंच पान उघडलें गेलें. पहातांक्षणींच मला काय दिसलें !

× × ×

"माझ्या दुर्दैवी ताई ! केलं बरं मी तुझ्या अखेरच्या इच्छेप्रमाणें सारं! तुझे अंत्यसंस्कार तुझ्या इच्छेप्रमाणें घडविले. तुझ्या लाडक्या 'सुधे'च्या शिक्षणाची अन् संगोपनाची पण मनाजोगती सोय लागली बरं कां ! आतां तुझ्या स्वर्गीय जीवाला थोडासा तरी समाधानाचा निश्वास टाकतां येईल ना!"

× × ×

तापीबाईच्या रोजनिशींतील पहिल्याच पानावर हीं वाक्यें होतीं. हीं वाक्यें वाचून काय वाटलें, माझ्या अंतःकरणांत कसली खळबळ उडाली हें मला

सांगतां येणार नाहीं. मात्र पुढचीं पानें अधिक लक्षपूर्वक वाचण्याकडे मनाची धांव, तें अधिकाधिक व्याकूल होत असतांहि, जाऊं लागली. मी रोजनिशी वाचावयाला घेतलेली पाहून तापीबाई कांहींतरी निमित्त काढून तिथून उठून आंत गेल्या. मी त्यांना मधेंच आणखी कांहीं विचारीन अन् त्यांना आणखी त्रास होईल अशा शंकेनेंच त्या तिथून उठल्या असतील. मला मात्र तें बरेंच झालें. रोजनिशी वाचून होईपर्यंत मनाला कसलाच विक्षेप येणार नाहीं, हें एकपरी बरेंच होतें. मी रोजनिशीचीं पानें पुढें चाळण्यास सुरुवात केली—

× × ×

" ताई ! तूं गेलीस. आणि तुझ्या आठवणी मागें राहिल्या. तुझ्या दुःखद आठवणी दुःख देतातच देतात. पण सुखद आठवणीहि दुःख-कारक होतात. काय करायचं पण ! नको म्हटल्यानें आठवणी यायच्या रहात नाहींत. आणखी आल्या कीं त्या रडविल्याखेरीज रहात नाहींत.

× × ×

तूं आपल्या जन्माच्या सांगात्यासह गरीबींतच पण किती आनंदी असस, किती सुखी असस ! पतीच्या सांगाती तुझ्या असत्या नसत्या गुणांचं कोडकौतु-कच शेजारीपाजारीं, जिथं तिथं, ज्या त्या वेळीं, होत होतं. समाज तुम्हांला गौरवीत होता ! मनांत कांहीं असलं तरी त्याचा उच्चार करण्याची, किंवा वांकड्या डोळ्यानं तुझ्याकडे पहाण्याची कुणाचीहि छाती नव्हती. माझी पाठची बहीण इतकी सुखांत पाहून मला केवढी धन्यता वाटत असे ! माझ्या मुलांनांहि आपल्या आवडत्या ' मावशी ' ला कुठें ठेऊं अन् कुठें नको असं होऊन जाई. आपण मावशीचं सगळ्यांत अधिक आवडतं व्हायचं अशी मुलांमुलांत अहमहमिका लागायची.

× × ×

खरीखुरी आणखी अवघ्या जन्मांत माझ्या ताईला मी अधिक सुखी जर केव्हां पाहिलं असेल तर तिच्या पहिल्या गर्भारपणीं ! आयुष्यांत असं सुख केव्हां तरी एकदाचं लाभतं. तो सुखाचा उत्कर्ष तुला त्या वेळीं लाभला. किती लोकांना, ताईच्या किती जिवलग मैत्रिणींनासुद्धां त्या

अलौकिक सुखाचा मनांतून हेवा वाटला असेल. तिच्या त्या सुखाच्या घडीला वाइटाची तर राहूंदेच; पण चांगल्याची देखील दृष्टी लागली असती.

× × ×

पहिला मुलगा झाला. जिकडे तिकडे आनंदी आनंद झाला. ताई पुत्रवती झाली ! स्त्रीजातीच्या वांट्याला घातलेलं सर्वश्रेष्ठ-परमपद जें मातृपद तें ताईला प्राप्त झालं ! ताईच्या सुखाची सीमा झाली !

× × ×

या ताईच्या सौख्याच्या मंदिरावर तिच्या पतिदेवानें सर्वतोपरी सुखाचा कळस चढविला. लेणीं लुगडीं, दागदागिने, हौसा-मौजा, जितकं करतां येईल, पुरवितां येईल, तितकं केलं, तितकं पुरविलं. पूर्वजन्मींची सारी पुण्याई ताईच्या या सुखाच्या रूपानं फळाला आली ! आम्हीं सगळ्यांनीं ताईच्या त्या सुखांत यथाशक्ति भर घातली. ताईचं छकुलं ताईला तर जिवापलिकडे प्रिय झालंच. पण आम्हां सर्वांनाहि तें कुठं ठेवावं नी कुठं ठेवूं नये असं वाटे. ताई आपल्या पतीबरोबर आपल्या छकुल्याला नटून सजवून, काजळ लावून तीट लेवून-सिनेमाला जाऊन बसलेली, आपल्या जवळून पतीजवळ, पतीजवळून आपल्याजवळ घेत असलेली,-अशी पाहिली म्हणजे जी धन्यता वाटे, तिचं वर्णन करायला पामर लेखणी असमर्थ आहे !

× × ×

पण हाय ! ताई ! ती तुझी केवळ दुपारचीच सावली होती. मध्यानीं माथ्यावर आलेला सुखाचा सूर्य कलला, अन् तुझ्या सुखाला उतरती कळा लागली ! वैरी चिंतणार नाहीं, अशी पहिली गोष्ट घडून आली. काय झालं कोण जाणें ! पण ताईचं छकुलं एक दिवस दृष्टावल्यासारखं झालं. ताप आला, झटके यायला लागले. आईबापाच्या तोंडचं पाणी पळालं. डॉक्टर, वैद्य, देव, देवऋषीसुद्धां झाले. पण कशाचा देखील उपयोग झाला नाहीं. आपल्या आवडत्या आईबापाला कायमचा शोकाचा चटका लावून तें देवाघरीं निघून गेलं ! ताईच्या सौख्यमंदिराचा कळस प्रथम असा ढळला !

× × ×

ताईनं हाय घेतली. ताईच्या नवऱ्यानं हाय घेतली. त्याचा परिणाम त्यांच्या प्रकृतीवर झाला. बघतां बघतां ताईच्या नवऱ्यानं अंथरूणच धरलं. रजा–रजा करतां करतां नोकरीच हातची गेली. मनाला बसलेली हाय आणखी चटके देऊं लागली. त्याच स्थितींत कांहीं दिवस गेले. माझ्या ताईनं या काळांत नवऱ्याची खरी सेवाचाकरी केली. स्वतःचं दुःख गिळून नवऱ्याला सुखी राखण्याची शिकस्त केली. पत्नी म्हणजे पतीचं अर्ध अंग हें त्या काळांत अक्षरशः तिच्या नवऱ्याला पटलं.

x x x

दैवाला त्याहि स्थितींतील ताईचं समाधान पहावलं नाहीं. त्यानं एक दिवस ताईच्या सौभाग्यावर घाला घातला ! ताईचा संसारसागर निमिषांत कोरडा ठणठणीत झाला ! अवघ्या आभाळाखालीं माझी ताई दुर्दैवी झाली ! निराधार झाली ! अनाथा झाली !

x x x

अनाथ झालेल्या अबलेला आमच्याकडे जे हाल सोसावे लागतात, ज्या यमयातना भोगाव्या लागतात, ज्या आपत्ति निमूट सहन कराव्या लागतात, त्या सर्वांची खैरात ताईवर चोहींकडून सुरू झाली ! एका वेळीं ताईचा उदोउदो करणारा समाज आतां ताईला कःपदार्थ समजून हिडीसफिडीस करूं लागला. वेड्यावांकड्या नजरेनें पाहूं लागला. हलकट फिदिफिदी हंसायला लागले. तिच्या मार्गांत कांटे पसरण्यांत समाजाला आसुरी आनंद वाटूं लागला; बिचारीला दैवी–दुर्दैवी आपत्तीशीं तोंड देणें भागच होतें ! काय करणार असहाय्य अबला !

x x x

घरापासून दारापर्यंत ताईची अवहेलना, हेटाळणी, उपहास, निंदा कुत्सित शब्दांच्या शरांनीं छळणूक सुरू झाली. मी उघड्या डोळ्यांनीं पहात होतें. पण मी तरी काय करणार ! मीहि अबलाच. माझं घर, माझे पति, माझीं मुलें, यांच्या ताब्यांत मी ! त्यामुळें ताईच्या स्थितींत माझ्या मायेचें वस्त्र ताईला निवारायला अपुरें पडत होतें. माझ्या घरीं ताईला येणं, मनमोकळेपणानं रडून दुःखभार हलका करणंहि ताईला अशक्य झालं होतें. भरल्या घरांत कुणी तरी रडायचं म्हणजे काय ! ताईच्या

पायांनीं दुर्दैव घरांत कशाला घ्यायचं ! असं वेळोवेळीं तिकडे वटारलेले डोळे मला सुचवीत. प्रत्यक्ष माझ्या मुलांची तिच्या विषयींची नाखुषी मला तोच दाखला देई !

× × ×

त्यांत उण्याला भर, ताईला तिचा पति गेला तेव्हां कांहीं दिवस गेले होते. दिवस भरले. प्रसुतिकाळ समीप आला ! मोठी पंचाईत पडली. ताईची सुखरूप सुटका कुठें, कशी होणार ! कोण करणार ! दुष्ट समाजाला काय ! त्यानें भलतीच शंका घेतली ! कुजबूज ऐकायला यायला लागली. बिनदिक्कत वाटेल त्यानें कुटाळकीला सुरुवात केली. गुप्त किंवा उघड बोललेले शब्द कसेना कसे तरी आमच्या कानावर यायचे. तिकडे मुका तिरस्कार व्यक्त करावा. मुलांनीं अपुऱ्या बुद्धीनें कांहींतरी बोलावं ! तें मला सहन होईना. मग माझी ताई दुर्दैवाचे वज्राहून कठोर तडाखे कसे सहन करी ! तिला किंवा एक परमेश्वरालाच माहिती !

× × ×

दिवसेंदिवस ताईची माझी भेट होऊन कोरड्या शब्दांची सहानुभूतीहि मला तिला देतां येणं मुष्कीलीचं झालं. पण ताईची खरी शहामत ! तिनं आपल्या डोळयांतील अश्रु एकदांच संपविले. मन कठोर केलं ! निश्चितं केलं. प्राप्त परिस्थितींत अमुकच निश्चित मार्गानं चालावयाचं असा तिचा कृत संकल्प झाला ! तिचं मन पापी नव्हतं. शरीर पातकी नव्हतं. तिच्या इच्छेला चुकूनसुद्धां अमंगलपणा शिवला नव्हता ! मग ती कुणाला आणि कां भिणार ! जगाची तिला परवा वाटत नव्हती. ती जगावर रागावत नव्हती. तिरस्कार दाखवीत नव्हती. ती जगाची कींव मात्र करीत होती

× × ×

मी जगाची—रूढीची दृष्टि चुकवून ताईला जाऊन भेटलें. मी कांहीं तिला धीराचे शब्द सांगणार होते, तों तिनेंच मला उलट उपदेश केला. मी तिला वरपांगींच म्हणायला गेलें होतें, “ ताई, कांहीं असूंदे. तूं कांहीं भिऊं नकोस. तूं माझ्या घरीं चल. मी घरचा वाटेल तो छळ सहन करीन, पण तुझी सुटका होऊन, तूं हिंडती फिरती होईपर्यंत, मी कांहीं तुला सोडणार नाहीं ! जग कांहीं म्हणूं दे. माझीं माणसं मला कितीहि

त्रास देऊं देत. तुला माझ्या घरीं अशा अडचणीच्या वेळीं आलंच पाहिजे." त्यावर ताई शुष्क हंसली. अन् मला म्हणते, "कशाला उगीच तूं आपल्या मनाचे हाल करून घेतेस ! मी तुझ्या घरीं यायचं म्हणजे तुझ्या घरावर, तुझ्या मुलींवर केवढं सामाजिक संकट येईल त्याची कल्पना नाहीं कां तुला ! तुझ्या मुलांची अजून लग्नं व्हायचीं आहेत त्यांचे संसार व्हायचे आहेत. माझा मायेचा अडथळा तुझ्या सुखाच्या संसाराला समाज आणल्याशिवाय रहायचा नाहीं. तेव्हां मला तुझ्या घरं बोलावूं नकोस. मी येणार नाहीं. माझं प्राक्तन आणि मी पाहून घेईन !' मी त्यावर काय बोलणार ! ताईला निश्चय बदलावयाला लावण्याची माझ्या शब्दांत पुण्याईची ताकदच नव्हती ! मी जशी तिच्याकडे गेलें तशीच एखादी बिगार टाळल्यासारखी टाळून परत आलें.

× × ×

माझ्या घरींच यावयाला जर ताईला सामाजिक रूढीचा बागुलबोव भेवडावीत होता, तर दुसऱ्या ठिकाणीं तिला थारा कसा मिळणार, तिच्या नवऱ्याचे स्नेही म्हणविणारे पुष्कळ मोठमोठे डॉक्टर, प्रायव्हेट प्रॅक्टिशनर, सर्जन्स होते. पण त्यांपैकीं कोणाचें तरी लक्ष्य माझ्या ताईकडे कसं जाणार! ताई त्यांच्या दृष्टीनं यःकश्चित अबला ! ताईला लोक टाळीत असत. मग तिची मुद्दाम भेट कोण घेणार ! तिची विचारपूस कोण करणार !

× × ×

पण जरी आमचा प्रतिष्ठित समाज एक प्रकारच्या कठोर नजरेनं- हिडीसपणानं एखाद्या संसर्गजन्य रोग्याप्रमाणं दूरदूर राहूनच ताईला पहात असला, तरी ताईला तिच्या शाळेंतल्या वगैरे अन्यधर्मीय मैत्रिणी अजूनहि आठवणीनं भेटावयाला येत असत. अशा वेळींहि ताईची एक ख्रिश्चन जातीची शाळेंतली मैत्रिण भेटीस आली. तिनं चौकशी केली. तिनं आमच्या समाजाच्या रूढीची यथेच्छ हजेरी घेण्यास कमी केलं नाहीं ताईला तें बरं वाटलं नाहीं. ताई तिला एवढंच म्हणाली, "जगांत कुठींहि गेलं तरी पळसाला पानं तीनच असतात ! आमचा समाज आणि समाजाच्या रूढी चमत्कारिक तिरस्करणीय अशा असल्या तरी जगांतल्या इतर समाजांत आणि त्यांच्या रूढींत तसा प्रकार नसेलच असं कशावरून

तेव्हां आपण दुसऱ्याला बोल लावण्यापेक्षां आपणच प्राप्त प्रसंगांत सद्-सद्‌द्विवेक बुद्धीला स्मरून कसं वागावयाचं हें ठरविणं चांगलं नव्हे का?" तेची ख्रिश्चन मैत्रीणहि निरुत्तर झाली. आणि तिनं ताईला तिच्या इच्छे-नुसार सहाय्य देण्याचं कबूल केलं. ताईनें, "मी माझ्या धार्मिक बाबतींत कोणालाहि हात घालूं देणार नाहीं. आपद्धर्म म्हणून सुद्धां माझा आचार व विचारधर्म सोडणार नाहीं. असं असेल तर मी—" इतकं म्हटलं. तिच्या ख्रिश्चन मैत्रिणीनं बिनशर्त ताईच्या अटी मान्य केल्या. ताईनें त्या मैत्रिणीचं साह्य घ्यावयाचं कबूल केलं.

× × ×

ख्रिश्चन मैत्रिणीच्या सल्ल्यावरून ताई आपली सुटका करून घेण्या-साठीं मिशनरी दवाखान्यांत दाखल झाली. योग्य वेळीं ताईची सुखरूप सुटका झाली. ताईला कन्या झाली असं कळलं. मला हें कुणीसं येऊन सांगितलं. तें ऐकून मला काय वाटलं. समाधान, सौख्य, आनंद कां स्वस्थितिविषयीं ओशाळगत!

× × ×

मिशनऱ्याच्या धर्मार्थ दवाखान्यांत ताईनें आपली सुखरूप सुटका करून घेतली. मूल बाळंतीण सुखरूप आहेत, ही बातमी त्यांतल्या त्यांत माझ्यासारख्या ओशाळगत झालेल्या तिच्या बहिणीला समाधान द्यायला कारण झाली असेल. पण समाजाला—बेजबाबदार समाजाला—कुचेष्टप्रिय-लब्धप्रतिष्ठित—निंदाप्रिय—तिर्यक्‌दृष्टीच्या समाजाला—त्या बातमीनं माझ्या असहाय, निर्मळ, शुद्ध, सदाचरणी, पवित्र ताईबद्दल कसले उद्गार वदाव-याला संधि दिली! कोणतें जहरी वीष सवंग करावयाला फुरसद दिली!

× × ×

पतीच्या निधनानंतर ताईच्या गरोदरपणाचा गवगवा ताईच्या—निःसहाय निरुपद्रवी, निष्पाप ताईच्या—निंदेला पुरेसा वाटला नाहीं. आतां ती मिशन-ऱ्यांच्या—बाटग्यांच्या दवाखान्यांत गेली. ही गोष्ट समाजाच्या जणूं काय जिव्हारी लागली. सनातनधर्माचा पोकळ टेंभा मिरविणारे ताईच्या कृत्यांचा, ताईचा, तिच्या नांवाचा धिःकार धिःकार धिःकार गर्जूं लागले. पातिव्रत्य

बुडविलें, धर्माला तिलांजली दिली. या अर्थाच्या गोंगाटाचा सनातनीय धर्ममार्तंडांत नुसता कोलाहल उडून राहिला !

× × ×

तर इकडे नवमतवादी, उदारमतवादी, स्वातंत्र्यवादी, सुधारणावादी, प्रगमनशीलवाले, ताईच्या कृत्याचा ( खऱ्याखुऱ्या गोष्टीचा नव्हे हो ! सनातनीयांच्या तद्विषयक कोलाहलाचा प्रतिकार—वर्तमानपत्रीं शब्दांनीं प्रतिकार करण्यासाठीं) पाठपुरावा करण्यास पुढें सरसावले. पुरातनीयांचें खंडण अखंड सुरू झालें. पक्ष—प्रतीपक्ष होऊं लागले. खास-अंक स्पेशल—अंक मुद्दाम-अंक ‘ ताई अंक ’ नित्यशः कितीतरीं निघूं लागले ! देशोद्धार, अबलोन्नति, वर्तमानपत्रांच्या कारखान्यांतून घरीं दारीं बोकाळूं लागली. कित्येक वर्तमानपत्रांचे हजारांनीं अंक खपूं लागले. वर्तमानपत्रें विकणाऱ्या पोरांनीं असल्या वर्तमानपत्रांना गिऱ्हाइकांकडून ‘ एक आण्या ’ ऐवजीं एक रुपयापर्यंत किंमत घेतली. पोकळ सनातनीयांच्यामध्यें माझ्या ताईची वस्तुस्थितीची जितकी अज्ञानपणाची हृदयशून्यता—दिसत होती, तितकीच हृदयशून्यता—ताईनें मतस्वातंत्र्य दाखविल्याबद्दल, धर्मांतर केल्याबद्दल(!) व्यभिचारोत्पन्न संततीला ठार मारण्याचा अमानुषपणा न दाखविल्याबद्दल(!) ताईबद्दल सहानुभूति दाखविणाऱ्या—तिचं अभिनंदन करणाऱ्यांच्या ठिकाणीहि ठळकपणानं दिसून येत होती ! असा एकीकडे ताईच्या नांवावर गहजब चालला तर दुसरीकडे तिच्या नांवाचा उदोउदोहि चालला !

× × ×

पण हाय ! वस्तुस्थिति काय होती ? ताई सुखरूप बाळंत झाली खरी पण हें तिचं पहिलं सुखाचं—पतीच्या प्रेमळ छत्राखालचं बाळंतपण नव्हतं. वेळेला तिला नीट खायला मिळत नव्हतं. कोण तिला वेळेला खायला घालणार ? तिची शुश्रुषा तिथं कोण करणार ? दवाखान्यांत तिला खायला द्यायला पुष्कळ तयार असत. इच्छा दाखवीत, कींव करीत, क्वचित् कठोर बोलत, पण ताईचा कृतनिश्चय त्यामुळं कसा ढळणार ? ताईची मैत्रीण आपला व्यवसाय, उद्योग, संभाळून ताईकडे लक्ष्य देई, कोणाकडून तरी खायला करून आणवी पण बाळंतपण—म्हणजे स्त्रियांचा पुनर्जन्म; त्यांत अशी

हेळसांड कशी खपणार ! झाली तर त्याचा परिणाम भोगावयाला लागल्या-खेरीज कसा राहणार !

× × ×

ताईचे ' न भूतो न भविष्यति ' हाल होऊं लागले. तिच्या अजाण अर्भकाच्या हालाची सोय सांगतां पुरवत नाहीं. मी मधूनच घरच्या मंडळींना चोरून ताईकडे जाई. जातांना कांहीं खायला नेई. पण असं नित्याचं माझ्या हातून होत नव्हतं तशांत समाज सांपडेल त्या बाजूंनीं ताईचे लचके जाहीररीत्या तोडीत होता; हें तिच्या कानीं कोणी बळंच तर कोणी सहजगत्या घालीत असत. कोणी ' वर्तमानपत्रांचे अंक 'हि तिच्या नजरेखालीं घालण्याचा उलट्या काळजाचा प्रयत्न करून पुण्य संपादन करण्यांत कसूर करीत नसत !

× × ×

अशाचा परिणाम दुसरा काय होणार ! मन किती खंबीर असलं, निश्चय किती दृढ असला, व्रत कितीहि कठोर असलं, तरी दुबळा मानव-देह, सुकुमार स्त्रीशरीर, अशा हृदयविदारी परिस्थितीशीं किती दिवस झगडणार ! शरीर खंगत चाललं. शरीरप्रकृति ताईच्या ताकदीच्या बाहेर गेली. ताईच्या स्वाधीन प्रकृति न राहतां ताई आतां प्रकृतीच्या स्वाधीन झाली ! तशाहि स्थितींत देवाला स्मरून, धर्माला राखून, ताई काल कंठीत होती. ती अजूनहि त्या परधर्मीयांच्या दवाखान्यांतच रहात होती. दवाखान्यांत तिला परिचारिकेचें काम मिळालं होतं. काम करावयाचं, पोट भरावयाचं, कष्ट करावयाचे व माध्यान्ह वेळा—आपल्या आणि आपल्या सुकुमार अर्भकाची—भागवावयाची. भिक्षा मागावयाची नाहीं. मिंधेपणानं राहावयाचं नाहीं. धर्म सोडावयाचा नाहीं. मग जगण्याकरितां ताईच्या अवस्थेतल्या माणसांनीं काय करावयाचं ! असंच कारावयाचं ! तेंच ताई करीत! होती !

× × ×

मन जर्जर झालं. शरीर जर्जर झालं. ताईचं जिणं परस्वाधीन झालं. काम होईना. देह धरणीला पडला ! शरीर अस्थिपंजर झालं. मुलीला अंगावरचं दूध येईना. दोघींचे हाल वाढीस लागले. ताईला आतां आपल्या

जीविताचा भरंवसा वाटेनासा झाला आपण आतां इहलोक सोडणार असं तिला पक्केपणीं कळून चुकलं. एक दिवस तिनं कोणाच्या कीं हातीं मला मुद्दाम बोलावूं पाठविलं. मी ताईच्या बोलावण्यासरशीं गेलें. त्या वेळचं बोलावणंच असं होतं कीं, तें ऐकतांच पोटांत धस्स झालं! निरोपाचे शब्द उदासवाणें, गंभीर, घोगरे, भयसूचक वाटले. वाटलं कीं पुढं कांहीं तरी मोठा अनर्थ—अगदीं दत्त म्हणून उभा आहे. म्हणून त्यावेळीं घरीं कोणाची पर्वा केली नाहीं. कुणाचं ऐकलं नाहीं. कुणाला विचारलं नाहीं. निरोप ऐकला तशी तट्कन् उठलें आणखी चालायला लागलें.

× × ×

आई! आई! पण मी तिथें जाऊन काय पाहिलं! मला काय दिसलं! माझी अनाथ ताई त्या वेळीं कोणत्या स्थितींत होती!.........डायरींतले मधले शब्द कांहीं पुसटले होते—कांहीं पाणी पडून—आणि तें पाणी म्हणजे लिहितांना तापीबाईच्या डोळ्यांतून जो अविरत अश्रुवर्षाव चालला होता, त्यांपैकीं कांहीं थेंब त्यावर पडून कित्येक अक्षरें अजिबात पुसटलीं होतीं. कांहीं पानभर पसरली होतीं. मला तेथपर्यंत कसेंसेंच झालें होतें. वाचतां वाचतां माझाहि कंठ दाटून आला होता. डोळे पाण्यानें भरून आले होते! तापीबाईच्या अनाथ 'ताई'चा करुणाजनक, हृदयद्रावक चित्रपट अगदीं डोळ्यांपुढें स्वच्छ दिसावयाला लागून माझें मनहि भांबावत चाललें होतें. मला वाचवेना. आणि एक प्रकारें थांबवेना. कशीबशी मी पुढील मजकुराकडे वळलें. मी वाचीत होतें. माझें हृदय 'ताई'च्या दुःखानें शोकाकूल झालें. माझ्या सभोंवारची जागा शोकमग्न असल्यासारखें दिसलें. खोलीच्या चारी भिंतीहि 'ताई'च्या दुःखद कहाणीनें शोकाचे दीर्घ उसासे टाकीत आहेत, असेंच मला क्षणभर वाटलें. मी पुढील मजकुराकडे एखाद्या मंत्रमुग्धाप्रमाणें आपोआप खेचलें गेलें. पुढें होतें—

× × ×

माझ्या लाडक्या ताईच्या डोळ्यांत प्राण लुकलुकत होते. शेवटची घर-घर लागली होती. बहुतेक प्राणदीप मंदावत आला होता. ताईच्या त्या खोलींत सर्वत्र मृत्यूनं आपलं भयद ठाणं टाकलं होतं. त्या दवाखान्यांतील

एकीकडच्या खोलींत ताई एकटीच! दुसरं कोणी नव्हतं. कोण असणार? ताईची लहान बालिका पलीकडे रकन्यावर रडून रडून थकून झोंपी गेली होती! अंगावर माशा घोंगावत होत्या. ताईच्याहि अंगावर माशा घोंगावत होत्या. ताईला स्वच्छतेची फार आवड, पण ती आतां मृत्यूच्या दारांत पडली होती. मी तिच्याकडे पाहिलं. मला ब्रह्मांड आठवलं! कंबर मोडली. मी मटकन् खालीं बसलें! मला पाहिल्यावर ताईच्या त्या क्षीण डोळ्यांत एकच अश्रु आला! तिनं हलकेंच जवळ बोलावलं. मी जवळ गेलें. माझ्या ताईचं मस्तक मांडीवर घेतलं. ताईच्या अगदीं तोंडाजवळ तोंड नेलं. माझ्या ताईचं मी अतिशय कळवळून चुंबन घेतलं. हाय! हाय! माझी ताई! माझी ताई! मला रडूं आवरेना! माझ्या डोळ्यांतील पाण्यानं ताईच्या मस्तकावर पाऊस पाडला! मी तिच्या हनुवटीला हात लावून, डोळ्याला डोळा लावून गदगदून म्हटलें "ताई! ताई! हें काय हें! काय ही तुझी स्थिति!

× × ×

"रडूं नकोस! रडूं नकोस! रडण्यानें जात्या जिवाला जास्त कष्ट नाहींत कां होत! रडूं नकोस" ताई शांतपणानं मला सांगूं लागली. तसं मला अधिकच भडभडून यायला लागलं. ताईनं मजकडे टक लावली. मला म्हटलं, "ऐकशील का माझं एक!"

"काय"

"आतां इहलोक सोडतें आहे!"

मला हुंदका आवरला नाहीं.

"आतां रडून काय होणार! आणखी नुसतं रडून तरी काय होणार!" खोल आवाजांत ताई उद्गारली.

"मग क करूं तर!–"

"तेंच सांगायला मी तुला बोलावून आणलं आहे. तुझी ताई पवित्र आहे, शुद्ध आहे, धर्मनिष्ठ आहे, हें तुला तरी मान्य आहे ना!"

"हें काय बरं ताई विचारतेस!"

"पण लोकदृष्ट्या मी पतित आहे. धर्मभ्रष्ट आहे. जगांतून उठलेली

आहे, असा माझा दुर्लौकिक झाला आहे ना ! सगळ्यांनीं अगदीं माझी एकसारखी धिंडका काढली आहे ना ! पण मी अजून हिंदूंच आहे. धर्मनिष्ठ आहे. धर्मभ्रष्ट झालें नाहीं !–"

" पण ताई, हें तूंच कशाला सांगायला हवं ! "

" एवढ्याचकरितां कीं, मी या क्षणापर्यंत आपलेच संस्कार शिरसा वंदिले आहेत. आणखी मरणोत्तर माझे संस्कार हिंदूसारखेच व्हावेत अशी माझी शेवटची इच्छा आहे. एवढ्याचसाठीं मी तुला बोलावलं आहे. एवढं माझ्याकरितां कर. करशील ना ! होय म्हण म्हणजे मी सुखानं मरतें. माझ्या मुलीचा संभाळ करणंहि आतां तुझ्याच हातीं आहे. दुसऱ्या कुणाच्या हातीं तिला निरवूं ! माझी मुलगी ही हिंदूंच रहावी अशी इच्छा आहे ! परधर्मीय तिला संभाळतील, वाढवतील, संगोपनहि सुखानं–आनंदानं करतील. पण तसं कां व्हावं ! तिचा संभाळ कर. माझे अंत्यसंस्कार हिंदुपद्धतीप्रमाणंच होऊं देत. या दोनच माझ्या इच्छा आहेत ! "

× × ×

मी " होय ! तुझ्या इच्छेप्रमाणंच करतें ! " असं म्हटलं. ताईनं नंतर शांतपणानं डोळे मिटले. ताई देवाघरीं समाधानानं निघून गेली ! झालें !

× × ×

माझ्या हंबरड्यानं लोक जमा झाले. दवाखान्याचे दयाळू डॉक्टर, परिचारिका, आणखी इतर मंडळी जमा झाली. ताईबद्दल माझ्या सच्चारित्र्याबद्दल प्रत्येकाच्या तोंडांतून हळहळीचे शब्द बाहेर आले. सगळ्यांनीं माझं समाधान केलं. मी डोळे पुसले. ताईच्या मुखाचं–कडकडून चुंबन घेतलं. तिचं मस्तक खालीं ठेवलं !

× × ×

आतां पुढें !

× × ×

दयाळू डॉक्टरांनीं त्या अर्थानं मजकडे पाहिलं. मी भानावर आलें. माझ्यापुढेंहि तोच प्रश्न दत्त म्हणून आला ! डॉक्टरांच्या पहाण्याचा मतलब असा होता कीं, प्रेतसंस्कार आपण करतां कीं आम्हीं करूं ! डॉक्टरांनीं

तयारी दाखविली. ताईची मैत्रिण तेथें हजर होतीच. तिनें बोलूनच दाखविलं. तिच्यामुळं ताईशीं सहानुभूति व प्रेम बाळगणाऱ्या मुसलमान जातीच्या व पारशी जातीच्या चांगल्यापैकीं मैत्रिणी तेथें आल्या. त्यांनी पण तोच प्रश्न काढला व आपण ' ताई ' चे अंत्यसंस्कार करूं. काळजी करूं नका असं सांगितलं. मी हतबुद्ध झालें ! ताईचं प्रेत ख्रिश्चनच्या, पारशाच्या, मुसलमानाच्या हातीं देऊं ! कीं तिच्या अखेरच्या इच्छेप्रमाणें करण्याकरितां उठूं !

x x x

ख्रिश्चनच्या ताब्यांत ताईच्या शवाला दिलं तर काळ्या वस्त्रांत गुंडाळून काळ्या गाडींत घालून ते लोक आपलं पवित्र कर्तव्य म्हणून, आवश्यक म्हणून आपल्या ( cemetery ) कडे न्यायला सज्ज आहेत. मुसलमान मंडळी, जर मी परवानगी दिली तर आपल्या कबरस्थानाकडे पुढं गाणीं गात समारंभानें ताईच्या शवाला नेण्याकरितां मागत आहेत. पारशी भगिनींच्या कृपेनं तिचा बांधवगण ताईच्या शवाला आपल्या परमपवित्र " टॉवर ऑफ सायलेन्स " कडे न्यावयालाहि ना म्हणत नाहीं ! पण माझ्या ताईची अंतिम इच्छा काय होती ! मी ती कशीं विसरूं ! त्या सर्वांच्यापुढें मी माझ्या ताईची पवित्र इच्छा मांडली. तेव्हां त्यांनाहि निमूट बसावं लागलं. मी कर्माकरितां तिथून उठलें !

x x x

स्वामी सत्यदेवांच्या " हिंदुसंघटनेच्या " बिगुलाचा आवाज एकसारखा उभ्या हिंदुस्थानांत दुमदुमून राहिला आहे. स्वामी श्रद्धानंदजींच्या आणि त्यांच्याच प्रमाणें हिंदुसंघटनेची भेरी ठोकणाऱ्या आणखी कांहीं जीवांचे बळी पडलेले आहेत. त्यामुळं हिंदुसंघटनेची तीव्रता भयंकर भासूं लागली आहे. वर्तमानपत्रांतून लेख, प्लॅटफॉर्मवरचीं व्याख्यानं—सभांतून, क्लबांतून, जिकडे तिकडे ' हिंदुसंघटने 'ची जारीनं—चर्चा घोषणा चालू आहे.

**"हिंदु ना तूं हिंदवासी, बोल भाई, बोल भाई "**

असा रोकडा जबाब विचारणारे वीर पुढं येऊन छातीठोक विचारीत आहेत.

अशा रीतीनें हिंदुसंघटनेच्या प्रश्नाला एकसारखा ऊत आलेला असतां, त्या समाजापुढें माझ्या अनाथ ताईच्या अंत्यविधीचा प्रश्न पुढें आला आहे ! पण—

× × ×

जागा झालासा वाटणारा समाज अशा ऐन मुद्याच्या वेळीं पहावयाला गेल्यास कोणत्या स्थितींत दिसतो आहे ! मी पहायला गेलें.

× × ×

अगोदरच अत्यंविधीस पाठ फिरविणारा, चुकवाचुकव करणारा, युक्त्या प्रयुक्त्या काढणारा, सबबी सांगण्यांत पटाईतपणा दाखविणारा आमचा समाज–ताईच्या अंत्यविधीस धाऊन येईल हें शक्य कसें ! पण हें माझ्या ध्यानांतच आलें नाहीं. मी वेडी ! मी ताईची इच्छा प्रत्येकाच्या दारीं जाऊन निवेदन केली. प्रत्येकापुढं ताईचा शुद्धपणा, धर्मनिष्ठपणा मांडला.

" हिंदु ना तूं हिंदवासी बोल भाई, बोल भाई "

असा रोकडा जबाब विचारला. पण ऐनवेळीं कोणाच्या ऑफिसच्या कामाची गडबड निघाली. कोणाला जाणं धार्जिणं नाहीं असं दिसलं. कोणाला कंटाळा आला. कुणी या प्रकाराला भीत असतात, ( जसा कांहीं त्यांच्यावर हा प्रसंग यावयाचाच नाहीं. ) या सबबीवर त्यांनीं यावयाचं नाखुषीनं नाकारलं !

× × ×

जिथं माझी मुलं आपल्या मावशीला उचलायला येईनात. नाकं मुरडूं लागलीं. खिश्चनांच्या कळपांत गेलेल्या ' बाई 'ला उचलायला गेलों तर समाज वाळींत टाकील या मरणाला दचकूं लागलीं, तिथं दुसऱ्याला मी बोल कशाला लावूं !

× × ×

तरी सगळ्यांची पायधरणी लाजभीड सोडून केली. अवघा दिवस आणि रात्र भिरभिर हिंडलें. ब्राह्मण मिळेनात. ब्राह्मणेतर पाहिले. पोटार्थी, अन्नार्थी छकडेवाले, गरजू पहिले. दुसऱ्या दिवशीं संध्याकाळपर्यंत एक दोघे तयार झाले. त्यांनीं दाम मागितला त्यापेक्षां अधिक देण्याला मी राजी झालें. या लोकांनीं येऊन पाहिलं. दीड दोन दिवस होऊन गेल्यामुळें प्रेत अधिकच

भेसूर झालं होतं. दुर्गंधीही यावयाला लागली होती! तें पाहूनच ते लोकहि आलें तसे परत गेले. उदारपणा एकानंहि दाखविला नाहीं त्यातही अन्य धर्मीय लोक अजून न्यायला, प्रेतयात्रा काढून त्याचा अंत्यसंस्कार करायला सज्ज होते!

येऊन परत जाणारे लोक कोणा शाहिराचे उद्गार ऐकतच होते—

× × ×

हिंदु ना तूं हिंदवासी बोल भाई, बोल भाई!

पण त्याचा प्रकाश कुणाच्या डोक्यांत पडत होता?

× × ×

मी अगदीं हतबुद्ध झालें, निराश झालें. माझं रडूं संपलं. डोळ्यांतलं पाणी आटलं. मला आतां सगळ्या जगाचा राग आला. संताप आला! काय करूं आणि काय न करूं!—असं होऊन गेलं होतं. काय करूं? कसें करूं? 'ताई'ची अंतीम इच्छा कशी मी शेवटास नेऊं?

× × ×

देशोद्धारकांना भेटलें, देशभक्तांना गांठलें, श्रीमंतांना गांठलें, गरीबांना विनाविलें. सगळ्यांच्या पुढें पदर पसरला. माझी ताई निष्पाप आहे, पवित्र आहे, तिची अखेरची इच्छा अशी होती तेवढी पुरवा. अन्यधर्मीय अजून तिच्या प्रेताची यात्रा सन्मानानं काढायला तयार आहेत; पण आपण हिंदुधर्माचे पुरस्कर्ते आहांत. हिंदुधर्माची घोषणा करतां आहांत म्हणून तुम्हांला त्या शवाची व्यवस्था मृताच्या अखेरच्या इच्छेप्रमाणं करणं कर्तव्य आहे." असं जीव तोडून सांगितलं. तरी एकाचीहि वाचा वदली नाहीं!

× × ×

हाय! हाय! काय या हिंदुधर्मीयांची अधोगति! आणि म्हणे हे हिंदुसंघटन करणार!

चल! जीवा! इतकं सहन करण्यापेक्षां, ताईच्या शवाचे आणखी हाल करण्यापेक्षां कुणी का तिचा सन्मान करीना! असें म्हणून वैतागलें आणि डॉक्टरांच्या कानावर घालायला निघालें! काय करूं तर!

× × ×

हिंदु ना तूं हिंदवासी बोल भाई ! बोल भाई !

अजूनहि शब्द वातावरणांत घुमत होते. दवाखान्याच्या दारांत एक मनुष्य भेटला. हिंदु बरा दिसला. एकटाच चालला होता. तोहि मनांतल्या मनांत "हिंदु ना तूं..." हेंच गुणगुणत असावा, असं वाटलं. पुन्हां मनांत आलं. त्याची परीक्षा पहावी. नाहींतर खिस्ताच्या ताब्यांत द्यायचंच ठरविलं. समोर थांबलें. त्या गृहस्थास थांबविलें. त्याच्यापुढें "ताईच्या शवाचा पाढा वाचला ! विनवणी केली ! तो आँ करून मजकडे पहात राहिला. वाटलं कीं ऐकून तोहि तसाच इतरांप्रमाणं कांहीं तरी सबब सांगून चालता होणार. क्षणभर स्तब्ध उभा राहिला.

× × ×

पण त्याला दया आली. त्यानें अनपेक्षित 'ठीक आहे' म्हटलं. अर्ध्या पाऊण तासांत त्यानें तयारी करतों म्हणून सांगितलें. आश्वासन देऊन चालता झाला.

× × ×

आश्वासनाप्रमाणं आपल्या पांच पंचवीस छात्रगणांसह आला. 'अनाथ' शवाची व्यवस्था झाली. ताईची बाळ देखील त्यानं आपल्या ताब्यांत घेतली, आणि अण्णा कर्व्यांच्या 'आश्रमांत' आपल्या खर्चानें ठेवण्याचं त्यानं ठरविलं.

× × ×

कळलें कीं तो कोणी अण्णा कर्व्यांचा सच्चा शिष्य होता. त्यानंहि अण्णा कर्व्यांचंच समाजसेवेचें व्रत चालविलं आहे. त्याचं एक स्वतंत्र स्कूल आहे.

× × ×

झालं. अखेर माझ्या ताईची अशी व्यवस्था झाली. एकदां ताईची अंतिम इच्छा पूर्ण झाली. हिंदुधर्माप्रमाणें सर्व अंत्यसंस्कार झाले. मुलीची व्यवस्था लागली !

× × ×

आतां मी, ताईची आठवण, आणखी अखंड रडं !"

× × ×

गोष्ट झाली. माझ्या डोळ्यांत अश्रुप्रवाह वाहूं लागला. तापीबाई आंतून बाहेर आल्या. त्यांच्या रडण्याला खळ नव्हताच, आम्हीं दोघी किती तरी रडरड रडलों.

× × ×

" तापीबाई ! मी ही तुमची डायरी प्रसिद्ध करूं का ?" मी विचारलें. त्यांनीं मोठ्या कष्टानें परवानगी दिली. मोटेपणाची पोकळ प्रौढी मिरविणारा आमचा समाज ताईसारख्या 'अनाथे'ला किती छळतो, तिच्या प्रेताचे सुद्धां किती हालहाल करतो, हें एकदां त्याला कळूं दे तरी !" मी अत्यंत कठोरपणानें म्हटलें. तापीबाईनीं कबुली दिली !

× × ×

आणि संपादक महाशय, तापीबाईची ही 'रोजनिशी' मी आपल्याकडे जशीच्या तशीच मला बरी वाटली म्हणून पाठविली. आपण तिची वाटेल ती व्यवस्था लावावयाला समर्थ आहांतच. यापेक्षां मी आपल्याला काय सांगूं ?

---

# वेणींतलें फूल ! : : : २

## [ १ ] हांसत.

कॉलेजमधला शेवटला अवर संपला कीं तडक रेसिडेन्सितल्या आपल्या रूममध्यें यावयाचें. हातांत असलेलें ' कागदीं शहाणपणाचें ओझें ' तसेंच कसेंतरी टेबलावर फेंकावयाचें, कपडे काढून टाकावयाचें, आणि अगोदर ' स्टोव्ह ' शिलगावयाचा ! दूध, चहाचा व साखरेचा डबा, गाळणें, कपबशा–इत्यादि आयुधें एकदमच जवळ जमा करून ठेवावयाचीं. आधण, कपानें पाणी मोजून दर टाकावयाचें व आतांपर्यंत कशाबशा आवरून धरलेल्या सिगारेटच्या मोहाचें, फिरावयाला जातांना घालावयाच्या कोटांतल्या खिशांतून सिगारेटची पेटी काढून सिगारेट स्टोव्हवरच पेटवून तोंडांत घेऊन, पारणें फेडावयाचें. यावेळीं शाळासोबती ( कॉलेजबंधु ) दोन तीन तरी चहाला हटकून असावयाचेच ! ते येईपर्यंत ' चहा ' बहुतेक कपांत ओतून घेण्याइतका झालेला असावयाचाच !–आले कीं 'चहा' ओतावयाचा. ज्याचा त्यानें ' चहाकप ' उचलून घ्यावयाचा ! त्या दिवशींच्या ' कॉलेजमधील एखाद्या विशेष घडलेल्या गोष्टीवर, किंवा एखाद्या अजागळ प्रोफेसराच्या बोलण्यावर, पोकळ ज्ञानावर, शामळो पोषाखपद्धतीवर, किंवा कशावर तरी ' विनोदप्रचुर ' चर्चेला कोणाकडून तरी सुरवात व्हावयाची व त्या चर्चेंत ओघाओघानें मग सर्वांनीं भाग घ्यावयाचा !

हा ओघ सुरू असतांच–' कपबशा, केटली, गाळणें, वगैरे जेथल्या तेथेंच टाकून–फिरावयाला जायचा पोपाख नीट नेटका ( कॉलेजी छानछोकीचा ) करून ' हॅः हॅः फॅः फॅः ' करीत करवीत **कॉलेज टेकडीकडे** अगदीं ठरावीक रस्त्यानें ठरावीक ठरलेल्या बसण्याच्या चवुतऱ्यापर्यंत जाण्यासाठीं फिरावयाला निघावयाचें.

थोडक्यांत म्हणजे अभ्यासाशिवायचें, घरून वेळच्या वेळीं येणाऱ्या दरमहाखर्चाच्या––अवेळीं आली तर मनिआर्डरीच्या काळजीशिवायचें––हें

आमचें आनंदाचें, स्वातंत्र्याचें, मजेचें, हौसेचें, चैनीचें, सुखाचें, गंमतीचें नवलयुग--बहारीचें कॉलेज–लाईफ म्हणावयाचें !

हंसायचें हंसवयाचें. फॅशनेबल वागावयाचें; तसें वागत नसतील त्यांच्याकडे तुच्छतेनें पहावयाचें, या पलीकडे आम्हांला दिसण्याचें तें आमचें लाईफच नाहीं !

आम्ही, आमचा कंपू. किंवा आमच्या मताची जी आम्हांला मंडळी मिळतील---दिसतील, ती काय ती शहाणी सुरती, विद्वान, किंवा 'माणसें' म्हणण्याच्या लायकीची, या व्यतिरिक्त कोणीहि, लहानमोठा, श्रीमंत, सत्ताधारी, वृद्ध, असो, त्याचें शहाणपण आमच्यापुढें कःपदार्थ ! ही आमची अगदीं टाम प्रामाणिक समजूत ! इतकीच आमची पुस्तकाबाहेरच्या जगाविषयाची समजूत, माहिती व त्याबद्दलची आम्हाला पर्वा !

जग मूर्ख---आम्ही कॉलेजवासी काय ते शाहणे ! आम्हाला सगळ्या जगाला मूर्खांत, अजागळांत, आडाण्यांत, बिनदिक्कत, लोटण्याचा अगदीं पूर्ण हक्क ! जगाच्या कोणत्याहि आम्हाला न आवडणाऱ्या कृत्याला हंसण्याचा जन्मसिद्ध अधिकार काय तो आमचाच !

आमच्या कॉलेजांतल्या कल्पना केवढ्या ! विचार किती उंच भरारीचे. भावना किती तीव्र–जाज्वल्य ! कॉलेजांतलें आमचें म्हणजे सगळेंच कांहीं और ! आमचेंच खरें ! आमचेंच बरोबर ! आमचीच पूर्वदिशा !—पण तें खरें नव्हे, सर्वस्वी तरी खरें नव्हे, याची अंधुक तरी कल्पना त्यावेळीं कोणाला असणार !--त्यावेळीं असती तर !--असती तर आणखी काय हवें होतें !—ती कल्पना असती तर चालू जगांतले किती अनर्थ टळले असते, किती जिवांच्या जन्माची ' राख ' व्हावयाची वाचली असती !— हें सर्व पुढें कळतें—आतां मला देखील कळावयाला लागलें आहे—पण त्या कळण्याचा आतां कांहीं एक उपयोग नाहीं—नसतो ! ' बुंदसे गई तो हौदसे नई आता ! '

मी कॉलेजमध्यें हंसत होतो. मंडळींना हंसवीत होतो. कित्येकांना हास्यास्पद करीत होतो. पण आतां !—जग कोणाला हंसतें, कोणाचा उपहास

करतें ! कोणाच्या जीवाच्या यातना उडत आहेत !--तेंच मला सांगावयाचें आहे !

कॉलेजमधल्या बेजबाबदार लाईफचा ' **हांसत हांसत** ' विनियोग सर्वांप्रमाणेंच मी केला. सर्वांप्रमाणेंच मी हंसलों. हंसण्यासारख्या--हंसविण्यासारख्या कृति केल्या. आणि त्याच कृतींनीं आज मी--पण तें मी एकाच वाक्यानें कसें सांगूं !–त्याकरितां मला माझी सगळी गोष्टच सांगितली पाहिजे.

कॉलेज–लाइफ म्हणजे हंसण्याचेंच ! माझें लाइफ हंसतच चाललें होतें. एक दिवस माझें हंसणें--माझ्या मित्र मंडळींचें, अगदीं कळसाला पोंचलें! मित्रमंडळींनीं कळस गांठावयास लावला ! मी कळस गांठला ! जें कांहीं केलें, जें कांहीं झालें, तें सगळें ' हांसत--

## [ २ ] कर्म करावें—

होय ! आम्ही प्रत्येक गोष्ट हंसत, सहज, लीलेनें, गमतीनें, अगदीं हंसण्याच्या हेतूनेंच केली. आमच्या क्लासांतली **मिस् लिली** हिची क्लासांत, किंवा बाहेरहि अगदीं अल्लडपणानें, निर्मल भावनेनें, मित्रमंडळींच्या वाढत्या प्रोत्साहनानें मनमानेल तशी कुचाळकी करून हंसण्यांत, हंसविण्यांत धन्यता-इतिकर्तव्यता मानीत होतो, तें सुद्धां वरील कारणानेंच !

कॉलेजमधल्या विद्यार्थिनींची थट्टामस्करी करण्याचा, त्या फाजील लाजाळू असतील तर त्यांची लाज कमी करण्याच्या सदुद्देशानें, किंवा जास्त निर्लज्जपणा ( वागण्यांत ) दिसल्यास, त्यांची लाज यथाप्रमाण व्हावी, या उच्च हेतूनें–तशी थट्टामस्करी करण्याचा विद्यार्थ्यांचा सांगून सवरून हक्क आहेच आहे ! अशी कामगिरी शिरावर येऊन पडली असतां ती तत्परतेनें कोणता विद्यार्थी बजावणार नाहीं ! बरें ही कामगिरी बजावतां बजावतां आम्हीं कॉलेजस्टूडंट ' हंसलो '—हंसण्याचें रेम्यूनरेशन घेतलें, तर त्यांत कोणाचें काय गेलें !

मिस् लिलीच्या–ती आमच्या वर्गात आल्यापासून–आम्ही तिच्या खरोखरच पाठीस लागलों होतो म्हणा ना ! क्लासांत आल्यापासून ती बाहेर पडेपर्यंत ठरावीक ठिकाणीं बसे. लेक्चररकडे पूर्ण अवधान ठेवी. स्त्रीसहज

शालीनता न सोडतां चौकसपणानें प्रश्न वगैरे विचारी ! विद्यार्थ्यांना ती भीत नसे, लाजत नसे, गांगरत नसे. तशी ती उद्धटपणानें, किंवा आचरटपणानें तोऱ्यानेंहि वागत नसे ! पण आम्हां मुलांना तें काय होय ! एकदां आमच्या मित्रमंडळींच्या कमेटींत एकमतानें टरलें कीं यथाशक्ति–यथामती मिस् लिलीला–अगदीं उगीच गमतीनें अं ! केवळ हंसण्याकरितांच— भंडावून सोडावयाचें ! त्याप्रमाणें आम्ही ' शुभं च शीघ्रं ' या न्यायानें त्या पवित्र कामाला लागलोहि ! रोज कांहीं ना कांहीं युक्ति काढावयाची व मिस् लिलीला तखलीफ देऊन–तिची तिरपीट उडवून आपण इकडे 'कसा मजा आला ! ' म्हणून हंसत सुटावयाचें ! युक्त्या काढून अमलांत आणण्यांत माझ्या मित्रमंडळींनीं मजकडे पुढाकार दिला होता. मीहि तो आपल्याकडे घेतला होता ! माझ्या खटपटीनें, प्रयत्नानें, माझ्या मित्र-मंडळीस 'हास्या'ची मेजवानी देतां येते, एवढाच माझ्या मनाला आनंद ! करी मी व हंसत सगळे जण ! मी हंसे, पण माझें हास्य वाह्यातासारखे न दिसणारा चेहरा ईश्वरानें मला दिला आहे ! मी कांहींसा गंभीरच दिसतों ! त्यामुळें आमच्या कृति मिस् लिलीला एकादेवेळीं असह्य झाल्या, व तिनें तीव्र दृष्टिक्षेप केला, तर आमचे मित्रमंडळ हंसें आंवरीत आहे व मी मात्र अगदीं सागरासारखा गंभीरच आहे, असें तिला दिसून येई ! व मी मिस् लिलीच्या मनोराज्यांत निरपराधी ठरे, असा माझा वेळोवेळीं खात्रीचा अंदाज होई ! त्यामुळें स्वाभावीकच हांसत 'कर्म करावें' या आमच्या हेतुला उत्तेजन येई !

मिस् लिली ! खरोखरच गोड पोरगी ! सालस ! हुशार ! देखणी ! नीटस् ! सभ्य ! सर्व कांहीं लिलीच्या ठिकाणीं दृग्गोचर होत असे ! ख्रिश्चन ब्राह्मणाची मुलगी ! पण म्हणेल कोण तिला तसें ! जेवतांना, चहा घेतांना, निजतांना, केव्हांहि ठरल्यावेळीं हातांची बोटें एकमेकांत घालून मान किंचित् वाकडी करून व डोळे मिटून क्षणभर पवित्र येशूची प्रार्थना ती सर्वांबरोबर घरीं करीत असेल, किंवा पवित्र 'सब्बाथ'ही पाळीत असेल पण एरव्हीं वागणें म्हणजे शुद्ध ब्राह्मणी थाटाचें—त्यांतूनहि अगदीं कॉलेजी पद्धतीचें ! त्यामुळें कोणाहि विद्यार्थ्याला तिच्याशीं घसट पाडण्याची, सलगी

करण्याची, इच्छा होण्यास कोणताच अडथळा होत नसे. कोणी उघड, तर कोणी पर्यायानें मिस लिलीशीं बोलण्याचालण्याचा 'प्रसंग' कसा साधेल याचा विचार करीत असे. कोणी आपल्या कवितेमार्फत, तर कोणी लेखामार्फत आपली ' मूक इच्छा ' लिलीपर्यंत पोंचविण्याचा प्रयत्न करी. हुशार पण कुरूप विद्यार्थ्यालासुद्धां लिलीनें आपल्याकडे अभ्यासांतल्या डिफिकल्टीज सोडविण्यास आपण होऊन यावें किंवा आपण तिच्याकडे जावें, आपल्या कुरूपतेवर नाहीं तर हुषारीवर तरी लिलीनें कां न भाळावें, या अहंपणाच्या विचारानें घोंटाळवावें; तर एखाद्या गुंड-पण श्रीमंत पोऱ्यानें आपल्या उंची ऐटबाज सूटावरच लिलीनें आपली दृष्टि खिळविली पाहिजे, म्हणून आपल्याशींच उद्गार काढावे !

विद्यार्थ्यांचे हें नानाचार मला दिसत; कळत, इतकेंच काय, पण त्या विद्यार्थ्यांप्रमाणेंच लिलीशीं आपलें संघटन—कां कोण जाणे !—असावें, असें मनापासून नेहमीं वाटे ! व मी कांहीं त्याकरितां प्रयत्नहि करी ! ' कविता—लेख ' हा माझा विषय नव्हे—मी तसा श्रीमंतहि नव्हे—हुषारींच्या यादींत माझें नांव चुकूनहि कॉलेजमध्यें झळकलें नाहीं. मग 'लिली'शीं संघटन व्हावयाला मला साधन काय ? माझ्या मित्रमंडळांत मधूनमधून या विषयीं छोटीमोठी चकमक उडेहि ! प्रत्येकाजवळ कांहीं ना कांहीं लिलीला विन ( win ) करण्याचा गुण निघावयाचा, पण माझ्या मात्र वांट्याला तसा कोणताही गुण नसल्याचें सर्वानुमतें ठरे. मजजवळ जर कांहीं असेल, तर दिसावयाला शांत-गंभीर—सरळ स्वभावी चेहरा. पण स्वभाव मात्र थट्टे-खोर—विनोदी ! पण केवळ थट्टा—विनोदानें कां मिस् लिलीसारखीचें हार्ट विन करतां येत असतें !—सर्वांनीं असेंच म्हणावें व मी तें खरेंहि मानावें.

परंतु हें सगळें जरी खरें असलें, तरी लिलीशीं वेड्यावांकड्या वळणांनीं संघटन करणाऱ्यांविषयीं, तिच्या निष्कारण चेष्टा—कुचाळी करणाऱ्या—निदान तिच्या दृष्टीनें जें तसें करताहेत असें वाटे, त्यांच्याविषयीं लिली प्रसंगोपात्त उघड तिरस्कार व्यक्त करी—पण देव जाणें ! माझ्याविषयीं तिच्या वागण्यांत वगैरे एक प्रकारचा भलेपणा—असल्याचें मला दिसे एवढें खरें !

या एकाच मुद्यावर मी सुतानें स्वर्ग गांठण्याच्या न्यायानें आमच्या मित्रमंडळाच्या मुळींच लक्ष्यांत न येऊं देतां—मिस् लिलीच्या घरापर्यंत पल्ला पोंचवून तिच्यामुद्धां तिच्या आई—बाप—बहीण—भावांशीं देखील अगदीं घरोब्याचा परिचय, अगदीं अल्पकाळांत करून घेतला—माझ्या अपेक्षेप्रमाणें परिचय झालाही! मी मधूनमधून मिस् लिलीच्या घरीं त्यांच्या 'चहा' च्या वेळीं हजर होऊन 'चहापार्टी' चा लाभ घेई. श्री. वरेरकरांच्या "संन्याशाच्या संसारांतील" शास्त्रयाला गुल्लु साहेबांच्या घरीं 'चोरून चहा' घेण्यांत, जें महत्व व भाग्य वाटत असे, त्याप्रमाणेंच किंबहुना त्यापेक्षां कितीतरी पटीनें माझा मिस् लिलीच्या घरीं 'चहापान'बाबतचा आनंद वाढता होता, हें काय सांगावयाला पाहिजे!

इकडे मित्रमंडळींत अगदीं खुल्या दिलानें मिस् लीलीला कुचेष्टेनें—थट्टेनें त्रास देण्यांतहि मी तितकाच दक्ष! या कानाची बातमी त्या कानाला नाहीं या प्रमाणेंच लिलीच्या घरोब्याची गोष्ट मित्रमंडळापासून मी गुप्त राखिली होती, हें जितकें खरें तितकेंच मित्रमंडळी चेष्टा—मस्करी करतात त्यांत मी अप्रत्यक्ष भाग घेतों, हें सांगितलें नव्हतें, हें तितकेंच खरें. मित्रमंडळांत व मिस् लिलीच्या घरीं माझ्या सभ्यपणाची पत सारख्याच दर्जाची रहावयाला जर कांहीं कारण असेल तर माझा 'बावळट' चेहरा व तदनुरूपच बाह्य चलणूक!

मिस् लिलीचा परिचय झाल्यापासून अर्थातच मी क्लासांत किंवा बाहेर कुठेंही 'मिस् लीलीचा' पाठपुरावा करून सतावण्याच्या प्रसंगीं मित्रमंडळाच्या टरलेल्या योजनेंत भाग घेई. परंतु एखाद्या क्लृप्तीचा प्रवर्तक होत नसे. प्रवर्तक होऊं नयेसेच वाटे.

एकदां भर क्लासांत प्रोफेसरांची लेक्चरबाजी चालू आहे, छात्रगण—नोटस् घेण्यांत, किंवा घेतोसे दाखविण्यांत तल्लीन झाला आहे, त्याच वेळीं मिस् लिली बसली होती, मुद्दाम त्या सुमरानेंच आम्ही मित्रमंडळींसह माडीवर बसलों असतां आमच्या मन्याबापूनें चार पैशांचा बर्फ आणून—हातरुमालांत ठेवून—त्याचें अभिषेकपात्र मिस् लीलीवर पडेल अशा बेतानें धरून—कॉलेज अवर चालूं असतां 'मृच्छकटीक' मधल्या पावसाच्या 'सीन'चा मजा

आणला ! मिस् लिलीला अवर चालू असतां जागचें उठतां येईना ! वरून काय चमत्कार होतो हें मर्यादातिक्रम करून पाहतां येईना ! पाहिलेंच तर मी व आमचे मित्रमंडळ ! तेव्हां आमच्या कंपूला असला टारगेपणा मी करूं देईन, हेंहि तिला पटेना ! सारांश, आमच्या मित्रमंडळानें थट्टेची पायरी येथपर्यंत नेली, हें मात्र मला मुळींच आवडलें नाहीं ! मी शब्दांत 'निषेध' करण्याच्या बेतांत आलों होतों. पण 'कां ? तुझें तिकडे कांहीं संधान लागलें आहे वाटतें ! ' असा उद्धार व्हावयाचा म्हणून माझे मलाच मूग गिळून बसावें लागलें ! त्यामुळें स्वाभाविकच 'रामाय स्वस्ति रावणाय स्वस्ति' या न्यायानें मित्रमंडळांत मित्रांच्या सारखा—व लिलीच्या घरीं लिलीप्रमाणें असें वागतां येऊं लागलें.

* * *

आज आम्ही कॉलेज सुटतांच ठरल्याप्रमाणें मित्रमंडळींसह फिरावयाला बाहेर पडलों. नेहमींचा रस्ता आज आमच्या पायांना मिळाला नाहीं. चाललों तिकडे चाललों असें झालें. वाटेंत एक फुलान्याचें दुकान लागलें. आमच्यांतील एकाला उगीचच फुलें घ्यायची इच्छा झाली. 'एकाचें पाहून आम्ही सर्वांनींच घेतलीं. फुलें झोंळींत हुंगीतच चाललों !—योगायोग किती चमत्कारिक—आम्हीं जिकडे दूरदूर गेलों होतों, तिकडेच आमचेहि पुढें मिस् लिली फिरायला—आणि तीहि एकटीच आलेली! आम्हां सर्वांच्या दृष्टीस पडली. तिनेंही आम्हांला पाहिलें ! आम्हांला पाहिल्यावर, हंसली, रुसली, ओशाळली, कीं गांगरली, हें मला तरी निदान कळलें नाहीं—

आमच्या मित्रमंडळास मिस् लिलीच्या वाटेस जाण्याची हुक्की त्या ठिकाणीं आली ! तो क्षण कोणत्या प्रकारचा होता हें मला सांगतां येत नाहीं ! मित्रमंडळीनें ठरविलें कीं, या वेळीं अस्मादिकांच्या हस्तें मिस् लिलीची थट्टा करावयाची ! माझ्या हातांत आघाडीचें निशाण दिलें. मला नाहीं म्हणतां येईना !—आजवर बाह्यतः तरी निदान 'स्त्रीदाक्षिण्याची मर्यादा' संभाळून तरी मिस् लिलीचा थट्टेचा छळ होत असे. पण माझ्या वेळीं माझ्या मित्रमंडळानें तोहि नियम काढून घेतला ! व मला बजावलें, "लेका हिंमत असेल तर मिस् लिलीच्या डोकींत हातांतील फूल घालून येशील !

गाढूं या तुझी छाती !—ती काय बोलून चालून खिस्त्याची पोरगी ! आपल्याकडच्या लाज भिडेच्या खुळ्या चाली तिच्याकडे नाहींत ! तेव्हां तुझ्या फुलाचा स्वीकार करावयाला कमी करायची नाहीं ! आम्हाला फक्त तुझें शौर्य पहावयाचें आहे ! आजवर आम्हांला पुढें करून तूं मागें राहिलास. कृतीचे अधिकारी आम्ही व हंसण्याचा मक्ता तुझा ! त्याच्या उलट आज झालें. पाहिजे. ”

काय करणार ! मित्रांच्या या विचित्र भरीला बळी पडावें लागलें. मित्रमंडळापुढें प्रतिज्ञा करून निघालों. मित्रांना जितकें मिस् लिलीच्या डोकींत फूल घालण्याचें मजवर सोंपविलेलें काम अवघड वाटत होतें, तितकें मला तें अवघड नव्हतें. हें त्यावेळच्या माझ्या मित्रांना—त्यांचा समजच मुळीं मी तशा प्रकारचा कायम ठेवल्यामुळें, त्यांना वाटत होतें. पण मी, आमच्या लिलीच्या घरीं वाढलेला घरोबा वर वर्णन केल्यावरून आपल्याला माझ्यासारखेंच वाटेल कीं ‘लिलीच्या वेणींत फूल घालणें मला सोपें होतें ! खरेंच सोपें होतें व सोपें झालेंहि !

× × ×

मी मिस लिलीजवळ गेलों. मित्रमंडळ दूर उभें राहिलें. त्यांच्याकरितां भीतभीत अडखळत जातों आहे असें दाखवीत होतों. पण तसें करण्याचें मला कारणच नव्हतें. मी जवळ आलेला पाहून लिली उभी राहिली ! हंसली मित्रांनीं पाहिलें. त्यांना वाटलें असेल माझ्या बावळट आचरटपणाला ती हंसली. मी जवळ आलेला पाहून तिला आनंद आला ! आम्ही निर्मळ मनानें हस्तांदोलन केलें. मी फुलें पुढें केलीं ! तिनें त्यांचा स्वीकार केला ! एक फूल माझ्या हातांतच राहिलें. मी हंसलों—लिलीला—म्हटलें, थोडेंसें त्यावेळीं धाडसच केलें म्हणाना ! कारण इतका घरोबा वाढला होता तरी त्यावेळीं हृदय धडधडायला लागलेंच !—“लिली, हें फूल तुझ्या वेणींत छान शोभेल नाहीं ! ” लिलीनें एक बहारदार मुरका मारला ! मी बेहोष झालों ! किती सुन्दर लिली मला त्यावेळीं दिसली ! वेणी तशीच पाठीवर सोडलेली ! चाकोलेट रंगाचें—रेशमी कांठाचें—तलम पातळ टापटिपीनें बिन कासोटयानें नेसलेली ! पायांत चकचकीत बूट ! उभट चेहरा ! बोलणें—बोलणें अहाहा! काय सांगूं! खिश्चनी

वळणाचें—किती लाडकें अगदीं अंतःकरणाला मधुर प्रेमाचा पाझर फोड-णारें ! त्यांतून आमचा तितका घरोबा वाढलेला ! आत्मियत्वांत घरोब्याची भर पडलेली !—मी लिलीच्या वेणींत फूल खोंवलें ! तिनें खोवून घेतलें !- मित्रमंडळी पहात होती ! पण लिलीच्या गांवींही तें नव्हतें ! लिलीनें दुसरे दिवशीं चहाचें आमंत्रण दिलें. मी स्वीकारलें. औपचारिक कांहीं बोलून आम्ही परस्परांचा निरोप घेतला !

× × ×

मित्रमंडळींत आलों. मंडळीनें माझ्या शौर्याबद्दल पाठ थोपटली ' असलींच बावळट माणसें प्रसंगीं अचाट कार्यांचे प्रवर्तक होतात ! असें म्हटलें ! मंडळी हंसली !

मी हसलों ! पण खरेंच सांगावयाचें तर मला नीट हसूं आलें नाहीं कृत्रिम हंसावें लागलें ! माझ्या शौर्याबरोबर—लिलीच्या निलाजरेपणावरून —खिस्त्यांच्या सैल वर्तनक्रमावर खूप मंडळानें भडिमार केला ! आम्ही फिरून परत आलों ! मला सारखी हुरहुर लागली ! माझें मन मला एक सारखें विचारीत सुटलें— ' हांसत कर्म करावें " म्हणतात, त्याप्रमाणे केलेंस, पण पुढें !—पुढें काय !—

## [ ३ ] भोगावें रडत तेंचि !—

कॉटवर सारखा तळमळत पडलों होतों ! विचार एकच नाचत होता ! ' पुढें काय ! ' हांसत कर्म करावें—केलें झालें ! थट्टेकरितां, विनोदाकरितां मित्रमंडळाच्या साध्या करमणुकीकरितां—स्त्रीजातीच्या उपहासाकरितां—हृद यांतल्या प्रेमपादपाची वाढ व जोपासना करण्याकरितां—कशाहिकरितां म्हणा करणी केली पण ! पण—तें भोगण्याची पाळी आली तर—आणि हजा हिश्शांनीं ती यावयाचीच. सिद्धांतच आहे हा !—मग पुढें काय करावयाचें किती तरी वेळ मीं जागाच होतों. झोंप येईना. दिवा लावला. अभ्य साला बसावयाचा प्रयत्न केला. ब्रह्मांड अभ्यास पडलेला ! पण अं हं पुस्तक उघडलें, तर त्यांत मला अक्षरेंच दिसेनात ! दिवा मालवला फिरून अंथरुणावर पडलों ! झोंप लागली ! झोंपेंत सारीं दिवसाचीं स्वप्नें ! गेल्या वर्षातल्याच सान्या हकीकतींचीं स्वप्नें. स्वप्नांत मित्रमंड

अजिबात लुप्त झालें ! मी मिस् लीलीच्या घरीं प्रथम कोणत्या कारणांनीं, कसा, कां गेलों ! तिच्या बापानें–आईनें–बहिणीनें तिनें, माझें सप्रेम स्वागत कसें केलें, मी दिसायला गरीब–बावळट–असा असतांहि माझ्या गुणांचाच गौरव त्या ख्रिश्चन फॅमिलीनें मनसोक्त कसा केला. माझें जाणें येणें–मित्रमंडळाला चुकवून—कसें वाढत गेलें–मला व लिलीला–आम्हीं दोघें बोललों नाहीं तरी परस्परांविषयीं प्रेमोद्भव ( शुद्ध कीं अशुद्ध हें सांगतां येणें कठीण आहे. ) झाला आहे, परस्परांना, व लिलीच्या घरच्या वडीलधाऱ्यांना कसें कळून चुकलें आहे. तरी देखील त्यांचें मजशीं पूर्व प्रेमाचें वागणें आहे ! ही स्वप्नाची लांबण लांबतां लांबतां बाह्यतः मित्र- मंडळांच्या प्रोत्साहनानें, तर ' आंतरःकोपि हेतुः ' या न्यायानें उत्कट प्रेमाच्या जोरावर मित्रमंडळाला चीत करण्यासाठीं मिस लिलीच्या वेणींत फूल घाल- ण्याच्या कालच्या कार्यापर्यंत लांबली–आणि त्याच्या पुढची आनंद–कीं दुःखाची परिस्थिति स्वप्नांत अनुभवायचा रंग होता, पण त्याच वेळीं झोंपेंतच या कुशीवरून त्या कुशीवर वळण्याच्या धांदलींत कोपराला कॉटच्या कांठाचा तडाखा लागला, व मी ती स्वप्नसृष्टि तितकीच अर्धवट सोडून जागा झालों !

त्या वेळीं चांगलें उजाडलें होतें. क्लबचा नोकर खिडकींतून–मी उठलों आहे कीं नाहीं हें पाहत होता. त्याला खोली झाडायची होती. मी डोळे उघडले. चटकन् उठलों. खोलीचें दार उघडलें. नोकर आंत आला ! त्यानें माझ्या हातांत माझीं दोन पत्रें दिलीं, ' अरे ! आज मला उठायला फारच वेळ झाला ! पोस्टमनसुद्धां येऊन गेला ! ' असें कांहींतरी पुटपुटलों नोकर आपलें काम उरकून चालता झाला ! मी चूळ भरली. आणि 'चहा' करितां स्टोव्ह पेटविला. आणि पत्रें फोडून वाचण्यास लागलों. रात्रीच्या स्वप्नाचा परिणाम मनावर अजून जशाच्या तसाच होता. त्यांतच पहिलें पत्र वाचूं लागलों तो तें पत्र हें होतें:—

हंटररोड–येशूव्हीला.

Date..............19...

माय डिअर × × ×

लिलीचें ' चहा ' चें निमंत्रण स्वीकारून तुम्हीं आला नाहींत. आम्ही

फार वाट पाहिली. लिलीला तर फार वाईट वाटलें. उद्यां जरूर या. आपण आल्याशिवाय लिलीला व आम्हालाहि बरें वाटणार नाहीं. आपण येण्याचें कबूल करून आलां नाहींत. त्यामुळें आपल्याला 'कांहीं तरी' वाटलें असलें पाहिजे असें लिलीशीं विचारपूस करतां मला वाटलें. पण तसें करण्याचें कांहीं कारण नाहीं. आम्हीं—लिलीचें आईबाप—लिलीच्या व आपल्या वागण्यांतील मर्म ओळखून आहोत, व लक्ष देऊन आहोत, आपणा दोघांना वागण्याच्या ज्या सवलती देण्यांत आल्या होत्या, त्या न जाणतां होत्या, असें समजूं नका ! त्या मुद्दामच देण्यांत आल्या होत्या. व संतोषाची गोष्ट कीं, गेल्या वर्षांतील आपल्या परस्पर वागणुकीवरून पाहतां आपणा उभयतांच्या प्रणयाची परिणती व्यवस्थित, व योग्य झाली आहे, असें दिसून आलें. म्हणून लिलीच्या आम्हा आईबापांस आपल्या मॅरेजला सम्मती देतांना फार फार आनंद होत आहे ! 'वेणींत फूल' घालण्याच्या व घालून घेण्याच्या निमित्तानें आपल्या प्रणयाची पूर्ण परिणती झाली असें मानावयाला मुळींच हरकत नाहीं. आतां शक्य तितके लवकर आपण चतुर्भुज व्हाल तितकें चांगलें.

याच वेळीं आत्मीयत्वाच्या नात्यानें थोडेसें जास्त लिहिणें भाग आहे. आपली इच्छा असल्यास, आपण आमच्या पवित्र धर्माचा स्वीकार करा. राजधर्म आहे, फायदा होईल. आपल्या विद्येचें, व बुद्धिमत्तेचें सार्थक होण्याचा खात्रीचा चान्स त्यामुळें अधिक आहे. माझ्या लिलीचा मग मला खात्रीपूर्वक सुखाचा संसार करतां येईल. तसें नको असेल तर आपल्या 'शुद्धिकरण संस्थे' मार्फत मिस् लिलीला पवित्र करून घ्या. व विवाहित व्हा ! आमचें कांहींच म्हणणें नाहीं. लिली व तुम्ही 'मज्नून्–लैली' प्रमाणें जगांत वागावें असेंच केव्हांहि आम्हांला वाटणार ! लिलीला शुद्धिकरणानें पवित्र केलीत, तर तुम्हांला तुमच्या धर्मांत सुखानें नांदतां येईल, व तुमचा समाज तुम्हांला चैन पडूं देईल असें वाटत नाहीं. व तुमच्या संसाराची हालअपेष्टा काय होईल, सांगतां येत नाहीं ! राजधर्माचा स्वीकार केलात तर लिलीच्या सहवासांत–सर्व ऐहिक सुखें तुमच्या पायीं लोळण घेतील, अशी आमची खात्री आहे. आपल्यासारखा विद्वान

आमच्या सध्यांच्या कम्युनिटीला लाभला, तर बरेंच होईल. तुम्ही आमच्या लिलीसह आमच्या कम्युनिटीच्या शिरोभागीं शोभाल ! यांची खात्री बाळगा ! यांपेक्षां जास्त लिहित नाहीं. उद्या at home ला आलांत म्हणजे पुष्फळ बोलूंच. लिली व आम्ही सर्वजण उद्यां वाट पाहातों. तुमच्या मॅरेजला आमचा कन्सेंट मिळालेला वाचून तुम्हांला आनंद होईल म्हणूनच हें पत्र पोष्ट केलें आहे.

—आपला—

जोसेफ डेविड ( देवदत्त )

पत्र वाचलें ! मला काय वाटलें ! मी कोठें होतों ! अधांत्री, वातावरणांत, स्वर्गांत—कीं कुठें तरी ! वाचण्याच्या तंद्रींत स्टोव्हला पंप करावयाचा विसरलों. स्टोव्ह त्यामुळें विझूनहि गेला. अनंत विचारांचे काहूरांतून किंचित् भानावर आलों. चहाची आठवण झाली. पुन्हां स्टोव्ह पेटविला—पंप केला—पाणी टाकलें, व दुसरें पत्र फोडलें:—

श्रीश: शरणम्

कमलापूर.

मिति मार्गशीर्ष शु० प्रतिपदा.

चि.........यांस:—

अनेकोत्तम आशिर्वाद विशेष:—

तुझें गेल्या महिन्यांत पत्र नाहीं. त्यामुळें सर्वांना काळजी लागते. अभ्यासांत गढावें, पण त्यामुळें घरदाराला, आईबापाला, बहिणभावांना विसरूं नये. हें तुम्हां तरुणांना कसें कळत नाहीं, कोण जाणे ! असो. आतां या पत्राचें उत्तर ताबडतोब पाठीव. गेल्या पंधरवड्यात तुला मनिआर्डर केलीच आहे. आज दुसरी करीत आहे. ती उद्यां मिळेल. तुझ्या पत्राची वाट आणखी आठ दिवस पहाणार होतों. पण आजच पत्र पाठविण्याचा योग आला आहे. दैवयोग आहे. आनंदाची बातमी आहे. आपले आप्पासाहेब येथें आले आहेत. त्यांची बदली ग्वालेरकडे झाली. हा महिनाअखेर ते तिकडे जाणार—जाण्यापूर्वी ते आपल्या कुंदेचें लग्न

करून जाणार. त्यांनीं तुला जावइ पसंत केला. मी व तुझ्या आईनें सून पसंत केली. तुझ्या बहिणभावांना नवी 'वहिनी' आवडली. तुझ्या 'वहिनी' ला 'जाऊ' हवी होती तशी मिळाली. मुलगी नक्षत्रासारखी आहे. हल्लीं प्रीव्हीयसमध्यें आहे ! गाणें-पेटी वाजविणें-काशिदा काढणें यांत तरबेज आहे. पुराण सांगते. कीर्तन करते, उत्तम लेक्चर देते. लिहिण्याची हौस आहे. सारांश तुला पाहिजे तशी 'बायको' मिळाली ! मी 'हुंडा' मुळींच घेतला नाहीं. पहिलाच मुहूर्त धरला आहे. समारंभाची जारीनें तयारी चालूं आहे. पत्रासोबत यादी पाठविली आहे. उद्यां M. O. मिळतांच यादीप्रमाणें सामान घेणें व पाठवून देणें. ' लग्नपत्राचा ' मसुदा पाठविला आहे, तो घेऊन छापखान्यांत देऊन कार्डें छापून घे. तुझ्या कॉलेज-मित्रांना, प्रोफेसरांना द्यावयाचीं तीं दे. कोण येतील त्यांना अवश्य घेऊन ये. त्या सर्वांची योग्य बरदास्त ठेवण्यांत येईल. केव्हां निघणार त्याची तार दे कळावें हा आशिर्वाद.

तुझा प्रेमळ पिता.

× × ×

वडिलांचें पत्र ! वाचलें ! काय वाचलें कुणास ठाऊक ! एकदां-दोनदां दहादां--शंभरदां वाचलें ! अर्थच कळेना ! वडील चुकले आहेत का मी ! काव्यकल्पनांच्या भरमसाट उंचीच्या सौख्यशिखरावर मी हिंडतों आहे कीं-वस्तुस्थितीच्या ' तापलेल्या वाळवंटांत लोळतो आहे !-मिस् लिली—कीं कुंदा ! काव्याचें जीवन कीं जीवनाचें काव्य !--जोसेफ डेविडची चूक !--मिस लिलीची चूक !-वडिलांची चूक !-समाजाची चूक !--अप्पासाहेबांची चूक !-कुंदाची चूक !--मित्रमंडळाची चूक ! माझी चूक !-चूक कोणाची ! थट्टेची मस्करी—मस्करीची कुस्करी— आयुष्याची-सुखाच्या संसाराची सारी कुस्करी !--

× × ×

समोरचा स्टोव्ह जोरानें पंप केल्यामुळें ' रोरोरोरों ' करीत होता--माझें हृदय अनंत विचारांच्या, विकारांच्या आगीनें तसेंच ' रोरोरोरों ' करीत

धडाडत होतें ! ! चहाचें पाणी उकळत होतें ! माझें 'मस्तक' तसेंच उकळून निघालें होतें !--

× × ×

हांसत कर्म करून-ते आतां रडत भोगित होतो-आणि आतां-

## [ ४ ] परिणामीं !

परिणामीं दुसरें काय मिळणार ? अविचाराचें अप्रबुद्धतेचें योग्य प्रायश्चित्त आणि तेंच भोगायचें आहे ! कॉलेज सुटलें. घरादाराला अंतरलों ! आई—बाप—बहीण भाऊ, आप्तेष्ट यांना दूर लोटलें. आतां भटकतों आहे. जग म्हणतें 'हा बाटगा आहे, महाराघरीं जेवतो, ख्रिस्त्याची मुलगी मिळाली नाहीं म्हणून भ्रमिष्ट झाला आहे !-खरेंच मी भटकतों आहे !

'मिस लिलीची हकीकत विचारतां ?—कोण जाणें ! —मी चौकशी केली नाहीं ! माझ्या नांवानें व्रतस्थ राहून एकाद्या मिशनरी शाळेंत विद्यादानाचें पवित्र कार्य करीत आहे—कीं एकाद्या जोसेफाचा संसार-शकट हाकीत असून मला पूर्ण विसरूनही गेली !—मी कशाला आणखी दुःखावर डागण्या ओढून घ्यावयाला चौकशी करूं. 'वेणींतल्या फूला'ची स्मृती नष्ट होत नाहीं. व तेवढें दुःख पुरें आहे !



# फिटंफाट ! : : : ३

अगोदर सदर्न मराठा रेल्वेसारखी सर्व अव्यवस्थेनें नेहमींच परिपूर्ण असलेली रेल्वे, त्यांत मिरजेचें स्टेशन; आणि त्यांत रात्रीं मेलची वेळ! बेळगांवकडून पावणेनवाच्या सुमाराला पुण्याला जाणारी मेल यायची; त्याच्या आंत, त्या वेळींच किंवा क्वचित् मेल गेल्यानंतरही कोल्हापुराहून मेलला जोडणारी गाडी मिरज स्टेशनवर येऊन धडकायची आणि सांगलीची गाडी पण कशीबशी मेलला भेटायला धापा टाकीत येण्याची गडबड करायची ! त्या मेलवर मिरजेला उतारूंची किती गर्दी ती ! आणि यच्चावत् या गाडींतून त्या गाडींत उतरण्या—चढण्याचा व्याप मार्गे असलेल्या उतारूंचे कोण ते हाल ! भला असो कीं बुरा असो, श्रीमंत असो कीं गरीब असो; मेलच्या वेळीं मिरज स्टेशनवर उतारू सहीसलामत विनात्रास 'गाडीं'त चढेल म्हणजे काय गोष्ट आहे ? आणि त्यांत जर कां सांगली—कोल्हापूरच्या विशेषतः कोल्हापूरच्या गाडींतून मेलमध्यें येणाऱ्या उतारूंजवळ भरमसाट अगदीं अवाच्यासवा सामान असेल; तर त्या उतारूंची त्रेधा—तिरपीट विचारूंच नका. त्या गाडींतून या गाडींत यायला अगोदर वेळ अत्यंत थोडा असायचा, त्यांतून कोल्हापूरहून येणाऱ्या उतारूंचें सामान—ट्रंक, वळकटी, होल्ड ऑल, ब्यागा जें काय असेल-नसेल तें तपासण्याची नेमलेल्या तपासकांची सक्तीची घाई ! उतारू कोणीही असो. सभ्य असो, असभ्य असो, थोर असो, पोर असो, वृद्ध स्त्री असो की एकादी तरुणी असो; कोणाचेंही सामान खोलून पाहिल्याशिवाय उतारूला मेलकडे जाण्याची सक्त मनाई ! त्या अवधींत मेलची वेळ होऊन ती तोऱ्यानें भपकारे टाकीत स्टेशनामधून बाहेर पडली, तर मनस्वी वाईट वाटावयाचें मेलनें जाणाऱ्या उतारूला ! वैताग यावयाचा तो त्याला गैरसोयीबद्दल अडवणुकीबद्दल संताप यावयाचा तोही त्या उतारूलाच ! त्याचें सामान खोलून तपासण्यांत वेळ घालविणाऱ्या आणि उतारूंची गाडी चुकविण्यास सहाय्य करणाऱ्या त्या तपासनीस अधिकाऱ्याला त्याचे काय होय ! तो

बिचारा निर्विकार! धिमेपणानें आणि ऐटीनें आपलें कर्तव्य पहाणार. उतारूंचें–सोयर--सुतक त्याला काय होय ! आणि आपण ज्या उतारूंचें सामान सक्तीनें खोलून पाहात आहों, तें एखादें अल्पवयी मूल आहे कीं एखादी सभ्य स्त्री आहे, हें पाहाण्याची त्याला काय आवश्यकता ! कोल्हापूरच्या गाडींतून पुढें जाणाऱ्या गाडींत बसणाऱ्याचें सामान तपासावयाचें एवढेंच त्याचें कार्य ! हो. एकाद्या अजाण मुलाच्या किंवा कुलीन स्त्रीच्या सामानांतूनच बिनपरवाना कोल्हापूरची दारू चोरून निर्यात Export होत नसेल कशावरून ! हीच त्याची खात्री ! म्हणून तर तो आपलेकडे आलेलें काम अगदीं इमानें इतबारें बजावणार--नव्हे बजावीत असतो.

अशा एक कीं हजार गैरसोयींच्या जंजाळांतून उतारूला मेल मिळणें म्हणजे पूर्वजन्मींची जबर पुण्याईच गांठी असली पाहिजे, असें प्रसंगांत पडलेल्या उतारूंस हमखास वाटलें तर त्यांत विशेष तें काय !

असा प्रकार मिरज जंक्शनवर प्रत्यहींच घडत असला तरी वैशाख ज्येष्ठासारख्या लग्नकार्यांच्या मोसमांत त्या प्रकाराला खरा बहार येणें अगदीं साहजिक नाहीं कां ! नेहमीची रहदारी तर असायचीच; पण लग्नकार्यांनिमित्त इकडून तिकडे सहकुटुंब सहपरिवार आणि सहसामान जाणाऱ्या वऱ्हाडयांची त्यांत भर पडूं लागली म्हणजे, गाडींतल्या गर्दींत तो एक औरच मजा आल्याशिवाय कसा राहणार ! वैशाख महिन्यांतल्या तशा अनिवार गर्दींत कोल्हापूरच्या गाडींतून उतरून पुण्यास जाणाऱ्या मेलमध्यें आपल्या सामानासह चढण्याचा प्रसंग मिरज जंक्शनवर आपल्या सुधाताईवर आला होता.ती सुट्टींत कोल्हापुरास एकटीच आपल्या मैत्रिणीकडे गेली होती. चांगली महिनाभर राहिली होती. त्या दरम्यान ती एकटी स्वतंत्र टॅक्सी करून जोतिबाचा डोंगर,देवस्थान,गडावरील जुन्या कारागीरांचें कौशल्य व कारागिरीचे नमुने मुद्दाम पाहून आली दोती.तसाच तिनें पन्हाळ्यावरही फेरफटका एकटीनेंच केला होता. पन्हाळ्याची सुटसुटीत पण सुंदर वनश्री, तिनें न्याहाळली होती, आणि श्रीशिवरायाची मूर्ति, तीन दरवाजा, कमानीची, खजिन्याची गार पाण्याची विहीर इत्यादि ठिकाणीं ती एकटी निर्भयपणानें फिरून आली होती; तिला कोल्हापुराहून पुण्याला आपल्या सामानासुद्धां एकटी

यायला काय कठीण पडणार होतें! जातांना तिला तसा त्रास पोंचला नव्हता, आणि परततांना आपल्याला त्रास पोंचेल, अडचण पडले असें तिला वाटतच नव्हतें! सुधाताईच्या मामेभावाचें पुण्याला लग्न ठरलें. तिच्या रावबहाद्दुर मामांची तशी तिला तार आली, लगेच तिनें तार हातीं येतांच संध्याकाळीं पुण्याला येण्याकरितां कोल्हापूर सोडलें. आपल्या छकडाभर सामानासह ती कोल्हापूर स्टेशनवर गाडींत मैत्रिणीच्या नवऱ्याच्या सहाय्यानें चढली. मिरजवर हमालांच्या साहाय्यानें सामानासह उतरली. तिच्या दैवयोगानें बेळगांवाहून मेल येतांच सुधाताईला कोल्हापूरची गाडी घेऊन आली, त्यामुळें तिला निम्मे हायसें झालें! तिचें सामान हमालांनीं खालीं काढलें, व आपल्या ढकलगाडीवर घातलें! केवढा सामानसुमानाचा डोंगर तो! सुधाताईची मेलकडे जाण्याची भयंकर तारांबळ उडाली. त्यांत आज मेलला काय चिकार गर्दी! इतकी गर्दी असेल अशी सुधाताईला मुळींच कल्पना नव्हती! तिला वाटत होतें कीं आपणच काय त्या एकट्या सामानासुमानांसुद्धां पुण्याला लग्नाकरितां निघालों आहोंत. पण आज जवळ जवळ सर्व मेल थेट बेंगलोरपासूनच म्हणानात, लग्नाच्या वऱ्हाडयांनींच भरली होती. त्यांत लोंढा स्टेशवरच काय ती नेहमीसारखी मुंबईला जाणाऱ्या गोवानीजची थोडीफार भरती झाली असेल ती! मिरजेवर सुधाताईचा चांगलाच गोंधळ उडाला. गाडीला थोडावेळ उरलेला. सामान बरोबर पुष्कळ. त्यांत स्टेशनवर ट्रंका-बॅगा-वळकट्या खोलून दाखविण्याचें दिव्य! आपण मेल सुटण्यापूर्वी त्यांत बसतों कशा, असें सुधाताईला होऊन गेलें. आपल्या मनासारखी प्रशस्तशी जागा पहावी, ती बहुतेक रिकामीच असावी, त्यांत असलीच दुसरी कुणी तर ती आपली शाळा कॉलेजांतील समवयस्क मैत्रीण असावी, म्हणजे वाटेंत बोलाय-चालायला-हंसाय-खेळायला बरें. वेळ मजेंत जाईल. कंटाळा येणार नाहीं, अशी सुधाताईची कल्पना होती. तिच्या बेंगलोर, बेळगांव, धारवाड, गदग, हुबळीकडून आणखी एकदोन गोव्यांतूनसुद्धां मैत्रिणी यायच्या होत्या. तसें सगळ्या जणींचें अगदीं उशीरा ठरलें होतें; पण लग्नाकरितां सुधाताई अगोदरच निघाली तर तिला मिरजेवर कोण

भेटणार ! आणि त्यांच्यापैकीं मेलमध्यें असल्या कुणी तरी सुधाताईला त्यांची बातमी कळणार कशी आणि चौकशी करण्याइतका वेळ तरी कुठें होता ! सुधाताईचीं पहिलीं सर्व सुखस्वप्नें केव्हांच नाहींशी झालीं आणि जेमतेम आपण मेल मिळवितो कशी एवढेंच तिला व्यवधान राहिलें.

पण सुधाताईचें नशीब गाडी गांठण्यापुरतें तरी शिकंदर होतें असें म्हणायला हरकत नाहीं. तिनें स्वतः अत्यंत चलाखी करून आणि हमाला-लाही चलाखी करावयाला लावून, धांवपळ करून, आरडून, ओरडून मेलचा मिळाला तो डबा गांठला. त्यांत भराभर सामान आंत कोंबलें. आंतून अनेक विजांचा–मेघांचा कडकडाट झाला. पण त्याकडे लक्ष देण्याची कां ती वेळ होती ! डब्यांतून एकसारखा प्रतिकाराचा प्रयत्न होतच होता, आणि हमालाला सर्व सामान आंत फेंकण्याबद्दल सुधाताई एकसारखी फर्मानावर फर्मानें सोडीत होती ! ढकलगाडीवरचा गठ्ठा कमी झाला ! तो डोंगर डब्यांत रचला गेला. सुधाताई तशीच नेटानें डब्यांत चढली एकदांची ! तिचा जीव घामाघूम झाला. तिची सर्व छाती बिघडली ! पण तिला इकडे तिकडे पहावयाला, हूं कीं चूं करायला कुठें फुरसत होती ? तिनें आपलें सगळें सामान आले कीं नाहीं, हें पाहाण्याचा प्रयत्न चालविला–हमालानें हमालीसाठीं तगादा लावला–गाडी सुटायला अजून पांच सात मिनिटें तरी अवकाश असावा. सुधाताईनें पाहिलें, आपला होल्ड ऑल, चार ट्रंका दोन लेदर बॅगा, आपली कपड्यांची बॅग, टिफिन कॅरिअर, नाशिकचा फिरकीचा तांब्या; ग्वालेरकडचा लांकडी स्टँडसुद्धां पाण्याचा खुजा, वगैरे सर्व सामान आल्याचें तिनें पाहिलें. नंतर डाव्या हातांत अडकवलेल्या छोट्याशा लेदर–बॅगमधून पैसे काढून हमालाच्या हातीं फेंकले ! इतक्या श्रमानें सुधाताई अगदीं दमून गेली ! स्त्री होऊन एकटीनें तिनें मेल मिळविली–केवढा पराक्रम तिनें गाजविला ! पण त्या पराक्रमाचें कौतुक करावयाला त्या वेळीं तिथें सुधाताईच्या ओळखीचें कुणीच नव्हतें ! श्रम-परिहाराकरितां वेळ आहे असें पाहून आपल्याच हमालाला सुधाताईनें चहावाल्यास ' हटकावयास सांगितलें. सुधाताईच्या एकंदर जामानिम्या-कडे लक्ष्य देऊन धूर्त व चाणाक्ष हमालानें गरीब बिचाऱ्या हिंदु चहावाल्या-

'कडे न जातां सरळ समोरच्या रेस्टॉरंटकडे धांव मारली आणि चहाची वर्दी दिली ! तेथून एक ' वेटर ' ट्रे—मधून अल्पावकाशांत चहा घेऊन आलाच !—सुधाताई ट्रेमधला चहाचा 'कप' उचलून घेत घेत आपल्याशीं पुटपुटली, "या वेळीं चहापेक्षां सोडाच घेतला असता तर बरं झालं असतं !—पण जाऊं दे—चहा आला तर चहाच !"

सुधाताईनें ' वेटर' कडचा चहा घेतला ! चहापान केलें.

'ट्रे' मधील एक केक देखील सुधाताइनें चहाबरोबर चटकावली !

बिल ट्रेंत टाकलें. 'वेटर' सलाम करून चालता झाला. मेलनें शिटी दिली ती चालू झाली.

"सुटले बाई एकदांची !" अशा अर्थाचा एक दीर्घ सुस्कारा सुधाताईनें सोडला ! हुश्श केलें ! फॅशनेबल ब्लाऊझच्या खिशांतून स्वच्छ हातरुमाल काढून तिनें आपल्या कपाळावरचा घाम पुसला ! गडबडीनें केंस अस्ताव्यस्त झाले होते, ते तिनें हलक्या हातानें जरासे नीटनेटके केले. मेल स्टेशनच्या बाहेर जाईपर्यंत उगीचच सुधाताई खिडकीच्या बाहेर पहात राहिली होती. गाडी नीटपणें मार्गी झाली आणि मग सुधाताईनें आपलें सामान नीटनेटकें लावण्याच्या इराद्यानें आणि स्वतः बसण्यासाठीं प्रशस्तशी जागा मिळविण्याच्या इच्छेनें खिडकीबाहेरचें तोंड आंत घेऊन डब्यांत पाहिलें तों काय !......

× × ×

तो सर्व डबा जुन्या चालींच्या लहानमोठ्या बायकांनीं अगदीं ठेंचून गेला आहे. मुंगी शिरकायला जागा नाहीं; त्यांत आपलें सामान, वळकटी कुणाच्या अंगावर, तर ट्रंक कुणाच्या पायावर, बॅग एकीच्या गांठोड्यावर पडल्यामुळें डब्यांतील सर्व स्त्रिया एकदिलानें क्रुद्ध होऊन सुधाताईला खाऊं कां गिळूं अशा नजरेनें पहात आहेत असें आढळून आलें. स्वतः सुधाताई हालचाल करून आपलें सामान नीटनेटकें करील म्हटलें तर तिला इकडचें तिकडे होण्यास जागा नव्हती. ती हुशार खरी; पण करते काय ! कोल्हापुराहून एकदोन डबे थेटकरतां जोडतात; पण तें तिच्या ध्यानांतच त्यावेळीं आलें नाहीं. तिला असा थोडासा त्रास पोंचावयाचा

होता ना ! आंतील यच्चावत् बायका आपल्यावर खवळल्या आहेत, हें लक्षांत येऊन सुधाताईची स्थिति मोठी केंविलवाणी झाली ! आतां आपली धडगत नाहीं, हें तिला पक्कें कळून चुकलें. तिच्या वयाच्या त्यांत बायका होत्या, पण तिच्या शीलाच्या कुणी त्यांत दिसल्या नाहींत. ही नव्या पिढीतील नवी सुशिक्षित तरुणी–बाकीच्या साऱ्या जुन्या चालीरीतीच्या तिच्या वयाच्या तरुणी आपापलें लहान अर्भक कुशींत घेऊन पाय आंखडून पडल्या होत्या, तर कुणी पदराआड मुलाला घेऊन तशाच तिष्ठत होत्या. सुधाताई त्या सगळ्यांची महान् अपराधी होती. त्यामुळें तिच्याकडे त्यांतील सहानुभूतीनें पहाणार कोण ! यापेक्षां ती जर एखाद्या दुसऱ्या डब्यांत–पुरुष असलेल्या–त्यांतून तरुण सुशिक्षितांच्या डब्यांत शिरली असती, तर स्त्रीदाक्षिण्याकरितां म्हणून तरुणांनीं स्वतःची गैरसोय करून सुधाताईला बसायला जागा करून दिली नसती कां ! पण या डब्यांत स्त्रियांनींच स्त्रीला स्त्रीदाक्षिण्य कसें दाखवायचें ! बरें, त्यांतून तिच्याकडे थोडें सहानुभूतीनें पाहिलेंही असतें; पण डब्यांतल्या जुन्या डोळ्यांच्या बायकांना सुधाताईची अर्धी अधिक छाती उघडी दाखविणारा, खांकेपासून हात अजीबात उघडे ठेवायला भाग पाडणारा नव्या फॅशनचा अस्मानि ब्लाऊझ, त्याच रंगाचें झिरझिरीत बिन कांसोट्याचें ती नेसलेली पातळ पायांत फॅशनेबल नाजूक चपला, डोळ्यावर सोनेरी फ्रेमचा चष्मा, डोकीवरचे राकट, पिंगट–तेल वगैरे न लावलेले केंस, आणि अनेक पिनांनीं बांधलेला मोठा थोरला बुचडा, पदर सांवरण्याचा वरचेवर हाताला त्रास पडूं नये म्हणून ब्लाऊझ आणि पातळाचा पदर यांना छातीच्या उजव्या बाजूस जिनें कायमचें जखडलें आहे, अशी सोनेरी पिन्, या सर्व थाटावरून सुधाताई 'आपल्यां' तली नसून, ती एखादी "किरिस्ताव" आहे, अशी त्या बायकांनीं सुधाताईविषयीं समजूत करून घेतली असल्यास व त्यामुळें जुन्या बायकांच्या सहानुभूतीला सुधाताई अगदींच पारखी झाल्यास, त्यांत त्या बायकांचा काय दोष ? आपल्याला अत्यंत त्रास देणाऱ्या परक्या किरिस्ताव 'बाईला कोण आपल्यांत बसूं देणार ! कोण जागा करून देणार ! तिच्याशीं सहानुभूतीनें एखादा तरी शब्द

कोण बोलणार ! याच स्थितींत एखाद्या ताज्या तरुण सुशिक्षितानें सुधा-ताईला पाहिलें असतें, तर हळहळून तिच्यासंबंधानें उद्गार काढले असते कीं, " डब्यांतल्या उकीरड्यांत एक हिरकणी पडली आहे !" पण डब्यां-तल्या बायकांना सुधाताई कशी हिरकणी वाटणार ! सुधाताई ब्राम्हणच आहे–आपल्यांतील आहे, असें वाटायला तिनं जागा कुठं ठेवली होती ! पोषाख तो तसा—आचार पहावा, तर मिरजेवर तिनं त्या बाडग्याच्या हातचा ' चहा केक ' डोळ्यांदेखत घेतलेली ! मग सुधाताई आपल्यांतली कशी वाटणार !

सुधाताईचं तोंड मलूल झालें. नूर उतरला ! त्या सगळ्या बायकांना बघून तिला तोंड उघडायचाही धीर होईना. ती केवीलवाण्या नजरेनें पाहूं लागणार, तोंच तिच्याकडे पाहून तिला लागेल असें जुन्या बायका बरळूं लागल्या. " बाटगीनें यावंच कशाला ? " इतकं सामान होतं तर इनं सेकंड क्लासांत जायला हवं होतं ! जळ्ळा मेला भ्रष्टकार ! उद्धट ! निलाजऱ्या मेल्या ! अशीं शेलकीं वाक्यें सुधाताईच्या कानांवर येऊं लागलीं !

समान वयाच्या, समान शिक्षणाच्या, समान शिलाच्या, समान विचारा-आचारांच्या मुलींच्या सहवासाला सुधाताई आंचवली होती; तें दुःख कसें तरी विसरून, आहे त्या परिस्थितींतही वेळ काढला पाहिजे. आनंदांत नसला तरी समाधानांत वेळ काढला पाहिजे आणि त्यांतही आपल्या अज्ञानी माय-बहिणींना, नवयुगाचें ज्ञान सांगून, माहिती पुरवून, स्त्री पुरुषांमधील वाद करून स्त्रियांनीं जुन्या चालीरीती टाकल्या पाहिजेत; स्वतंत्र झालं पाहिजे- स्वतंत्र वावरलं पाहिजे, वागलं पाहिजे. जुना काळ गेला. नवा काळ आला, त्याला आपण ओळखून आपला प्रभाव गाज-विला पाहिजे; अशा प्रकारचें ज्ञानामृत पाजण्याच्या निमित्तानें डब्यांतल्या बायकांवर वर्चस्व गाजवूं, व त्या योगानें हक्कानें, अधिकारानें आणि आप-खुषीनें जागा मिळवूं, त्या बायकांकडून शाबासकी घेऊं, आपली थोरवी कबूल करायला त्यांना भाग पाडूं, असें सुधाताईच्या एकदां मनांत आलें, पण, तें आलें आणि गेले, इतकेंच ! तिची त्या डब्यांत कशीच कोणी डाळ शिजूं देईना. पुणें येईपर्यंत सारी रात्र तिथं कशी काढायची, पुढल्या

एकाद्या स्टेशनवर डबा बदलूं म्हटलं तरी तेंही कठीण, असें तिला दिसूं लागलें. कधीं नाहीं तो त्यावेळीं मात्र तिला परमेश्वर आठवण्याची पाळी आली !

" कुणी तरी किरिस्ताव दिसतेय. "

" बाटगी आहे मेली नाहीं तर कोण ! "

" यांच्यापेक्षां आपल्याकडल्या वेश्यासुद्धां जास्त सभ्य दिसतात आणि वागतात ! "

" नाहीं तर काय ! "

यांच्यात आणि पुरुषांत फरक काय ! "

" हं ! मी तेंच म्हणतें—"

" अशा बायका म्हणे बाटग्यांच्या इस्पितळांतून नर्सचं काम करीत असतात ही मिरजेलाच चढली ! तिथल्याच इस्पितळांतली असेल -या नर्सचं काम करतां करतां रोग्याला बाटवतात ·अजाऱ्याला लुबाडतात–एकाद्याच्या मागं लागून त्याच्या घरांत सूद्धां घुसतात. यांना कसली आली आहे लाज ! "

" असल्या बायका लाज वाटून पितात तेव्हांच घराच्या बाहेर पडतात, तेव्हां यांचा वाटेल तशा अघोचरपणा चालतो—"

" हं ! "

" आणखी सरकारसुद्धां आपल्या इकडच्या मुलींच्या शाळामधनं मुद्दाम असल्याच मास्तरणी नेमतात—"

" आमच्या मुली बिघडविण्याकरितां—"

" हो–असलें थेर आमच्या मुली लगेच उचलतात. "

" या त्यांना शिकवतातच तसले थेर !"

" अहो, शिकूं-देखूं तसं व्हायचंच !-"

" यांना कां रीत आहे-"

" कां यांना लाजलज्जा आहे-"

" कां यांना कांहीं घरकाम करायला येतंय !-"

" सगळा यांचा हॉटेली कारभार ! चूल फुंकायला जातायत् कशाला या स्वयंपाकघरांत ! "

" असं सगळं आंग जगाला दाखवीत फिरायची यांना संवय झालेली–यांना स्वयंपाकघरांत गोड कसं वाटणार ! "

" आतां आणखी बायकांनीं नागडं हिंडायचं शिल्लक तें कुठें राहिलं आहे ! "

" असं आहे म्हणून आम्हीं आमच्या मुलींना शाळेंतही घातलं नाहीं आणि असल्या भडक मावशांचे गुणहि पण आम्हीं आमच्या घरांत येऊं दिले नाहींत. "

" मी पण तुमचाच कित्ता गिरवला आहे ! "

" व्याख्यानं काय देतात मेल्या–"

" शहाणपणाचा टेंभा काय मिरवतात सटव्या ! "

" हें सगळं विंग्रजी वळण ! "

हें आणि असेंच कितीतरी त्या बायकांचें बोलणें सुधाताईला एकसारखें अधूनमधून ऐकावयाला लागत होतें. आपल्यालाच तें सारें उद्देशून आहे, हें ती ओळखीत होती ! प्रथम त्याचें तिला कांहींच वाटलें नाहीं. आणि नीटशी तिला त्यांच्याकडून बसायला जागा मिळून मग जरी तिला वरील बोलणीं ऐकावीं लागली असतीं तर तिनें निमूट ऐकून घेतलीं असतीं–त्यांतला कदाचित् आनंदहि घेतला असता. ती त्या सगळया जणींना आपल्या शब्दांचें शहाणपण सांगून गारीगार करण्याच्या विचारांत होती, तर तिलाच उलट त्या डब्यांत त्यांच्याकडून प्रच्छन्न–अप्रच्छन्न असे शहाणपणाचे शब्द ऐकावे लागत होते. विशेषतः तिनें आज जें फॅन्सी सोंग काढलें होतें त्यामुळें तिच्यावर जास्त मारा होत होता. ब्राह्मणासारख्या ब्राह्मणाची मुलगी सुधाताई–ज्या बाया बोलत होत्या त्यांच्याच जातीची–कदाचित् त्यांच्या नात्यागोत्याची सुद्धां असायची ती–तिलाच त्यांच्याकडून नव्हे नव्हे तें ऐकायला लागलें. पाळलेला पोपट पिंजऱ्यांतून निसटून आपल्या कळपांत रानावनांत मिसळायला गेला तर त्याचा कळप त्याला आपल्यांत

घेत नाहीं; उलट चोंची मारमारून त्याला हैराण करतो, तशीच गत सुधाताईची त्या वेळीं गाडींत झाली होती !

कुणी तिच्याकडे नुसत्याच पहात आणि नाक मुरडीत.

कुणी तिच्याकडे पहात कुजबुजत तिरस्कारानें कपाळाला आंठ्या घालीत !

तर कुणी मुद्दाम निजण्याचें निमित्त करून हातपाय ताणून सुधाताईच्या सामानाला पायानें ढकलीत. सुधाताई अधिकच अडचणींत कशी अडकेल हें पहात. बिचारी साधी–सिधी–सरल–सालस सुधाताई ! तिचे आणि तिच्या फॅशनचे कोण ते धिंडवडे ! आज तिला घरून निघतांना मुहूर्तच वाईट लागला होता कीं काय कोण जाणे ! उपरोधिक बोलण्याकडे दुर्लक्ष करतां यावें म्हणून बॅगमधली एखादी 'नॉव्हेल' काढून ती वाचनांत गढली असती, पण तें त्या स्थितींत किती अशक्य होतें ! कांहीं वेळ तिनें खिड-कीच्या बाहेर तोंड काढून अंधेरांतलीच मौज पाहण्याचा प्रयत्न चालविला. पण कोळशाच्या ठिणग्यांनीं तिला सतावले. डोळ्यांत बारीक कोळशाचे कण जायला लागले म्हणून तिला नाइलाजानें तोंड आंत घ्यावें लागलें. गळ्यांतल्या एकुलत्या एक सोन्याच्या सांखळीशीं खेळण्यांत मन गुंततें काय तें पाहिलें. पण अं हं: ! हातांतली एकेक सोन्याची बांगडी–जशी काय आजच तिनें हातांत घातली आहे, अशा पद्धतीनें त्यावरील कुसर ती न्याहाळूं लागली–पण डोळे हें काम करीत असतांना कानांवर त्या बायकांचे कुत्सित वाक्प्रहार आदळतच होते. सुधाताईनें आपल्या जाड दांड्याची छोटी फॅन्सी छत्री हातांत उगीचच घेऊन तिच्याशीं करमणूक करण्यांत वेळ जातो काय तें पाहिलें. तिनें छत्री हातांत घेतली मात्र–पलीकडच्या कोंपऱ्यांतून आवाज आला, "दिव्याचा उजेड सहन होत नसेल–उघडा म्हणावं छत्री ! घ्या डोकीवर ! नाजूक नार तिला चाब-काचा मार !"

सुधाताईच्या हातांतून छत्री आपोआप गळून पडली ! इतक्यांत कऱ्हाड कीं कोणतेंसें स्टेशन आलें. मेल थांबली. काय होईल तें होवो, आपण उतरून दुसरीकडे जावेंच असें अगदीं असह्य होऊन सुधाताईच्या मनांत आलें. ती त्या हेतूनें बाहेर तोंड काढते तों काय, प्लॅटफॉर्मवर मेलमध्यें

घुसणाऱ्यांची ही तोबा गर्दी ! जशी कांहीं भरतीच्या वेळीं समुद्रांत प्रचंड लाटांवर लाटा उसळत आहेत ! सुधाताई हताश झाली ! तिनें पुन्हा तोंड आंत घेतलें. गाडी पाणी पिऊन पुढें चालूं लागली. सुधाताईनें आपल्या हातांतल्या सोन्याच्या रिस्ट वॉचकडे पाहिलें. त्यांत पावणे बारा होत होते ! अरे देवा ! सुधाताईला गाडींत तशा स्थितींत आणखी किती-तरी वेळ काढावयाचा होता ! आपली तोंपर्यंत गाडींतल्या यल्लमा धडगत कशी लागूं देणार आणि आपलें कसें होणार ! असें सुधाताईच्या मनांत आल्याशिवाय राहणें शक्य तरी होतें काय ! अखेरपर्यंत वेळ तिनें कशी निभावली असेल !—

× × ×

" हं, आटप, चढ चढ लवकर–हं, इथंच ! ए मन्या, ए बन्या, चला लेकांनो, ए धर याला घे वर उचलून ! "

" जागा नाहीं–जागा नाहीं–"

" जागा नाहीं काय !–उभी राहतील मंडळी–तुमचीच कांहीं जागा एकट्याची नाहीं-हं चढलीस–नीट दार लावून घे–मन्याचा हात चेंग-रेल बघ–"

" चहा गरम–दूध—"

" आण्णा–भाऊजी कुठें बसलेत ? "

" तो बसेल कुठेंतरी–त्याची काळजी करूं नकोस ! तूं आपलं सामान-सुमान–बोचकीं–मुलें संभाळ म्हणजे झालं. गाडी चिक्कार आहे."

" चिवडा–लाडू–जिलेबी–मिठाई गरमागरम ! "

" पानपट्टी–विडी माचीस "

" अरे, पण आम्हांला काय लांब जायचें आहे ? आम्ही उभें राहतों आपलें–मग तर झालें ? तुम्हीं निजा–तुम्हीं घोरा–तुम्हीं सुखी व्हा. मग काय हरकत आहे ? "

" शूः शूः ! माणसं आहेत कां मेंढरें आहेत ही ? एका डब्यांत घुसलीं कीं एकाच ! दुसरीकडे पाह्यचीच नाहींत–अरे जा, जा, पलीकडे–मागें

खूप जागा मोकळी आहे !-नाहीं-गाडी चिक्कार आहे ! या तर आमच्या मांडीवर बसा-डोक्यावर बसा ! बरं !—"

" क्रॉसिंग आहे वाटतं इथं !—"

" आंबे-आंबे—"

" चहा—गरम-दूध—"

" ए, ऐकलंस कां ! सावध रहा. मन्याला जप, तो जन्या खिडकींतून बाहेर वांकून पाहील-नाहींतर म्हशीसारखी डाराडुर झोंप घेशील आणखी करशील घोंटाळा. मोठ्या हौसेनं मामेभावाच्या लग्नाला पुण्याला निघाली आहेस पण जपून गेलं पाहिजे आणि जपून आलं पाहिजे. अंगावरचं संभाळ. अजागळ आहेस तूं. कशाचं भान रहायचं नाहीं, कुठंतरी कांहीं-तरी देशील टाकून आणि मग बसशील रडत. मुलांना वेळच्या वेळीं खायला दे. माझी मुलं उपाशीं राहिलीं तर मला खपणार नाहीं, सांगून ठेवतों-मी तुला तुझ्या आचरटपणाकरितां मुळीं पाठविणारच नव्हतों. पण म्हटलें थोडक्याकरितां वाईटपणा यायला नको ! अण्णा आतां भेटला तर भेटेल नाहींतर पुण्याच्या स्टेशनवर येईल समजलीस !...मी आलों तर येईन-नाहींतर नाहीं-माझं कांहीं नेमातलं नाहीं-तुझ्या मामेभावाचं लग्न तिथें मला कोण विचारणार आहे, आणि आम्हांला कोण शेला-पागोटें देणार आहे !-संभाळ. हं-बरं—"

कोरेगांव स्टेशनवरून मेल पुढें सुटली. वरील प्रकार कोरेगांव स्टेशन-वरचा होता. दामुअण्णा आपल्या बायकोला-दुर्गाबाईला मेलला बसवायला आले होते. त्यांनीं आपला अण्णा-धाकटा भाऊ त्यांच्याबरोबर दिला होता. तो गर्दीमुळें अन्यत्र बसला होता. दुर्गाबाई आपल्या दुर्गाआक्का मुलांबाळांसकट सांपडेल त्या डब्यांत चढल्या. निघतांना दामुअण्णांनीं आपल्याकडून आपल्या म्हशीला (!) महिषीला कसें वागावयाचें काय वागा-यचें हें मेल सुटेपर्यंत पढविलें. गाडी चालूंच झाल्यामुळें त्यांचा नाइलाज झाला, नाहींतर प्रत्येक वेळच्या संबोधनामागें नवें नवें शेलकें विशेषण घालून आणखी कितीतरी समजुतीच्या गोष्टी दुर्गाअक्काला समजाविल्या असत्या !—

दुर्गाअक्का ज्या ठिकाणीं चढल्या, तो एक स्वतंत्र कंपार्टमेंट होता; आणि त्यांत सुमन, विमल, कमल, कुन्दा, वत्सी, इत्यादि आधुनिक शिक्षाविभूषित समवयस्क तरुण मैत्रिणी बसल्या होत्या ! त्यांच्याकडे दुर्गाअक्कांनीं पाहिलें. त्या दिपूनच गेल्या. स्वतःला ओळखून जागच्या जागीं खजील होऊन गेल्या. त्यांना वाटलं अप्-टु-डेट स्त्रियांच्या फॅशन्सचं गाडींत जणूं काय प्रदर्शनच मांडलं आहे ! त्या फॅशनविभूषित आर्यललनांनीं आपल्या दुर्गाअक्काकडे आपादमस्तक, कुतूहलानें, उत्कंठेनें, आश्चर्यानें पाहिलें !

दुर्गाअक्काला त्या नव्या जगांत मिसळावयाची-तिथें बाकावर एक त्यांच्यापुरती जागा होती तरी त्यावर जाऊन बसण्याची छाती झाली नाहीं. त्यांनीं एका मुलाला पुढें ओढला. दुसऱ्याला दोन बांकाच्यामध्यें हाताला धरून बसविला. तिसऱ्याला तसाच जवळ ओढून निजायला भाग पाडलं. आंगावरचं मूल अजून अंगावरच होतं. त्या पण कांकूं न करितां, किंवा इकडे तिकडे न पाहतां मुकाट्यानें दाराला टेकून तशाच खालीं खुशाल फतकल घालून बसल्या. लेंकुरवाळ्या बायकांचं असंच असतं नाहीं तर काय ! त्यांना सगळंच कसं तितकें हें जमायचं ! दुर्गाअक्का चांगलं मोलवान् इरकली टोक-पदराचं लुगडं नेतल्या होत्या. त्यांचं नेसणं जरी जुन्या पद्धतीचं-कसं तरी वेडं वाकडं-ओचा वर सांवरलेलं-बोंगा आलेलं-असें होतं, तरी लुगडं उंची होतं हें खरें. त्यांचीं सारीं मुलं इथून तिथून गलिच्छ होतीं. तरी त्यांतला उणेपणा दुर्गाअक्कांनीं गोठ, तोडे, त्रिलवर, पुतळ्यांची माळ, जवाची माळ, चिंचपेटी, साजाचं मंगळसूत्र, वज्रटीक, बाजूबंद, डोईवर अग्रफूल, मूद, राकडी, नाग, इत्यादि खंडीभर लहानमोठे दागिने अंगावर चढवून त्यांनीं भरून काढला होता. त्यांच्या सगळ्या मुलांच्या नाकांतून शेंबूड एकसारखा सरसर करीत होता; पण दुर्गाअक्का तो आपल्या नव्या लुगड्याच्या पदरानें पुशीत होत्या. मुलांच्यावर प्रेम तें मग काय ! दुर्गाअक्कांनीं फतकल घालण्याच्या अगोदर एकदां बांकावर बसलेल्या सगळ्या नटव्यांकडे--कां कोण जाणें--चांगलं रोखून पाहिलं होतं आणि मग त्या बसल्या. अंगावरच्या मुलाच्या डोळ्यांत त्यांनीं काजळ

भरलं होतं. झालचं म्हटलं तर त्याला दृष्ट लागूं नये म्हणून त्याच्या गाला-वर पण एक बोट ओढलें होतें; त्या बाळानें चोळून चोळून डोळ्यांतल्या आणि गालांवरच्या काजळाचें एकच गरगट केलें होतें. त्यामुळें तें बाळाचें ध्यान दुसऱ्याला कसंही हास्यास्पद दिसलं तरी दुर्गाअक्कांना आपलं बाळ त्या तसल्याहि स्थितींत कितीतरी आवडत होतं. प्रेमाच्या भरांत त्यांनीं त्याचे मटामट कितीदां मुके घेऊन लडिवाळपणानें, “ आतां पुन्याला मामाच्या लग्नाला ज्यायचं. लाडूपोळया खायच्या ! च्यांगलं च्यांगलं ल्यायचं--अच्छी गंमतज्यंमत कलायची हं आपण ! ” असें आणि असेंच कितीतरी दुर्गा-अक्का म्हणत होत्या. मुलाशीं खेळण्यांत दंग झाल्यावर अवांतर सृष्टी त्यांना दिसतेय कशाला ! आणखी गाडींत तरी त्यांना असा किती वेळ काढायचा होता ! फक्त उजाडेपर्यंत !--

जात जातीला वैरी असते असं म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. दुर्गा-अक्का डब्यांत चढल्यापासून, सुमन, विमल, कमल, कुंदा या साऱ्या जणींचें लक्ष्य दुर्गाअक्कांकडे वेधलें होतें. त्या आंत आल्या, त्यांची आणि त्यांच्या पतिराजांचीं बोलणी झालीं; पतिराजांनीं बजावून सांगितलें तें त्यांनीं ऐकलें. त्यांनीं दिलेलीं आणि दुर्गाअक्कांनीं मुकाट्यानें घेतलेलीं विशेषणेंही त्यांच्या कर्णसंपुटांत सांचलीं होतीं. स्त्री असो कीं पुरुष असो, आणि कितीहि सुशिक्षित सभ्य असो; त्याला दुसऱ्याची कुचेष्टा करून करमणूक करण्याची खोड थोडी फार असतेंच. त्या विद्याविभूषित तरुणींना दुर्गाआक्का एक जुन्या प्रकारचें मॉडेल ( Old model ) कुचेष्टा करायला अनायासं मिळालं. मग का त्या ती संधि दवडणार ! आतांपर्यंत अनेक गंभीर विषयांवर त्यांचीं बोलणीं झालीं होतीं. शेले, कीटस, बायरन्, पोप इत्यादि कवींचा; वेल्स, एड्गर वॉलेस, व्हिक्टोरिया क्रॉस, मेरी कॉरेली, झोला, इत्यादि कादंबरीकारांचा, आणि शेक्स्पिअर, शॉ, गॅल्सवर्दी, ऑस्करवाईल्ड इत्यादि पाश्चात्य, तसाच पौर्वात्य, नाटककार, कवि, कादंबरी-कार, लघुकथालेखक, या सर्वांचा बुद्धिशक्तिनुसार चांगला समाचार घेतला जात होता. जड विषय काढून बुद्धीला, मनाला आणि जिभेला चांगलंच जडत्व आलं होतं. त्यांना आतां चुरचुरीत खुसखुशीत विषयांची जरूरी

शीण जायला होतीच होती. पण थट्टा–मस्करीला ताबडतोब विषय तर मिळाला पाहिजे ! तो लवकर न मिळाल्यामुळें सुस्त होऊन जागच्या जागीं प्रत्येकाला किंचित् झोंपेची तंद्रीदेखील आली होती, ती इतकी कीं, मिरज स्टेशनवर मध्यंतरीं आपल्याला लागेल म्हणून आपापल्या बरोबरच्या थर्मासांतून चहा भरून घेतला होता; तो देखील प्यायचा तसाच राहिला होता. कोरेगांव स्टेशनवर दुर्गाअक्कांच्या चढण्याच्या घाईगर्दीमुळें आणि त्यांच्या बोलण्याच्या गोंगाटामुळें त्यांची ती तंद्री उडाली होती.

दुर्गाअक्कांना त्यांनीं पाहिलें आणि त्यांना हवा होता तसा कुचेष्टेला–थट्टा–मस्करीला विषय मिळाला. सगळ्यांनीं एकदां दुर्गाअक्काकडे पाहिलें; नंतर एकमेकींकडे पाहिलें. सगळ्याच जणी एकदम तोंडांतल्या तोंडांत हंसल्या.

आळस टाकीत सुमन म्हणाली, "एकदां गडे अगोदर चहा तरी घेऊं या."

"दुर्गे दुर्घट हारी, तुजविण संसारीं—" विमल किंचित् ओंठ दाबून पुटपुटली.

"तूं या सुट्टींत औंधच्या यमाईला गेली होतीस कां ग ?–" कमलनं कुंदेला विचारलं.

"मला कांहीं औंधला जातां आलं नाहीं, पण–" कुंदा तिरप्या नजरेनें दुर्गाअक्काकडे पहात बोलली, "माझ्या पूर्वपुण्याईनं औंधच्या यमाईचं प्रत्यक्ष दर्शन मात्र झालं ! काय विलक्षण ध्यान आहे यमाईचं !" कमलनें थर्मास जवळ घेतलें. विमलनें आपल्याजवळच्या ट्रंकेंतल्या कपबशा काढल्या. त्या काढीत असतां ती कमलला म्हणाली, "पण कमल, तूं तुळजापूरला जाणार होतीस ना ग या वर्षी ?—"

"जाणार होतें" कमल मिस्किलपणानें म्हणाली, "तुळजापुरवासिनी अंबाबाईनं मला स्वप्नांत येऊन सांगितलं कीं, तूं कांहीं इथपर्यंत यायची तसदी घेऊं नकोस. मीच तुला आगगाडींत केव्हां तरी एकदां प्रत्यक्ष दर्शन देईन ! आणि पहातें तर तें अगदीं तस्सं झालं !!"

सुशिक्षित, सालस मुली पण किती निर्दय नाहीं का ? दुर्गाअक्कांची

त्यांनीं अशी थट्टा करावी कां ?. हीच दुर्गाअक्कांच्या ऐवजी त्यांचीच एकादी नात्यागोत्यांतली वेंधळी बाई असती, तर त्यांनीं अशी तिची निर्दय थट्टा आरंभली असती का ? पण जगच तसं आहे. मानवी स्वभावच असा आहे त्याला कोण काय करणार ? आपली ती बाबी आणि लोकाची ती कार्टी !—

आतांपर्यंत दुर्गाअक्कांचे त्या मुलींच्या बोलण्याकडे लक्ष्यच नव्हतें. आणि असतें तर तें त्यांना कितपत कळलं असतां कुणास ठाऊक !

त्या मुलींपैकीं एकीनेंहि दुर्गाअक्काला वर–जवळ बसा, असं सांगण्याचं सौजन्य दाखविलं नाहीं. मुद्दाम घाण जवळ कोण घेणार !

मुलींचें प्रवचन पुढें चालूं झालं––

" मिस् केळकर उगीच कोल्हापूरला गेली. ती असती तर तिलादेखील कोल्हापूरच्या अंबाबाईचं दर्शन झालं नसतं का !–" एकजण म्हणाली.

" पण माणसाचा विश्वास पाहिजेना ! " दुसरी उद्गारली.

" बाकी, आज मिस् केळकर बरोबर हवी होती. खूप आणखी मजा आला असता ! " तिसरी उद्गारली.

" पण काय ग, कोल्हापूरला मिस् केळकरला अंबाबाई एकटीच भेटली असेल कां आपल्या शेंबड्यालेंबड्या मुलांबाळांसुद्धां भेटली असेल !—

" म्हणजे जशी आपल्याला भेटली !—"

" हो !—"

" खरंच तिची गांठ पडल्यावर मुद्दाम तिला हें विचारलं पाहिजे ! "

फिदी फिदी असं जरासं मध्यें हास्य पिकलें आणि नंतर विषय जरासा बदलला—

इकडे या वेळीं दुर्गाअक्का किंचित् पेंगूं लागल्या होत्या. अंगावरचं मूल जरा हंसत खेळत होतं तें एकाएकीं रडायला लागलं. दुर्गाअक्कांनीं डोळे उघडून पाहिलें तों त्यांच्या लाडक्या बाळानं त्यांच्या नव्या कोऱ्या लुगड्यावर शी केली होती—त्या धीमेपणानें, " हा गुलामा–हगलास कां ! " करीत बोचक्यांतलं फडकं काढून बाळाला पुसूं लागल्या––

-२

इकडे कमल सुमनला म्हणाली, "खरंच, मिस् केळकर आज आपल्या-बरोबर असती, तर काय झालं असतं--"

" तिनं असली घाण आपल्या डब्यांत मुळींच येऊं दिली नसती---होऊं दिली नसती--" कुंदा एकदम उत्तरली !

" चूक ! " कमल म्हणाली, " आपल्या व्याख्यानबाजीला विषय हवा म्हणून असली घाण मुद्दाम Import केली असती ! "

" खरंच !--" एकीनें पुष्टि दिली.

" बाकी जग आहे तसं आहे अं अजून ! त्यांत कांहीं फरक नाहीं. आपल्यालाच आपलं वाटत असतं. आपल्यावरून जग खूप पुढं गेलं आहे —सुधारलं आहे असं वाटे, पण अं हं ! तें जिथं आहे तिथं आहे ! "

" अगदीं आपल्यासमोर ! " एकजणीनं समस्यापूर्ति केली " आम्हीं फार प्राचीन काळीं कशा होतों. याची वर्णनं अजून ज्ञानकोशांत वाचण्याची किंवा म्युझिअममधून " Model " वरून पाहण्याची पाळी आलेली नाहीं ! खरें ना ! "

पुन्हां एकहां सगळ्याजणींचा मिश्र हास्यध्वनि झाला.

मध्येंच थर्मासमधल्या चहाचे कप कमलनें भरले—सगळ्यांनीं एकेक कप घेतला—एकीला हुक्की आली. शिल्लकींतील एक कप दुर्गाअक्कांना द्यावा. त्या निमित्तानें एकादा शब्द त्यांच्याशीं बोलतां येईल. आणखी कांहीं बोलायला विषय मिळेल. कुंदा भरल्या चहाचा कप घेऊन उठून दुर्गाअक्कांकडे वळली—" तुम्हीं चहा घेतां का ! " गंभीरपणानें विचारल.

" अं हं !—"

" अग, अग, कुंदे, हें काय ! " सुमन ओरडली. त्या आगगाडींतला भ्रष्टाकाराचा चहा घेतील ! विटाळ नाहीं का व्हायचा त्यांना !—"

कुंदा मागें वळली. ती हंसली. सगळ्याजणींच तोंडाला हातरुमाल लावून हंसल्या. दुर्गाअक्कांचें त्याकडे लक्ष्य गेलें. आपल्यावरूनच त्या हंसल्या हें त्यांनीं ओळखलें. त्यांना कसेंसेंच झालें. त्या जरा विरमल्या. त्यांना त्यांचा राग-देखील आला. कां त्यांनीं आपल्याला हंसावं ! त्यांचा आपला संबंध काय ! हंसायला आपण अशा काय नागड्या नाचलों ! असें दखील

त्यांच्या मनांत तत्क्षणीं येऊन गेलें. त्या इतका वेळ गैरसावध होत्या. त्या आतां सावध झाल्या. आपल्याबद्दल त्या कुटाळ पोरी काय काय बडबडताहेत तें ऐकलं पाहिजे, असं त्यांना वाटूं लागलं व त्या शहाण्यासुरत्या पोरींच्या पुढें बोलायचं काय, किंवा त्यांच्या तोंडाला लागायचं कसं! हें दुर्गाअक्का जाणून होत्या. पण त्यांच्यानें राहवेना. त्या त्यांच्याकडे एकसारख्या पाहूं लागल्या.

या शहाण्या अगदीं रंगांत आल्या होत्या. त्या जुन्या चालीच्या अडाणी बाईला आपण कांहीं बोललों तरी कळणं शक्य नाहीं, कळलं असतं तर तें यापूर्वीच कळलं असतं आणि तिनें आपलं थोबाड तत्क्षणीं बंद करून टाकलं असतं; अशी त्यांची कल्पना होऊन त्या सगळ्या जणींचा मनसोक्त वाक्प्रवाह चालूंच झाला—

"पण इतकं हें अजून असूंच कसं शकतें!"

"मी सांगतें कसं असूं शकतं तें!—"

"सांग—सांग—"

"जिथपर्यंत जगांत बैल—रेडे मनुष्यस्वरूपांत वावरताहेत—"

"तिथपर्यंत बायकांच्या स्वरूपांत गायी—म्हशी या असायच्याच!—"

"असं—आतां कसं ओळखलंस!—"

"प्रत्यक्ष देखतां डोळां बायका म्हशीसारख्या फतकल घालून बसतात म्हणून—"

"मुलांचा कुला कोऱ्या लुगडयाला पुसतांना त्यांना कांहीं वाटत नाहीं म्हणून—"

"नवरा तोंडावर खुशाल अजागळ म्हणतो तरी त्या मुकाट्यानं ऐकून घेतात म्हणून— "

"कां त्यांना नीटनेटकं वागावंसं वाटतं!—"

"कां लोक आपली कुचेष्टा करतात हें त्यांना कळतें!—"

"कां यांना सुधारावसं वाटतं!—"

"छे मुळींच नाहीं. उलट चांगलं वागणारालाच या चांगलं म्हणाऱ्या नाहींत."

" बरा विषय निघाला. आतां उजाडेपर्यंत झोंप तर यायची नाहीं. वेळ कसा जाईल याची पंचाईत होती. "

" पण असा सुंदर विषय मिळाल्यावर वेळ कां जाणार नाहीं ! "

" खरंच, मला एक कोडं पडलं आहे, नवरे आपल्या बायकांना अजागळ म्हणतात म्हणून त्या तशा मुद्दाम वागतात कीं, त्या तशा असतातच म्हणून ते तसे म्हणतात—"

" जावें त्याच्या वंशा तेव्हा कळे ! —"

" नाहीं तर जे त्या वंशाला गेल्या आहेत, त्यांना विचारलं तर कळे ! " कुंदा म्हणाली आणि तिनें दुर्गाअक्कांकडे पाहिलें. सगळयाजणींनीं सहेतुक त्या वेळीं दुर्गाअक्कांकडे पाहिलें. तों काय ! त्या डोळ्याला पदर लावून एकसारख्या हुंदक्यांवर हुंदके देऊन रडत होत्या !

त्या सार्‍या चकित झाल्या. स्तब्ध बसल्या ! मस्करीची कुस्करी झाल्याचे त्यांना आढळून आलें. आतां त्या बाईची समजूत कशी घालायची ! क्षमा तरी कशी मागायची आणि म्हणायचें तरी काय ! पंचाईत होऊन बसली खरीच ! एकमेकीकडे त्या आपल्या वेड्यासारख्या टकमक पहातच राहिल्या.

दुर्गाआक्काला तो सर्व मारा आपल्यावर आहे हें कळलें, समजलें पण उमजेना. उत्तर देतां येईना. झक मारली आणि या डब्यांत आलों. दुसरीकडे बसलों असतों तर ! या शिकलेल्या पोरी अशा अगोचर बोलणार्‍या असतील हें नव्हतें आपल्याला माहित ! आपल्याला निघायला वेळच वाईट लागली—आपल्याला वाईट म्हटलं आपल्या मुलांना नांवें ठेवलीं—नवर्‍याला इवं तस्सं बोलल्या. आपलीच वेळ वाईट—हेंच आपण दुसर्‍या डब्यांत बसलों असतों तर—

हेंच एकसारखें आलटून पालटून त्यांच्या मनांत येत होतें आणि दुर्गाआक्कासारख्या रडत होत्या. आणि त्या मैत्रिणी !

× × ×

पुणें स्टेशन गांठायला मेलला अर्धा तास लेट झाला. मेल स्टेशनांत सातला घुसली. उतारूंची उतरण्याची घाई, हमालांची गर्दी, उतरून घ्यायला आलेल्या लोकांची एकच तारंबळ उडाली !

सर्व मेल खाली झाली !

तोंड मळून गेलेली सुधाताई एका डब्यांतून उतरली. तिचें सामान हमालांनीं बाहेर काढलें. त्या बायकाहि उतरल्या. त्यांचे सामान बाहेर निघालें. सुधा इकडे तिकडे पाहूं लागली.

रडून रडून डोळे लाल झालेल्या दुर्गाआक्का कडेवर मुलाला घेऊन दुसऱ्या डब्यांतून आपल्या दुसऱ्या मुलांना जागे करून घेऊन उतरल्या. सुमन, कमल, वगैरे तरुणीही उतरल्या !

दुर्गाआक्कांनीं इकडे तिकडे पाहिलें. दुर्गाआक्कांचे अण्णाभाऊजी दुसऱ्या डब्यांतून जवळ आले. त्यापूर्वीच दुर्गाआक्कांनीं दुरूनच दुसऱ्या डब्यांतून उतरलेल्या आपल्या मावससासूबाई, मामेसासूबाई, त्यांच्या लेकी, त्यांच्या सुना, आणि त्यातच आपली धाकटी बहीण सुधाताई या सर्वांना पाहिलें. तसेंच सुधाताईनें पण दुरूनच आपल्या जिवलग मैत्रिणी—सुमन, विमल, कमल, कुंदा, आणि त्यांच्याच बरोबर आपली वडिल प्रेमळ बहिण दुर्गाआक्का या सर्वांना पाहिलें. ओळखलें. अण्णाभावजींच्या ताब्यांत गाठोडें आणि मुलें दिलीं. दुर्गाआक्का लगबगीनें निघाल्या आणि उतरून घ्यायला आलेल्या रावसाहेबांच्या माणसाच्या ताब्यांत आपलें सामान देऊन सुधाताई पण पुढें आली.

बहिणी बहिणींच्या भेटी झाल्या.

" तूं याच गाडींत होतीस !—"

" हो—आणि तूंहि याच गाडींत ?—आणि तुम्ही पण याच मेलमध्यें ! "

" नाहींतर काय—" सर्वच मैत्रिणी म्हणाल्या !

तिथेंच कळलें कीं, ही सर्वच मंडळी रावसाहेबांच्या चिरंजीवांच्या लग्नाला आलेलीं आहेत. तसेंच सुधाताईच्या मैत्रिणींनीं दुर्गाआक्कांना आणि दुर्गाआक्कांच्या मामेसासूबाई, मावससासूबाई, त्यांच्या लेकी—सुना यांनीं सुधाताईस यथास्थित छळलें ! जुन्यांनीं नव्याचा समाचार घेतला. नव्यांनीं जुन्याची रेवडी उडविली—फिटंफाट झाली ! इकडे बोलायला नको. तिकडे चालायला नको ! पण बोलायचं तर उभयपक्षीं ग्राह्याग्राह्य ठरवायला हरकत नसावी, एवढें म्हणतां येणार नाहीं का !

---

# व्यवहाराचा बळी ! : : ४

दिवसेंदिवस विष्णूपंतांचा छोटा भास्कर जास्तच खंगत चालला. त्याला वेळेवर आणि योग्य औषधोपचार झाले तर अजूनहि हातीं लागण्यासारखी त्याची प्रकृति होती, नाहीं असें नाहीं; पण विष्णूपंतांची सध्यांची एकंदर परिस्थिति अशी हलाखीची होती कीं, आपल्या भास्करची स्थिति समजत असूनहि जाणून बुजून ते डोळ्यांवर कातडें ओढीत. ओढघस्तीच्या स्थितींत काय करतील तर !

कमळाबाई वरचेवर आपल्या मुलांच्या स्थितीकडे पतिराजांचें मन वेधवीत. आईचाच जीव तो, मुलांकडे कशी डोळेझांक करील ! आपली स्थिति त्या जाणत नसत असें नाहीं. पण म्हणून काय झालें ! देखतां डोळा कां आपला सोन्यासारखा पोटचा गोळा मृत्यूच्या दाढेला द्यायचा ! त्या पतिराजांना म्हणत, ' नाहीं आपली सोय तर कुठून लावायला नको का ! हातपाय हालवायला नकोत का ! डॉक्टरवैद्य बघायला पाहिजेना !–'

विष्णूपंत कमळाबाईंची समजूत घालीत ' गरीबाला डॉक्टरवैद्य पाहिजे कशाला ! आपले उपाय म्हणजे निसर्गोपचारांचे ! निसर्गरूपी वैद्यापुढें इतर वैद्य कुचकामाचे आहेत !' आणि हंसत. त्यांचा स्वभावच हंसरा होता. सुखांत हंसत, दुःखांत हंसत. हंसूनच ते आपलें आयुष्य गोड करून घेत.

पण कमळाबाईंना अशा भलत्यावेळीं कसें हसूं येईल. त्यांचा जीव भास्करबाळाच्या काळजीनें करपून जाई.

एक दिवस भास्करबाळाचें जास्त झालें !

कमळाबाई घाबरल्या. त्यांनीं विष्णुपंतांना निकरानें बजावलें. 'आतांच्या आतां जा आणि डॉक्टरला-वैद्याला आणा. त्याशिवाय मी अन्न घेणार नाहीं.'

विष्णुपंत चमकले. म्हणजे भास्करबाळाची प्रकृति पाहून आणि कमळाबाईची कडोकडीची प्रतिज्ञा ऐकून खरेंच विष्णुपंत दचकले !

डॉक्टरवैद्यांकडे जायचें ! पण जायचें कसें ! पैशाशिवाय येणार कोण आणि तो " पैसा " आणायचा कुठून ! विष्णुपंतांना पंचाईत पडली

" जातां कीं नाहीं ! ' या अर्थानें कमळाबाईंनीं ते हलत नाहींत असें पाहून पाहिलें, तेव्हां त्यांनीं आपली खरी अडचण सौभाग्यवतीपुढें गंभीरपणानें मांडली. एरव्हीं त्यांना आतांचा गंभीरपणा आणतांच आला नसता !

विष्णुपंतांची अडचण ऐकून कमळाबाई त्यांच्यावर खेंकसल्या-' स्नेही-सोबती जगांत खंडीभर आहेत-इतके येतात, रहातात, जेवतात, खातात, पितात आणि जातात; त्या सोळभोकापैकीं अशा वेळीं का उपयोगी पडायचा ! येतात ते सारे ऐतखाऊच का असतात !

एरव्हीं कमलाबाई असें कधीं बोलायच्या नाहींत. पण त्यांना मुलांच्या अजारानें जरा चिडखोर बनविलें होतें खरें !

त्या काय सांगतात हें विष्णुपंत ऐकत होते. विचार करीत होते.

" एकाद्या मित्राकडे जा त्याच्याकडे पैसा मागा आणि वेळ निभवा."

" मित्राकडे जाऊन पैसा मागूं !-म्हणजे हा काय व्यवहार होईल ! "

" व्यवहार गेला चुलींत ! " कमळाबाई अधिकच वैतागल्या, " व्यवहाराकरितां बाळ गमवायला आपली असेल तयारी, माझी नाहीं. मला अव्यवहारी म्हटलं तरी चालेल. कांहीं अंगाला भोकं पडत नाहींत. अन् आपल्या पण पडायचीं नाहींत. व्यवहार म्हणे व्यवहार ! आग लावा त्या व्यवहाराला तसल्या ! "

" तुम्हां बायकांचं म्हणजे असं असतं-" विष्णुपंत बायकोची समजूत घालूं पहात होते,-"माझं म्हणणं-तुम्हां बायकांची समज निराळी-आम्हां पुरुषांचं तें असं असतं-व्यवहाराकडे जरा जास्त-"

" समजलं. पुरे करा ! " कमळाबाई आणखी संतापानें चवताळल्या. पुढ्यांत आजारी भास्कर बाळ जर तळमळत होता, तर त्या माउलीला संताप आल्याखेरीज कसा राहील ! त्या उसळल्या, " व्यवहार तेवढा पुरुषांनाच असतो अन् बायकांना नसतो का ! मित्राला जाऊन लुबाडा, भिक्षा, जोगवा मागा, नाहींतर दान घ्या, असं नाहीं कांहीं सांगत; अन् व्यवहार सोडा म्हणत. मित्रांकडे उसनवारी केली तरी व्यवहार चुकतो का ! "

आतां विष्णुपंतांच्या डोक्यांत थोडा प्रकाश पडला. घरगुती गरजेकडे उसन्याकरितां कां होईना पण लाचारी पत्करून तोंड वेंगाडणं एकंदरींत,

कमीपणाचंच हें त्यांच ठाम मत; परंतु वेळकाळ पाहून आणि कमळाबाईचा अवतार व भास्करबाळाची अवस्था पाहून ‘उसनवारी’पुरता व्यवहार सोडायला विष्णुपंत तयार झाले. त्यांनीं कमलाबाईला सांगितलें, “ हें पटलें आपल्याला. उसनवारी कुणाकडे तरी करायला जातों. इतके मोठे स्नेही आहेत. कुणीहि गरज भागवील आपली. पुढच्या सुगीपर्यंत ज्यांचें देणें त्यांच्याकडे परत करूं म्हणजे झालें.”

कमळाबाईना पतिराज वळल्याचें पाहून जरा बरें वाटलें.

विष्णुपंतांनीं कुणाकडे जावें याबद्दल मनाशीं बरीच भवती न भवती केली. अखेर त्यांनीं ठरविलें, लहानपणचा आपला शाळासोबती पण आतां चांगला ‘रावबहाद्दूर’ झाला आहे त्यालाच गांठावं. केव्हां केव्हां आपल्याकडे तो येऊन गेलेला आहे. ओळखतो, जाणतो, मानतो. मोठा झाला तरी लहानपणींची ‘अरे तुरे’ची दोस्ती रावबहादूर दामुअण्णा धनेश्वर यानें कायम राखली आहे, तेव्हां त्याच्याकडेच जाव हें श्रेयस्कर.

त्यांतल्यात्यांत विष्णुपंतांना दामुअण्णा धनेश्वरांची आठवण झाली, त्यांच्याकडे उसनवारीस जावें असें वाटलें, याचा त्याला आनंद झाला. कारण त्यांच्याबद्दल त्यांना एकप्रकारची खात्रीच वाटत होती. तशी खात्री वाटण्यासारखें उभयतां मित्रांचें आतांपर्यंतचें वागणेंच होतें.

आपण दामुअण्णा धनेश्वराकडे जाणार; आपलें काम जातांच फत्ते होणार. आपल्याला डॉक्टर, वैद्य आपल्या भास्कर बाळाकरितां आणतां येणार—बाळ खड्यासारखा नीट होणार—

विचारमालिका विष्णुपंतांच्या डोक्यांत कशी सुसूत्र आली, त्यांनीं बाळाकडे पाहिलें. त्याला ग्लानि कीं झोंप आली होती. थोड्या वेळापूर्वी गडबडलेले विष्णुपंत आतां आपल्या मूळच्या स्वभावधर्मावर आले. चुटक्या वाजवीत, हंसत ते कमळाबाईना उद्देशून म्हणाले, ‘ आतां तूं काळजी करूं नकोस. तूं युक्ति सुचविलीस फार चांगली गोष्ट झाली. उद्यां आमच्या दामुअण्णा धनेश्वरांकडे जातों. पुष्कळ दिवस तो बोलावतोच आहे, घेतो त्याचा फायदा, त्याच्याकडे आपलें काम होणार. जसा कांहीं भगवान् श्रीकृष्ण आहे आणि मी त्याचा गरीब मित्र सुदाम आहे समज. सुदाम

कृष्णाकडे गेला, तर त्याने त्याला सोन्याची नगरी दिली. दामुअण्णा धनेश्वर काय आपल्या 'बाळा'ला बरें करण्याइतका आणि तोहि उसना 'पैसा' देणार नाहीं!–हं, आतां एवढं कर. कृष्णाकरितां सुदामानें 'पोहे' नेले होते. दामुअण्णाला तुझ्या हातच्या 'चकल्या' आवडतात, त्या दे. देवाच्या, राजाच्या आणि मित्राच्या दर्शनाला रिक्त हस्तानें जाऊं नये असें आहे! तो व्यवहार आपण चुकूं नये. चुकलों तर व्यवहाराला आणि लोभालाहि आणि लाभालाहि मुकूं. तेव्हां या सुदाम्याला त्या कृष्णाकडे पाठवितांना सुदाम्याची बायको जशी वागली तशी तूं...पण कमळाबाईना हें सांगावयाला कां पाहिजे होतें!

दुसरेच दिवशीं धनेश्वरांकडे विष्णुपंत निघून गेले.

दामुअण्णा धनेश्वरांनीं आपल्या बालमित्र विष्णुपंतांचें त्याच्या कल्पनेपेक्षांहि जास्त 'स्वागत' केलें. विष्णुपंत त्यांच्यासमोर येऊन टाकले तेव्हां दामुअण्णा किती विलक्षण गडबडींत होते. वर्तमानपत्राचा बातमीदार त्यांची मुलाखत घ्यायला आला होता. कोणी ग्रंथकार आपला नवा ग्रंथ धनेश्वराना 'सप्रेम अर्पण' करण्याकरतां परवानगी मागायला बसला होता. 'मॅटर्निटी होम,' 'अनाथ अर्भकालय' 'दुहिताशाळा' यांच्या संचालकांपैकीं कोणी कोणी तेथं हजर होते; तर कोणा देशभक्ताला 'थैली' अर्पण करावयाची होती, त्याकरितां वर्गणी मागावयालाहि धनेश्वराकडे कोणसेसें धरणें धरून बसलेंच होतें.

त्या सर्व गराड्यांत वास्तविक इकडचें तिकडे करावयास धनेश्वरांना फुरसत नव्हती, तरी तेवढ्यांत बालपणाचा आपला मित्र 'विष्णू' त्यांना अकस्मात दिसतांच, त्यांना कोण आनंद झाला! सर्व उद्योग बाजूला सारून हंसतमुखानें जागेवरून उठले आणि

"अरे! विष्णु! हा कसा पश्चिमेकडे सूर्य उगवला आज!" असे म्हणत अत्यंत स्नेहभावानें त्यांच्याजवळ जाऊन हस्तंदोलन केलें!

दामुअण्णा व विष्णुपंत ह्यांच्या बाह्य फरकावरून आणि आंतरिक सौहार्दावरून तेथें असलेल्या मंडळींना तो देखावा म्हणजे पंचमजॉर्ज बाद-

शहा अर्धनग्न महात्माजींशीं " हस्तांदोलन " करीत आहेत अशा-सारखाच वाटला. !

दामुअण्णांनीं विष्णुपंतांना आपल्याजवळ आणून बसविलें. केव्हां आला, कसें काय आहे ? येणार म्हणून पुढें कां कळविलें नाहीं, '

"ये–ये म्हणून हजार वेळां लिहिलें, सांगितलें, तेव्हां आज यायला झालं कां ? आमच्या वहिनी कशा आहेत–तुझे छोटे बाबालोक––

आतां हें मित्रामित्रांचें हितगुज पुष्कळ लांबणार अशी कल्पना होऊन आलेल्या मंडळीतील एकानें पुन्हां यावें, आतां जावें असा विचार करून " साहेब, आतां येतों आम्हीं, पुन्हां उद्यां येऊं " असें म्हणत निघण्याची तयारी दाखविली.

विष्णुपंतांना तोंड उघडायलाच वेळ मिळाला नाहीं.

दामुअण्णा आपल्या व्यवहाराकडे वळले.

ज्यांची ज्यांची जी जी इच्छा होती त्यांची त्यांची ती ती इच्छा, मनिषा ऐकली. प्रत्येकास दामुअण्णांनीं यथाशक्ति–यथामति सहाय्य करून सहाय्य करण्याचें वचन देऊन हंसतमुखानें वाटेला लावलें.

प्रत्येकाचें थोडें फार तरी दामुअण्णांकडे ' कार्य ' झाल्यामुळें निरोप घेणारी व्यक्ति दामुअण्णांना अत्यंत नम्रपणानें लवून नमस्कार करीत होती आणि मग बाहेर पडत होती.

कोणाला पांचशें कुणाला पन्नास, कुणाला शंभर, असें दामुअण्णांकडून दान पडत होतें.

विष्णुपंताच्या समक्ष त्या सर्व गोष्टी घडत होत्या.

प्रतिक्षणीं धनेश्वरांबद्दलचा आदर चक्रवाढीनें विष्णुपंतांच्या मनांत वाढीस लागला होता. ' उगाच नाहीं धनेश्वर रावबहाद्दूर झाला ! फुकट नाहीं वर्तमानपत्रांतून, नियतकालिकांतून दामुअण्णांचे फोटो, आणि त्यांच्या-वर स्तुतिपर लेखावर लेख येत ! असें लोकोत्तर दानशूरत्व असल्याखेरीज का, जगप्रसिद्ध ' लोकप्रियता ' मिळत असते ? '

असें उदात्त विचार विष्णुपंताच्या मनांत उत्पन्न होत नसतील असें छातीठोकपणें कुणीतरी विचारी म्हणूं शकेल का ?

मंडळी गेल्यावर धनेश्वर सावकाशपणें आपल्या ‘ विष्णू ’च्या सरबराई-कडे लक्ष देते झाले.

त्यांच्या चहाफराळाची, स्नानाची वगैरे व्यवस्था जातीनें नोकरांना सांगून करविली.

स्नानाच्यावेळीं चांदीचा चौरंग सोन्याचें घंगाळ आणि उटणीं लावायला कृष्णाच्या आज्ञेनें खुद्द रुक्मिणीदेवी ‘ सुदामा ’ करितां हजर होत्या, तसाच प्रकार जरी हुबेहुब यावेळीं अनुभवाला आला नाहीं, तरी आधुनिक कालास अनुसरून सर्व कांहीं यथास्थित धनेश्वरांच्या ऐश्वर्याला साजणारें होतें.

जेवणाच्यावेळीं धनेश्वराप्रमाणें, बसायला पाट, टेकायला पाट, ताटाखालीं पाट, चांदीच्या ताटवाट्या, आणि तांब्याभांडीं, असा तर थाट होताच, पण धनेश्वरांनीं आपल्याजवळ त्यांना स्थान दिलें होतें. बरोबर, त्यांचीं मुलें, त्यांच्या सौभाग्यवती होत्या, सर्वांचा थाट सारखाच होता. जेवायला उत्कृष्ट पक्वान्नं होतीं. !

जेवण चालू असतां खूप गमती झाल्या.

दामुअण्णांनीं आपल्या सौभाग्यवतीला सांगितलें—

‘ ऐकलं, हा तुमचा विष्णुभावजी ! ’

रावबहाद्दुरीणबाईनीं कळत नकळत हंसल्यासारखें करून ! होय का ? अशा अर्थानें किंचित् विष्णुपंताकडे पाहिलें.

दामुअण्णांनीं आपल्या मुलांना सांगितलें—

‘ अरे, अग, हा तुमचा ‘ विंचुकाका ’ बरं का !—

मुलांनीं व मुलींनीं एकदां विष्णुपंताकडे, एकदां वडिलांकडे आणि एकदां आपल्या आईकडे आणि एकदां आपापसांत असें आळीपाळीनें पाहिलें. पाटावरच अंग घुसळलें, खालीवर पाहून ‘ फिदी फिदी सारींच मुलें हंसलीं. त्या ‘ बालिश ’ हंसण्याचा अर्थ काय असेल !—

“ काय ! हे आपले ‘ काका ! ’ अन् ‘ विंचू ’ काका !— ”

धनेश्वरांना विष्णूपंताची आणखी स्तुति करावी, आणखी आपल्या सौभाग्यवतीला त्याची माहिती करून द्यावी असें वाटलें. त्यांचा मित्र फारा दिवसांनीं भेटलेला, घरीं आलेला. तेव्हां त्याच्याबद्दल किती आणि

काय बोलूं त्याला कुठें ठेऊं--कसा झेलूं असें धनेश्वरांना होऊन गेल्यास, त्यांत नवल कां आहे ?

" हा विष्णू अती बोलका--भारी विनोदी, विनोद पंडित कोल्हटकर गड-कऱ्यांचा नमुनाच दुसरा ! अति बोलायचा ! आम्हाला, शिक्षकांना असा हंसवायचा ! असा हंसवायचा ! कीं विचारूं नका !--आम्हीं मठ्ठ ! आम्हाला तें जमायचं नाहीं. "

याच वेळीं दामुअण्णांना आणखी एक आठवण झाली, ते आतां मित्राकडे वळले आणि म्हणाले---

विष्णु, तूं याच्यापूर्वी यायला पाहिजे होतास. तुझ्या वहिनीनें ' नाटक' लिहिलें आहे. तें लिहीत असतांना तूं असतास तर ' विनोदी प्रयोग ' लिहितांना तुझा फार उपयोग झाला असतां, वेळोवेळीं हिला ' विनोद ' लिहितांना अडचण पडे मला विचारी मला काय ' विनोद येणार कपाळ ? अखेर जसा येईल तसा लिहिला आहे. विनोद आज रात्रीं पहाशीलंच तूं! आजच आहे तुझ्या वहिनीच्या ' नाटका 'चा पहिला प्रयोग. बाकी त्या दृष्टीनें तूं आज आलास हें फार चांगलं झालं. तुझ्यासारखा रसिक आणि मार्मिक प्रेक्षक आपल्या ' नाटका 'ला लाभला हें तुझ्या वहिनीचं खरो-खरच भाग्य आहे. "

रावबहाद्दुरीणबाईकडे विष्णुपंतांनीं मोठ्या आदरानें पाहिलें.

" बाकी विष्णु, स्त्रियांनीं नाटकें लिहिणें तुला कसं काय वाटतें ?—"

उगाचच कांहीं तरी प्रश्न करावयाचा म्हणून धनेश्वरानें विचारलें.

" स्त्रियांनीं नाटकांत कामें करण्यापेक्षां नाटकें लिहिणें फार चांगलें !" अशासारखें विनोदी उत्तर देऊन आपलें ' विंचूकाका ' नांव सार्थ करावं असं विष्णूपंतांना वाटलें, पण तो व्यवहार नव्हे, म्हणून ते स्वस्थ राहिले. हंसूनच संमती त्यांनीं दर्शविली.

जेवणें झालीं. विष्णुपंतांना खूप आणि मनापासून आग्रह झाला. जेवतांना विष्णुपंतांच्या सौभाग्यवतीच्या साध्या पण रुचकर स्वयंपाकाची दामुअण्णांनीं आपल्या सौभाग्यवतीजवळ तारीफहि केली. कारण कमलाबाईच्या हातचा स्वयंपाक त्यांनीं पुष्कळदां चाखला होता.

पानसुपारी झाल्यावर नोकरांनीं अगाऊच पाहुण्यांची स्वतंत्र जागेंत वामकुक्षीची जय्यत तयारी केली होती; तिकडे विष्णुपंतांना दामुअण्णांनीं नेलें. ' दमला आहेस. आतां चांगली विश्रांती घे. रात्रीं नाटकाला जागायचं आहे ' असें सांगून दामुअण्णा स्वतः दोन घटका विश्रांतीसाठीं आपल्या खोलीकडे गेले.

वामकुक्षी संपली. मधल्या वेळचा चहा झाला. संध्याकाळचीं जेवणेंहि लवकरच आटोपलीं. जायची घाई म्हणून दारांत उभ्या असलेल्या स्वस्तः-च्याच मोटारींत बालगोपाल केव्हांच जाऊन बसले. रावबहाद्दुरीणबाईचं नटणंसजणं झालं. जामानिमा झाला. विष्णुपंतांना मोटारींत आपल्या जवळ घेऊन सर्वांसह रावबहाद्दूर नाटकगृहांत दाखल झाले.

लोकप्रिय रावबहाद्दुरांच्या विदुषी बाईसाहेबांचें पहिलेंच नाटक म्हणून नाटकगृह चिक्कार फुललेलें होतें. विष्णुपंतांना त्यांचे पाहुणे म्हणून पहिली मानाची खुर्ची मिळाली हें सांगायला कां पाहिजे ! नाटक चालू असतां मधून मधून अपेक्षेनें धनेश्वर विष्णुपंतांकडे पहात विष्णुपंत चेहरा खुलवून दरवेळीं नाटक मंडळीबद्दल विशेषतः नाटककर्त्रीबद्दल प्रशंसापर उद्गार काढीत होते. सन्माननीय पाहुण्यांचें व्यवहारांत हें कर्तव्यच नव्हतें काय !

अंक संपला तेव्हां बोलतांना धनेश्वरांनीं सांगितलें, इतकी गुणी मंडळी, पण डबघाईला आली होती. तुझ्या वहिनीचें नाटक त्यांनीं आग्रहानें मागितलें. नाटकाच्या सजावटीसाठीं म्हणून अगदीं व्यवहार दृष्टीनें हजार पांचशें रुपये ' मंडळी ' च्या मदतीसाठीं देणें भाग पडलें तेव्हां आजचें हें स्वरूप दिसलें करतां काय !

शेवटचा अंक सुरू होण्यापूर्वीं ' मंडळी ' च्या चालक व्यवस्थापकांनीं नाटककर्त्रीचें जाहिर अभिनंदन केलें. धनेश्वरांनीं ' मंडळी ' आपली म्हटलें याकरितां आभार मानले. त्यांच्या बरोबर विष्णुपंतांच्याहि गळ्यांत हार घालून ' मंडळी ' नीं मनःपूर्वक सन्मान केला !

नाटक झालें. मंडळी घरीं आनंदींत अंतःकरणानें परतली.

विष्णुपंतांनीं त्यांच्याकरितां सज्ज असलेल्या बादशाही बिछान्यावर आंग

टाकलें. पडल्यापडल्या ते धनेश्वरांच्या घरीं पाऊल टाकल्यापासून घडत असलेल्या बारीक मोठ्या गोष्टींवर विचार करूं लागले. “ आपण आलों आहोंत कशाकरितां आणि चालूं आहे काय ! ज्याची अपेक्षा नव्हती, त्या गोष्टींचा वर्षाव होत आहे. आल्याबरोबरचा सन्मान, दुपारच्या जेवणाचा थाट; रात्रींचें नाटकाच्या वेळचा अकारण सन्मान–या बाबी आपल्या कल्पनेंत तरी होत्या काय ? यांची कोणी मागणी केली होती ? ” पण त्यांची मागणी नव्हती म्हणूनच त्यांचा लाभ होत होता. संपत्तीच्या व्यवहाराचा तो दंडकच आहे. “ न मागे तयाची रमा होय दासी ! ” असें वचनच नाहीं का ?

आणि ज्याची तीव्रतेनें अपेक्षा होती. नव्हे ज्या करितांच केवळ विष्णुपंत आले होते, त्याची वाट ? पण त्याबद्दल बोलायचें केव्हां ? आल्याक्षणीं विचारणें अनुचित. दुपारीं जेवायचें वेळीं गैर आणि रात्रीं नाटकाच्या वेळीं अशक्य ! विचारावयाचें तें विचारावयाला काळवेळ तरी पाहिला पाहिजे ? काय वाटेल तें असलें तरी, तर–तम भावाचा व्यवहार म्हणून आहे कीं नाहीं ? आतां उद्यां विषय काढावयाचा—

⁂ ⁂ ⁂

घरभर गडबड उडाली आहे. दामुअण्णांची धांवपळ चालूं आहे. रावबहाद्दुरीणबाई मुलाजवळ बसून एकीकडे हुंदके देत आहेत तर दुसरीकडे ‘ अरे, डॉक्टरकडे गेलं आहे का नाहीं कुणी ? चुकार मेले सगळे ! त्यांना गिळायला मिळालं म्हणजे मालकांचीं मुलें मेलीं तर त्यांचें काय वेचतें ’ असें तोंडाला येईल तें अभद्र बोलत आहेत. नोकरवर्ग दीन होऊन किंकर्तव्य-मूढतेनें जागजागीं घोंटाळत आहे. डॉक्टर लवकर येत नाहींत म्हणून दामु-अण्णा स्वतः मोटारींतून त्यांच्याकडे निघाले आहेत—

आपल्या आगमनाचा उद्देश सकाळच्याच चहाच्या वेळीं दामुअण्णांना कळवायचा, आपलें काम करून घेऊन झटकन् परतायचें, असें मनाशीं म्हणत असलेल्या विष्णुपंतांना अंथरुणांतून बाहेर येतांच हें दृश्य दिसलें. ऐकायला मिळालें. घाईनें मोटारींतून डॉक्टरकडे जात असलेले दामुअण्णा विष्णुपंतांना ओझरते दिसले. वैऱ्यावर प्रसंग येऊं नये तो दामुअण्णावर

आला आहे असें त्यांच्याकडे पाहतांना वाटेल असा त्यांचा चेहरा झाला होता.

सकाळीं उठताक्षणीं दामुअण्णांच्या धाकट्या मुलाला चांगल्या चार शिंका आल्या होत्या. थोडीशी वांती झाली होती. डोळे लालसर आणि अंग कोमट झालें होतें. मग रावबहादुरीणबाई कां दीनवदन होणार नाहींत! रावबहादुरांच्या तोंडचें पाणी कां पळणार नाहीं ? घरांतली सर्व चाकरमंडळी हवालदील झाल्याखेरीज कशी राहतील!

दामुअण्णांचें मूल आजारी झालें.

विष्णुपंतांचा भास्करबाळ आजारीच होता, त्याकरितांच ते इकडे आले होते! पण दामुअण्णा आपल्या दुःखांत चूर असतां त्यांना बोलायचें कसें! बोललें तर त्यांना काय वाटेल! मित्र म्हणवितो आणि याला कांहीं व्यवहार वगैरे आहे कीं नाहीं! असें नाहीं का त्यांना वाटणार!

व्यवहारशास्त्राचें दणकट खटक्याचें कुलूप विष्णुपंतांच्या तोंडाला बसलें. आलों तसें जावें तरी पंचाईत; रहावें तरी पंचाईत. रहावें तर त्यांना त्यांचें घर दिसत होतें, जावें तर दामुअण्णांना काय वाटेल! त्यांचें मूल अजारी—तें बेदील असतांना—जाणें व्यवहाराचें होईल कां! दोन दिवस तसेच गेले. त्या दोन दिवसांत एकदां दामुअण्णा कांहीं तरी बोलायचें म्हणूनच बोलले, ' काय करावं विष्णू, तूं आलास, आपण बोलूं, बसूं म्हटलें तर देवानें आमच्यावर हा दुर्धर प्रसंग ( मूल अजारी पाडण्याचा ) आणला आहे. असं कांहीं झालें कीं आम्हां दोघांना आकाश कोसळल्यासारखें होतें. आम्हां दोघांचा जीव अतिशय हळवा आहे. मुलाचा आजार आम्हांला पहावतच नाहीं.'

विष्णूपंतांचे तीन दिवस तसेच निमूट गेले. मूल दुसरें दिवशींच खुशाल खेळूं लागलें. तिसरे दिवशीं दामुअण्णा माणसांत आल्यासारखें झाले. पूर्ववत् हंसूं बोलूं लागले.

आजच विचारून घ्यावें व दुपारीं रस्ता सुधारावा म्हणून विष्णूपंतांनीं दोनतीनदां दामुअण्णांच्या दालनांत डोकावलें. तों ते गर्दीत, भोंवतीं माणसें आहेतच!

पण लक्ष ठेऊन दामुअण्णा एकटे आहेत असें पाहून त्यांना विष्णू-पंतांनीं गांठले. त्यांच्याजवळ आपल्या जाण्याची गोष्ट काढली !

" वा ! वा ! आलास काय ! जातोस काय म्हणतोस ? अजून आपण बसलों नाहीं; बोललों नाहीं. मजा केली नाहीं, आणि जातों म्हणे ! जाणार कुठें ? आपण कांहीं आठपंधरा दिवस तुला मुळींच सोडणार नाहीं !––"

" अहो, पण माझें जरा ऐकाल तरी––"

" पण नाहीं आणि परंतु नाहीं. तुझं कांहीं ऐकत नाहीं. आज नाहीं उद्यां नाहीं परवां नाहीं. वेड्या, आहेस कुठें तूं ! आज तुझ्याकरितां ती बेळगांवची ' बाळी ' आली आहे, तिला शंभर रुपये ठरवून रात्रीं तिचें गाणें ठरविलें आहे. परवां आपल्या बागेंत तुला एक पार्टी देण्याचा ठराव झाला आहे, आणि म्हणे जातों. जातों म्हणायला कांहीं वाटतय काय ? इतक्यांत तिथें रावबहादुरीणबाई कशालाशा आल्या. त्यांच्याकडे पहात दामूअण्णा म्हणाले–' मी तर तुला हे चार दिवस सोडीत नाहींच. नंतर तुझ्या 'वहिनी'च्या ताब्यांत तूं. तिनें परवानगी दिल्याशिवाय तर तुला पाय बाहेर काढताच येणार नाहीं !–ऐकलत कां? विष्णु जातो म्हणतो आहे !"

" कां ! इतक्यांतच अगदीं ! आपल्या इथं आहेत तें काय अरण्यांत राहिलेंत असें वाटतं कां त्यांना? कां आमच्या इथं राहणें आवडत नाहीं?"

" तसें नव्हे पण घरीं माझी बायको !"

" वहिनींची भीति मात्र दाखवूं नकोस ! माझ्याकडे तूं आला आहेस, हें त्यांना ठाऊक आहे. मी तुला ठेवून घेणार. मी ठेवून घेतला नाहीं तर मात्र त्या माझ्यावर रागावतील. म्हणतील मित्र म्हणवतात आणि दोन दिवस सुद्धां आपल्या नवऱ्याला ठेऊन घेतलं नाहीं. जरा कांहीं, व्यवहार आहे कीं नाहीं ! "

विष्णूपंतांचें मन स्वाभाविकच उतरून गेलें.

रावबहाद्दुरीण बाई त्यांच्याकडे आणि पतीकडे पहात हंसून म्हणाल्या, " यांनीं तोंड फारच वाईट केलें––"

" तसें नव्हे. मला रहायला कांहीं हरकत नाहीं-पण घरीं माझं पोर आजारी आहे–" विष्णूपंत खरेपणानें वस्तुस्थिति सांगूं लागले पण––

" माहीत आहे. हा विष्णू बडा विनोदी आहे. त्याच्या जायचं मनांत आहे ना! आतां तो असं तोंड वाईट करून दाखविणार—मुलगा आजारी आहे म्हणून बतावणी करणार—काय वाटेल तें बनवून सांगेल ना! त्याचा स्वभाव मला काय पाहिल्यापासून माहित नाहीं! विष्णू यांपेक्षां जरी तूं सोंग केलस आणि थापा मारल्यास तरी आपण कांहीं तुला इतक्यांत सोडणार नाहीं.

विष्णुपंत अगदीं अगतिक झाले. त्यांचें मूल अजारी आहे, ही त्यांची सत्यकथाही दामुअण्णांना विनोद-कथा वाटली!—काय करणार बिचारे! अगदीं इच्छेच्या विरुद्ध—विष्णुपंतांना रहावें लागलें. बेळगांवच्या 'बाळी'च्या नाचगाण्याला बागेतल्या 'पार्टी'ला हजर रहावें लागलें—वाटलें कीं अशी थोडीशीं मर्जी राखली तर जातांना आपलें काम हमखास होईल. निदान कसला अडथळा येणार नाहीं. मात्र आतां भास्कर बाळाच्या अजाराचा उल्लेख करावयाचा नाहीं. त्याकरितां 'उसनवारी' नको, कारण तेंहि थट्टेवारीच जाणार! दुसरीच घरगुती अडचण सांगून उसनवारी करावी, असें विष्णुपंतांना वाटलें

चार दिवस राहून विष्णुपंत जायला निघाले. अधिक ओढून धरण्यांत अर्थ नाहीं म्हणून व आपणहि व्यवहारधर्माला जितकें करावयाचें तितकें केलें आहे, आतां गेला तरी हरकत नाहीं अशी कल्पना येऊन दामुअण्णांनीहि त्यांना परवानगी दिली.

निघण्यापूर्वी थोडा वेळ एकांत पाहून विष्णुपंतांनीं, जीवावर धोंडा ठेवल्यासारखें झालें तरी, जीवाची मोट करून घरगुती खर्चाकरितां पंचवीस रुपयांची दामुअण्णांकडे वहिनींकडे पहात पहात मागणी केली!

धनेश्वरांनीं पंचवीस रुपयांचीं मागणी करणाऱ्या विष्णुपंताकडे आपादमस्तक त्रिवार पाहिलें. त्यांची चर्या फिरली. विष्णुपंत यांच्या दृष्टींतून खाड्‌कन् उतरले. एकदम कमी प्रतीचे त्यांना वाटूं लागले. ज्याला बरोबरीनें वागविलें. इतका खर्च केला, मान दिला, सन्मान केला त्यानें जातां जातां क्षुद्रपणानें पंचवीस रुपयांची भिकाऱ्यासारखीं मागणी करावी म्हणजे काय? या दरिद्री लोकांना व्यवहार नसतो म्हणतात, तें ठरलेंच.

इत्यादि विचार दामुअण्णांच्या डोक्यांत आले असावेत, अशीच त्यांची चर्या झाली होती. परंतु " आंतले " हे विचार " बाहेर " दाखविणें व्यवहाराला धरून होणार नाहीं हें त्यांना माहीत, म्हणून त्यांनीं आपली चर्या बदलली. गंभीरपणानें त्यांनीं विष्णूपंतांचा हात धरला–बाजूला नेलें–आणि घाबऱ्या गहिंवरल्या आवाजांत ते त्यांना म्हणाले—

" विष्णू, काय सांगूं तुला ! माझी खरी स्थिति तुला कशी कळणार ? हा मला आलेला मोठेपणा–माझा कर्मभोग झाला आहे म्हणेनास. नसत्या उपाधी मागें. मिळालेला मोठेपणा राखण्याकरितां माझे जे हाल होत असतात त्याची तुला कल्पना येणार नाहीं. बाह्य भपका दिसतो आहेना ? पण आंत मी सारा पोंखरून गेलों आहें. बरें हें सांगायची सोय नाहीं कुणाजवळ! माझ्या बायकोजवळ सांगायची सोय नाहीं आणखी काय ! तूं मित्र–म्हणून तुझ्या-जवळ हें अंतःकरण उघड केलें आहे. मोटारवाल्याचा सहा महिन्यांचा पगार देतां आला नाहीं, पेट्रोलचीं बिलं थकलीं आहेत. कापडवाला, भुसारी यांनीं सळो का पळो करून सोडलं आहे. पण विष्णू, तुला सांगतो माझ्याजवळ वीष घेईन म्हटलें तर शिवराई शिल्लक नाहीं...सारांश काय कीं, तूं मला पंचवीस रुपये मागावेस आणि ते मला देतां येऊं नयेत यापेक्षां दुर्दैवाची गोष्ट कोणती ! माझी ही अगतिक स्थिति ध्यानांत आणून तूं मला क्षमा कर आणि..." दामुअण्णा धनेश्वरांनीं व्यवहारतेनें गोड बोलून विष्णुपंतांना वाटेल लावलें. जातांना "पुन्हां केव्हां येशील, पुन्हां येशील त्यावेळीं कांहीं दिव-साच्या सवडीनें ये–" असें सुद्धां सांगण्यांत त्यांनीं व्यवहाराची जपणूक केली !–

श्रीकृष्णाकडून परत आलेल्या सुदाम्याला आपल्या गांवाजवळ येतांना आपली नगरी सोन्याची झाली आहे असें दिसलें होतें. विष्णूपंतांना धने-श्वरांकडून परत येत असतां, आपला गांव जवळ जवळ येऊं लागला, तसें त्यांच्या दृष्टीस काय दिसूं लागलें होतें !––

अजारी भास्कर बाळ, " व्यवहाराचा बळी, झाला असेल–भयंकर कल्पना आली–विष्णुपंतांच्या डोळ्यांपुढें अंधेरी येऊन झटकन् ते वाटेंतच बसले. त्यांची दुष्ट कल्पना खरी झाली असेल तर !

---

# आत्तां जमलें ! : : : ५

“ काय रे कुजबुजतां आहांत आपसांतच ? आम्हांला नाहीं का कळण्यासारखं ! ”

आण्णासाहेब जहागिरदार आपल्या प्रशस्त आरामखुर्चीत बसून ‘ सत्य-कथे ’ चा अंक नुसताच नजरेखालीं घालीत होते. ते मोठ्यानें कांहीं वाचतील आणि आपल्यालाहि कांहीं ऐकायला मिळेल म्हणून, गिरिजाबाई-जहागीरदारीणबाई जवळच्याच झोंपाळ्यावर एका कडीला टेंकून हळूहळू एका पायानें झोंपाळ्याला चालना देत होत्या. गिरिजाबाईचें कांहीं कुठें आजूबाजूला लक्ष्य नव्हतें. पण पलीकडच्या दाराजवळच कुणीतरी हलकेंच कुजबुजत असल्याचें अण्णासाहेबांच्या ध्यानांत आलें. त्यांनीं हलकेंच पुस्तक बाजूला करून मान वळवून दाराकडे पाहिलें तों—

त्यांची मुलगी चारुशीला आणि त्यांचा जांवई शन्तनु कांहीं कुजबुजत आहेत—“ नको बाई ! अण्णासाहेब काय म्हणतील ? आई कशी परवानगी देईल ? त्यांना कसं विचारायचं ?—मी नाहीं बाई विचारीत ! ” असें खालीं मान करून, हसंत अन् शन्तनूनें धरलेला हात सोडवीत, चारुशीला म्हणत आहे; तर “ वा: ! म्हणजे काय झालं ? मी इतकं ठरविलं आहे—आणि तरी सासूबाई परवानगी देणार नाहींत ? तुला विचारायचं नसेल तर मी विचारतों त्यांना, मग तर कांहीं हरकत नाहीं—” असें दिसलें.

यांतली सर्वच वाक्यें कांहीं अण्णासाहेबांच्या कानावर आलीं नाहींत; किंवा त्यांची कशाविषयीं कुजबुज चालली आहे हेंहि त्यांना समजलें नाहीं. फक्त त्यांनीं कुजबुज ऐकली. त्यांचें तिकडे लक्ष्य गेलें आणि त्यांनीं विचारलें. त्याबरोबर चारुशीलेनें शन्तनूच्या हातांतील आपला हात झट्कन सोडवून घेतला—अण्णासाहेबांचा आवाज ऐकतांच आणि त्यांचें लक्ष्य आपल्याकडे गेल्याचें पहातांच शन्तनूनेंहि तिचा हात सोडून दिला. दोघेंहि तेथून अण्णासाहेबांच्या जवळ आलीं.

“ कांहीं नाहीं, अण्णासाहेब ! ” शन्तनूकडे पहात चारुशीला म्हणाली.

शन्तनू अगोदरच ओशाळला होता. चारुशीलेनें कांहीं नाहीं असें सांगून त्याचें तोंडच बंद केल्यानें तो जास्तच खट्टू झाला.

हुहुहुहुऽ करीत गिरिजाबाई म्हणाल्या, " चारु, कांहींतरी बोलत होतां अन् 'कांहीं नाहीं' काय म्हणतेस ग ? अशी खोटं बोलतेस का ?—"

अण्णासाहेबांचें लक्ष्य गिरिजाबाईकडे गेलें. बाहेर पाऊस पडत होता. हवेंत गारठा चांगलाच आला होता. अण्णासाहेब चारुशीलेला म्हणाले, " चारु, बाळ ! तुझी आई थंडीनं कुडकुडली आहे तरी तशीच बसली आहे. तिच्या अंगावर शाल आणून लपेट बरं. आईकडे तुझं लक्षच कसं नाहीं ? "

चारु भरेकन् आंत गेली. तिनें आपल्या आईच्या अंगावर शाल आणून लपेटली.

मध्येंच अण्णासाहेबांनीं शहारा आल्यामुळें आंग हालविलें. गिरिजाबाई म्हणाल्या, " चारु, मला थंडी वाजत होती अन् तिकडे वाजत नाहीं वाटतं ! तिकडे रग आणून दिला असतास—"

गिरिजाबाईनें चारुशीलेला सांगितलेलें काम शन्तनूनेंच केलें. अण्णासाहेबांच्या अंगावर शन्तनूनें रग आणून घातला.

अण्णासाहेब खूष झाले. ते शन्तनूकडे वळले, " चारु लबाड आहे. ती माझ्याशीं खोटं बोलली. मघाशीं कसली तुम्हा दोघांची कुजबूज चालली होती ? आम्हांला कळूं द्या तरी !—"

शन्तनूला तेंच पाहिजे होतें. अण्णासाहेबांनीं विचारल्यामुळें त्याला बरें वाटलें. चारुशीलेनें घालविलेली संधि पुन्हां मिळाली. त्यानें पट्दिशीं सांगितलें, " आज 'गंधर्व नाटक मंडळी'चा नवा खेळ आहे. त्या खेळाला आज जाण्यासंबंधानं—"

" असं ! असं !" अण्णासाहेबांनीं त्याचा आशय आपल्या कल्पनेप्रमाणें ओळखून मध्येंच म्हटलें, " नाटकाला जायला कांहीं हरकत नव्हती. पण बाहेर पावसाची रिपरिप आहे. गारठा सुटला आहे. आपल्याला कांहीं आज निभणार नाहीं बुवा ! "

" अन् मला तरी कसं बाहेर पडतां येईल ? " गिरिजाबाईनीं लगेच

आपली बाजू पुढें मांडली, " कालपासून मला बरं वाटत नाहीं. रात्रभर मला झोंप नाहीं. खोकल्यानं मेलं कसं रात्रभर भंडावलंन्. मग आज आणखी मला कसं जागरण सोसणार ? "

" पण आज आपण दोघांनीं आलंच पाहिजे असं मी कुठं म्हणतों आहे ? " शन्तनू म्हणाला, " आज आम्ही दोघंच जाऊं. आम्हां दोघांना जायला काय हरकत आहे ? मी हेंच विचारणार होतों—"

" म्हणजे काय ? " चारुशीला मध्येंच म्हणाली, " अण्णासाहेबांना येतां येत नाहीं, आईला येववत नाहीं, त्यांना सोडून मी कशी नाटकाला एकटी येणार ? "

" त्याला काय हरकत आहे ? " शन्तनूनें किंचित् रोषानें चारुशीले-कडे पहात विचारलें.

" छे छे ! चारु तरी कशी नाटकाला जाणार ? " तिच्याबद्दल अण्णा-साहेबच म्हणाले, " अशा थंडीवाऱ्यांत आणि पावसांत बाहेर पडली तर उद्यां तीसुद्धां आजारी पडेल."

" मी नाहीं ग बाई माझ्या चारूला अशा हवेंत कुठं बाहेर पाठ-विणार ! " गिरिजाबाईनीं अण्णासाहेबांच्याच बोलण्याला दुजोरा दिला.

" मग काय मी एकटाच नाटकाला जाणार ? " शन्तनू रंजीस येऊन आपल्याशींच कांहींसा पुटपुटला. पण तें अण्णासाहेबांनीं ऐकलेंच.

" छे ! छे ! तुम्ही तरी कसे जातां ? तुम्ही नाहीं का आजारी पड-णार ? जशी आम्हांला चारूची काळजी तशीच तुमचीहि आहे. चारूलाहि नेऊं नका आणि तुम्हीहि जाऊं नका ! नाटक पुन्हां केव्हां तरी पहातां येईल. आजच कांहीं गेलं पाहिजे असं नाहीं."

" आणि आतां तुमच्यासारख्यांनीं एकट्यानं रात्रीं-अपरात्रीं नाटकाला, सिनेमाला, गाण्याला जाणं बरं तरी आहे का ? " गिरिजाबाई गरजल्या. " लोक तरी तुम्हां आम्हांला काय म्हणतील ? तुम्ही आतां आमचे जांवई आहांत. इतर लोकांप्रमाणं फटिंगासारखं वागणं आमच्या—जहागीरदारांच्या जांवयांना शोभायचं नाहीं ! "

" तें तर आहेच ! " अण्णासाहेबांनीं गिरजाबाईच्या विधानाला पुष्टि दिली.

चारुशीलेला बरें वाटलें.

परंतु शन्तनूचा मात्र विलक्षण कोंडमारा झाला. त्याचा नाइलाज होण्याची पाळी आली. आपल्या मनासारखें होत नाहीं, आपलें कोणीच ऐकत नाहीं म्हणून त्याला सर्वांचाच, विशेषतः आपल्या पत्नीचा, चारुशीलेचा अतोनात राग आला. आपल्याबरोबर आपल्या पत्नीला नाटकाला यावेंसें वाटत नाहीं, आपला हिरमोड झाला तर तें तिला बरें वाटतें,—त्याचा तिला आनंद होतो ! त्यानें तिच्याकरितां आजच सुंदर लुगडें आणलें होतें तें ती नेसलीसुद्धां होती. सर्वांनीं नकार दिल्यामुळें शन्तनूची चांगलीच निराशा झाली होती; तरीहि त्यानें आणखी एकदां निकराचा प्रयत्न करण्याचें ठरवून म्हटलें,

" आजच्या नाटकाला मीं जायचं ठरविलं आहे. माझ्या कांहीं मित्रमंडळींना मी अगोदर कबूल करून ठेवलं आहे. माझे मित्र सहकुटुंब नाटकाला येणार आहेत. ते आमची वाट पहात रहातील, आम्ही गेलों नाहीं तर—"

पण शन्तनूला पुरतें कोणी बोलूंच दिलें नाहीं. चारूला आपण कांहीं झालें तरी पाठविणार नाहीं असें गिरिजाबाईनीं निक्षून सांगितलें.

" मित्राला कबूल करणें, त्यांना कबूल केलें म्हणून हट्ट धरून बसणें आणि आपली परिस्थिति न पहातां उगाच बाहेर जाण्याला तयार होणें, या सर्व गोष्टीच हास्यास्पद आहेत " असें अण्णासाहेब म्हणाले. त्यांनीं जांवयाला अगदींच मूर्खांत काढलें. त्याच्या पाठीवर थोपटीत ' अगदींच बच्चे आहांत ! तुमचं तुम्हांलाच कांहीं कळत नाहीं, आमचं जरा ऐकत चला, ' शन्तनूवर पोरकटपणाचा छाप अण्णासाहेबांनीं हंसत हंसत मारला. नंतर एखाद्या लहान मुलाची ' तुला मग आम्हीं आमच्याबरोबर बाजारांत नेऊन खाऊ घेऊन देऊं अं ! ' अशी जशी समजूत घालतात, तशीच शन्तनूची समजूत अण्णासाहेबांनीं ' आपण लवकरच सर्वजण मिळून

नाटकाला जाऊं. आज जातां येत नाहीं म्हणून वाईट वाटून घेण्याचं मुळींच कारण नाहीं ' असें सांगून समजूत घातली.

मूळ गरीब स्थितींतल्या सुशिक्षित, पदवीधर, विद्वान् शन्तनूला श्रीमंत अण्णासाहेब जहागीरदारांचा जांवई झाल्यावेळीं जो परमावधीचा आनंद झाला होता, त्याचा अनुभवानें कुठच्या कुठें लोप होत जाऊन आज तर स्वतःच्या परतंत्र परिस्थितीची पुरेपूर जाणीव होऊन त्याला स्वतःचाच संताप येऊं लागत होता ! त्याला आज धड स्वतःबद्दल विचारसुद्धां करतां येईना. अण्णासाहेबांनीं आपल्यापरी त्याची समजुत घातली, पण त्याची समजूत तशी पटणें शक्य तरी होतें का ?

चारुशीला आपल्या आईला बिलगून बसली होती.

अण्णासाहेबांनीं फिरून हातांतल्या पुस्तकांत लक्ष घातलें.

शान्तनू जागच्या जागींच दिङ्मूढ होऊन उभा होता !

इतक्यांत 'जेवायचं झालं आहे. पानं मांडलीं आहेत.' हें सांगायला आंतून त्रिवेणी आली. अण्णासाहेब खुर्चीवरून उठले. 'चलतां ना तुम्ही? म्हणून गिरिजाबाईंनाहि त्यांनीं उठायचा इशारा दिला. 'चल चारुबाई,' म्हणत त्याहि उठल्या. 'चला, चला, जांवईबुवा,' म्हणून अण्णासाहेब शन्तनूकडे हंसत पहात म्हणाले.

अण्णासाहेब, त्यांच्या पाठोपाठ गिरिजाबाई आणि आपल्या आईच्या मागें चारुशीला दिवाणखान्यांतून जेवायला म्हणून जेवणघराकडे निघालीं.

\+ + +

पण शन्तनू अजून जागच्या जागींच उभा होता. चारुशीलेनें जातां जातां मागें वळून पाहिलें. शन्तनू उभा असलेला पाहून तिनें विचारलें.

" उभं काय असं रहायचं ! जेवायला नाहीं का यायचं ? "

" तूं माझ्याबरोबर आज नाटकाला नाहीं का येणार ? "

" इश्श ! इतकं झाल्यावर मी कशी नाटकाला येणार ? "

" आणि इतकं झाल्यावर मी तरी आज कसा जेवणार ?"

चारुशीला जागच्या जागीं थबकली ! चमकली !

अण्णासाहेब गिरिजाबाईसह केव्हांच आंत निघून गेले होते.

चारुशीला थोडीशी शन्तनूच्या जवळ आली. तिचें काळीज धडधडूं लागलें.

" अण्णासाहेब काय म्हणाले—" ती म्हणाली.

" तें मी ऐकलं. "

" आई काय बोलली—-"

" तेंहि मला समजलं !"

" मग !" एवढेंच म्हणून चारुशीलेनें नुसताच प्रश्नार्थक चेहरा केला.

" ते तुझे आई-वडील आहेत. त्यांच्याजवळ तूं आहेस. तेव्हां तुला त्यांचं ऐकलंच पाहिजे—"

" मी तेंच म्हणतें—-"

" आणि मी तुझा कोणीच नाहीं. तेव्हां माझं ऐकायची तुला काय जरूरी ?"

चारुशीला कांहीं बोलली नाहीं, तिला कांहींच सुचेना .

" तूं चांगली आहेस, तुझे आईबाप चांगले आहेत, तेव्हां तुम्ही परस्परांवर प्रेम करतां, परस्परांचं ऐकतां. मी तुझा कोणी नव्हे, आणि असलों तरी मी वाईट आहे, म्हणून माझं तूं ऐकत नाहींस. माझ्यावर तुझं प्रेमहि नाहीं !"

" काय बोलायचं होतंय् हें !"

" अगदीं खरं तेंच बोलतों आहे !"

" काय खरं बोलायचं आहे!" चारुशीला उसळून म्हणाली, "आमच्या घरीं इकडे सुख लागत नाहीं ? कुणी प्रेमानं वागत नाहीं ?"

" सुख आहे तर !" शन्तनू कांहींशा बोचक शब्दांत बोलला, "तुझ्या घरीं मला चांगलंच सुखांत रहायला मिळतंय ! श्रीमंतांच्या घरचं गरिबाला मिळणारं सुख—-ताटाखालच्या मांजराचं जें सुख तेंच आमचं ! हाताखालच्या नोकराला उदार मनाचा धनी काय कमी सुखांत वागवतो ?—धनी आपल्या इच्छेप्रमाणं त्यांना वागवतो. नोकराच्या इच्छे-

प्रमाणं नव्हे नोकराला स्वतंत्र मन आहे,—बुद्धि, इच्छा आहे हें धनी लोकांना लक्षांत घेण्याची इच्छा नसते—ते घेतहि नाहींत—त्या वसल्या सुखसोयींची इथं माझ्याकरितां चांगली खैरात आहे—"

" कांहींच्या बाहींच बोलायचं तें ! नाटकाला जायची क्षुल्लक गोष्ट ती काय अन् जायला नको म्हटलं तर त्याचा राईचा एवढा पर्वत तो काय रचायचा झाला—"

चारुशीलेनें शन्तनूला खोडून काढण्याकरितां म्हटलें पण तेंच तिच्या पुढें आंगाशीं आलें. शन्तनू त्यावर पट्दिशीं बोलून गेला, " शितावरून भाताची परीक्षा होते. एखादी क्षुल्लक बाबसुद्धां माझ्या मनाप्रमाणं होत नाहीं तिथं दुसऱ्या गोष्टींचें नाव कशाला ! आजच कशाला, आपलं लग्न झाल्या दिवसापासूनच्या एकेक गोष्टीची मी आठवण करूं लागलों, तर त्या सर्वांची एकच गत या घरांत झालेली आहे. प्रथम हें माझ्या ध्यानांत आलं नाहीं. तुझ्या वडिलांच्या, आईच्या, तुझ्या मनाप्रमाणं मी वागावं, लहानमोठया गोष्टी तुमच्याच मी मानाव्यांत—आणि माझ्या कुठल्याच इच्छेला कधींच वाव मिळूं नये ! मला स्वतंत्र अस्तित्व आहे, माझ्या कांहीं स्वतंत्र भावना आहेत, याची कोणालाच—विशेषतः तुला मुळींच जाणीव असूं नये हें माझ्या आतां लक्ष्यांत येऊं लागलं आहे ! आज तर पुरीच खात्री पटली. शहाण्यानं श्रीमंताच्या सावलीला उभे रहाण्याची इच्छा करूं नये हेंच खरं. तो मूर्खपणा मीं केला आहे. माझ्या बुद्धीला—पराक्रमाला मीच पायबंद घातला आहे. माझा मीच कोंडमारा करून घेतला आहे ! तेव्हां त्याचीं कडु फळं माझीं मला आपखुषीनंच भोगलीं पाहिजेत, नव्हे का ?"

" काय म्हणायचं होतंय्—कां इतका संताप करून घेणं होतंय्, हेंच मला मुळीं कळत नाहीं !"

" नाहींच कळायचं तुला तें ! तुझ्यासारखी श्रीमंताची लाडावलेली लेक जोंपर्यंत आई-वडिलांच्या कुशींत बिलगून आहे—तिच्या क्षणाक्षणाच्या बदलत्या लहरीप्रमाणं—तिचे आई-वडिलांकडून चोज पुरविले जात आहेत तोंपर्यंत तुला पतीचं पटायचं नाहीं. तो काय म्हणतो तें कळायचं नाहीं—"

" आईच्या आणि अण्णासाहेबांच्या इच्छेविरुद्ध वागलं म्हणजे बरं वाटतं !--"

" तूं कन्येचं कर्तव्य चांगलं जाणतेस पण--"

" पण काय !--"

" पण पत्नीच्या कर्तव्याची जाणीव अजून तुला नाहीं. आणि माझी खात्री होऊन चुकली आहे, कीं या घरीं असेपर्यंत तुला त्याची मुळींच जाणीव व्हायची नाहीं. "

यावर चारुशीला कांहीं बोलणार होती कीं काय कोण जाणे ! पण मध्येंच ' अरे, अजून तिकडेच काय करतां ! पानं वाढलीं आहेत ना ! जेवायची तरी तुम्हांला शुद्ध आहे कीं नाहीं !' असें आंतून कुणी म्हटलें. चारुशीला भानावर आली. लगबगीनें जायला वळली. जातां जातां " अगोदर जेवायला चलावं बरं, मग—" शन्तनूला ती म्हणाली.

शान्तनू जागचा हालला नाहीं. " मी जेवणार नाहीं. तूं जेव जा. " एवेंढच म्हणाला. चारुशीला गेली. तिला गेल्याशिवाय गत्यंतरच नाहीं असं वाटलें. न गेलें तर आणखी अण्णासाहेब–आई काय म्हणतील ! ही भीति तिच्यापुढें दत्त म्हणून होती.

आपण इतकें बोललों तेव्हां चारुशीला विरघळेल, आपलें ऐकेल, 'मी नाटकाला येतें' म्हणेल असें शन्तनूला क्षणभर वाटलें. तो कांहींसा तंद्रींत होता. तोंच चारुशीला त्याच्या सर्व बोलण्यावर पाणी ओतून एकटीच जेवायला गेली. ती जातांना आपण काय म्हटलें हें देखील त्याला समजलें नाहीं, इतका तो बेफाम होता. पुन्हां कांहीं तरी तिला सांगण्याचें त्याच्या मनांत आलें, त्यानें समोर पाहिलें—तर चारुशीला कुठें आहे !—

चारुशीलेला आपलें मनोगत सांगायला त्याच तंद्रींत आवेशानें तसाच त्वरेनें तो निघाला. पण जवळच्याच झोपाळ्याचा कोपरा त्याच्या पायाला खणकन् लागला. अगदीं गुडघ्यालाच लागलें. विलक्षण कळ आली. त्यासरसा तो एकदम बराच मागें सरला. त्याबरोबर बाजूची मागली अण्णासाहेबांची आरामखुर्ची त्याला धक्का द्यायला, पुढच्यापुढें त्याला ढक-

ढून तोंडघशीं पाडायला निर्विकारपणें बसलीच होती. तिच्या पुढें आलेल्या पायठयाचा सपाटा त्याला बसला.

तो आतां भानावर आला. त्यानें चोहोंकडे पाहिलें. जहागीरदारांच्या वाड्यांतील जिवंत माणसेंच आपला उपहास, अपमान करीत असतात, इतकेंच नव्हे तर इथल्या निर्जीव वस्तूसुद्धां आपल्याला ठोकरतात—मनसोक्त वावरूं देत नाहींत, आपलें स्वातंत्र्य हिरावून घेत आहेत, असें त्याच्या प्रत्ययाला आलें. त्याचा स्वाभिमान एकदम जागृत झाला. तो अजून श्रीमंतीच्या पूर्ण पचनीं पडला नव्हता. त्याचे भरारी मारणारे महत्वाकांक्षेचे पंख निर्जीव झाले नव्हते. ‘ इतउत्तर आपण या वाड्यांत रहावयाचें नाहीं. स्वतंत्र संसार थाटावयाचा, अशा ऐदी, आरामी, निर्जीव श्रीमंतींत राहून तूप-पोळी खाण्यापेक्षां स्वतंत्र राहून निढळाच्या घामानें मिळविलेल्या मीठ-भाकरीचीच लज्जत और आहे, तो मार्ग आपण स्वीकारणार, आपण दूर राहूं, आईबापापासून आपल्या पत्नीला दूर करूं, तरच तिच्यापासून आप-ल्याला, आपल्यापासून तिला सुखाचा लाभ होईल; नाहीं तर नाहीं. आई-बापापासून ती वेगळी झाल्याशिवाय पत्नीचीं कर्तव्यें तिला कळावयाचीं नाहींत—आपल्या मनोभावना, आपलें आस्तित्व, आपला संसार याची जाणीव तिला व्हावयाची नाहीं. आणि लवकर आपण हें अमलांत आणूं तितकें तें फायदेशीर आहे. तवा तापला आहे. तिथवर पोळी भाजण्यांत शहाणपणा आहे. नाहींतर शक्य नाहीं. आजच आपलें व्यक्तित्व दाखवि-णार. आजच स्वतंत्र होणार. आतां विलंब नाहीं. ’

या तऱ्हेचे विचार शन्तनूच्या मस्तकांत थैमान घालूं लागले. तडका-फडकीं आपले विचार कृतींत आणतां येतात कीं नाहीं याबद्दल त्याचें मन थैमान घालूं लागलें. प्रथमच त्याची दृष्टि त्याला ठोकरा देणाऱ्या, अडचण करणाऱ्या निर्जीव अशा दिवाणखान्यांतल्या सामानसुमानाकडे गेली. त्याला उलथून पाडणाऱ्या अण्णासाहेबांच्या बड्या खुर्चीला त्यानें प्रथम लाथेनें उडविलें. मध्यभागीं विराजत असलेलें गोलमेज हातांनीं कोपऱ्यांत भिरकावलें. ज्या झोंपाळ्यानें त्याच्या गुडघ्याला धक्का देऊन कळ मस्तकांत पोंचविली होती त्याच्या कड्या काढून, उचलून त्याला

बाजूला भिरकावून दिलें. तो समोरच्या मोठ्या आरशावर जाऊन पडल्यामुळें खळकन् पिचून त्याचे तुकडे तुकडे होऊन तो जमीनदोस्त झाला. गोलमेजाभोंवतालच्या खुर्च्यांची कोपऱ्यांत भिरकावून तीच गत केली. त्या दंगलींत कोपऱ्यांतील छोट्या मेजांची दाणादाण उडाली. त्यांवरील फुलदाण्या कुठच्या कुठें उडून–फुटून गेल्या. त्यांत ठेवलेले पुष्पगुच्छ उधळले. साऱ्या दिवाणखानाभर फुलें आणि फुलांच्या पाकळ्याच पाकळ्या झाल्या.

दिवाणखान्यांतला धाडधाड आवाज, मोठ्या आरशाचे फुटून पडतांनाचें खळखळणें, आंत गेलेल्या मंडळीच्या कानांवर जातांच 'काय झालं ! काय पडलं ! कसला आवाज झाला ! कोण आहे ! काय गडबड आहे !' करीत आंतील मंडळी जेवण तसेंच अर्धे टाकून घाबरून गडबडीनें दिवाणखान्यांत आली. दिवाणखान्यांतील पैस झालेल्या जागेंत शन्तनू स्वैरपणें संचार करीत असल्याचें सर्वांनीं पाहिलें.

सर्व मंडळी तो देखावा—ती नासधूस पाहून स्तंभितच झाली. अण्णासाहेबांचें सर्वांग लटलट कांपत होतें. त्यांच्या तोंडून शब्द फुटणें शक्य नव्हतें. गिरिजाबाई संतापानें लालबुंद झाल्या होत्या. चारुशीला भयचकित नजरेनें समोरचा प्रकार पहात होती. त्रिवेणी गंभीर, विचारी मुद्रेनें दिवाणखान्याकडे व शन्तनूच्या हालचालीकडे शोधक दृष्टीनें पहात दारांतच उभी होती.

क्षणभर कुणालाच बोलावयाचें सुचेना. काय प्रकार आहे हें कळेना. शन्तनू बेगुमानपणें दिवाणखान्यांतून वावरत होता.

अखेर न राहवून गिरिजाबाईच कडाडल्या, "जांवईबुवा ! आपलेच का हे प्रताप ! झालं आहे काय आज आपल्याला ! काय केलंत हें ! कां केलंत ! असं माथं फिरल्यासारखे नाचतां आहांत काय !"

"मी प्रतापी आहें. माझी जाणीव मला झाली आहे." शन्तनू गिरिजाबाईसमोर येऊन उभा राहिला आणि विकट हास्य करीत निर्भयपणानें त्यांनीं विचारलेल्या प्रत्येक प्रश्नाचीं उत्तरें खडया आवाजांत देऊं लागला, "हें कृत्य मी मुद्दाम केलं आहे. आपल्याला हें कळावं, आपण मला त्याबद्दल विचारावं आणि मला आपल्याला नीट समजावून सांगतां

यावं म्हणून हें असं करून ठेवलं आहे ! माझं माथं अजून कांहीं फिरलेलं नाहीं, पण यापुढं मात्र या घरांत खास माथं फिरण्याचा संभव आहे. आणि मी नाचतों आहें असं आपल्याला वाटतं, पण मी नाचत नसून मी–म्हणेन त्याप्रमाणं, म्हणेन त्या ठिकाणीं मला हिंडतां फिरतां येत आहे कीं नाहीं, याचा हा प्रयोग करून पाहिला आहे."

"शर्थ झाली आतां या आचरटपणापुढं ! अशानं..."

"या वाडयांत रहाणं किती कठीण होईल, याची कांहींतरी कल्पना आहे कां आपल्याला ! "

"तेंच मी सांगणार आहें." अण्णासाहेब आणि गिरिजाबाईनीं मिळून काढलेल्या उद्गारांना शन्तनूनें उत्तरादाखल सांगितलें, "मला यापुढं रहायचंच नाहीं मुळीं इथं ! "

"म्हणजे ! या वाडयांत रहाणार नाहीं ! " चारुशीला त्याच्याकडे पहात अधीरतेनें पुटपुटली.

"होय ! मी या वाडयांत राहणार नाहीं. बाहेर जाणार. स्वतंत्र राहणार. "

"अरे, पण वाडा सोडून जाणार कां ! इथंच कां रहाणार नाहीं !—" अण्णासाहेब संतापून विचारते झाले.

"मीहि या वाडयांत रहाणार नाहीं, आणि तुमच्या मुलीलाहि माझ्याबरोबर आलंच पाहिजे ! " शन्तनूनें बेधडक सरबत्ती सुरू केली.

"काय ! आपण जाणार ! आणि मलाहि बरोबर नेणार !–आई–अण्णासाहेब—" चारुशीलेला गरगर फिरल्यासारखेंच होऊं लागलें.

"अरे–अहो, पण असं करायचं कारण काय तुम्हांला !—"

"याचं कारण आपण. याचं कारण माझी बायको !—"

"म्हणजे !—"

"म्हणजे, तुम्ही आपल्या लेकीला लाडोबा करून ठेवली आहे. ती फार लाडावली आहे. तिला कन्येचं कर्तव्य कळतं. पत्नीधर्म समजत नाहीं. आमच्या दोघांच्या भावी आयुष्यांतील सुखाकरितां, पत्नीधर्म काय असतो हें मला तिला समजावून दिलंच पाहिजे. म्हणून मी इथून जाणार. अन्

माझ्या बायकोलाहि घेऊन जाणार आहें." असें म्हणत शन्तनू त्या आवेशांत चारुशीलेचा हात धरायला पुढें झाला. ती चटकन् आईच्या आश्रयाला पळाली आणि म्हणाली, "मी अण्णासाहेबांना आणि आईला सोडून या वाड्यांतून साफ कुठं येणार नाहीं!"

"माझ्या जिवांत जीव असेपर्यंत मी माझ्या बाळीला कध्धींसुद्धां माझ्यापासून दूर लोटणार नाहीं." चारुशीलेला कवटाळीत गिरिजाबाई म्हणाल्या.

"जांवई म्हणजे कृष्णसर्प म्हणतात, तें सार्थच करून दाखवायला लागलांत कीं तुम्ही!" अण्णासाहेबांना शन्तनूचें वर्तन असह्य होऊन, त्वेषानें ते म्हणाले, "तुम्हांला प्रेमानं जवळ घेतलं, मुलाप्रमाणं वागविलं, आपल्या पदरीं एकुलता एक पोटचा गोळा टाकला आणि शेवटीं—"

"असे आपल्या जातीवर गेलांत." गिरिजाबाई चवताळून म्हणाल्या.

"आमच्यावर अशी एकाएकीं आग पाखडायला असा आमच्या हातून तुमचा अपराध तरी काय झाला आहे!"

"तुमचा अपराध आहे असं मी म्हटलं नाहीं."

"मग असं आम्हांला दुःख देण्यांत तुमचा कोणता पुरुषार्थ आहे!—"

"मी मुळींच कुणाला दुःख देत नाहीं. तुम्हीच स्वतःला दुःखी करून घेतां आहांत त्याला मी काय करूं!—"

"चारु आमच्यापासून दूर गेल्यावर आम्ही सुखी राहूं असं तुम्हांला वाटतं तरी कसं!—"

"आणि ती माझ्याबरोबर आली नाहीं तर मी जन्माचा दुःखी होईन हें आपल्याहि लक्ष्यांत येत नाहीं कसं!—"

"तें कांहीं नाहीं; आपण याच वाड्यांत राहिलं पाहिजे. माझी तुम्हांला आज्ञा आहे!"

"मी कांहीं कुणाचा गुलाम नाहीं वाटेल ती आज्ञा ऐकायला!—"

"मग जा तर खुश्शाल जिकडे जायचं असेल तिकडे. एखाद्याला भिकेचे डोहाळे लागले तर त्याला दुसऱ्यांनीं काय करायचं!—"

" पण मी भिक्षा काय म्हणून मागेन ? मी चांगला शिकलेला आहें. माझ्या मनगटांत मिळविण्याची ताकद आहे. लाथ मारीन तिथं पाणी काढीन अशी माझ्यांत धमक आहे. मला काय म्हणून भिकेचे डोहाळे लागतील ?--"

" जा तर मग खुश्शाल !--"

" मी तर जाणारच ! पण जातांना बायकोलाहि घेऊन जाणार आहे !!'

" साफ पाठविणार नाहीं पोरीला ! "

" असं तुम्हांला आतां म्हणण्याचा अधिकारच नाहीं. धर्मानं, कायद्यानं अन् अधिकारानं ती माझी अर्धांगी आहे. आतां पति या नात्यानं माझी तिच्यावर सत्ता आहे, तुमची नाहीं. तिचं हें धर्माचं माहेर आहे. सत्तेचं सासर मी जिथं असेन--राहीन तें ! "

" खरं आहे तुमचं म्हणणं. " अण्णासाहेब लाचार होऊन बोलूं लागले, " पण जांवईबुवा, आमचं आहे हें तरी तुमचंच आहे ना सारं. मला मुलगा नाहीं. मुलगी ही एकच ! आमचीं इतकीं मुलं गेलीं. आमचा जीव हळवा झाला आहे. उभ्या जगांत हा एकच काय तो आमच्या जीवनाचा--सुखाचा--विसांव्याचा आम्हाला आधार आहे. आमच्या डोळ्याआड आमची चारु क्षणभर झाली तर आम्हां दोघांचा जीव कासावीस होतो. तिला जर आपण घेऊन गेलांत तर आम्ही फार दिवस जिवंत तरी राहूं कीं नाहीं कोण जाणे ! आम्ही चुकलों असलों तर आम्ही तुमची सपशेल माफी मागतों. चारु चुकली असली तर तिला क्षमा मागायला लावतों. पण कृपा करा, आमच्यापासून तिला दूर करूं नका. "

" पण अण्णासाहेब, आपण असं कां समजतां ! त्यापेक्षां असं कां समजत नाहीं, तुमची लेक कांहीं काळ तुमच्यापासून दूर झाली, तुमचा तिचा जरा विरह झाला तर पुन्हा तुम्हांला विरहानंतर भेटण्यांत आणखी प्रेमाला बहर येईल त्याचा आस्वाद घ्यावा म्हणून. तुम्ही कांहीं अपराध केला नाहीं आणि तुमच्या लेकीनंहि कांहीं चूक केली नाहीं, पण तिचा पत्नीधर्म तिला कळायला नको का कधींच ! मीं तिला तो शिकवायला नको का ?--"

"पण नको कोण म्हणतंय तुम्हांला?" गिरिजाबाई फणफणत म्हणाल्या, "पत्नीधर्म शिकवायला चारूला आमच्यापासून दूर न्यायला कशाला हवं? इथंच ठेवून, तुम्ही इथंच राहून नाहीं का शिकवतां येणार मी म्हणतें?—"

"अशक्य आहे!" शन्तनू निश्चयानें उत्तरला. "आणि मी जो तिला घेऊन जात आहें तो काय—"

"छळायला—त्रास द्यायला—गांजायला! ती आमच्याजवळ सुखांत वाढली आहे, तिला दारिद्र्याचे चटके द्यायला—हें तर उघडच दिसतंय! गिरिजाबाईंनीं आपलें ठाम मत दिलें. "हें तुम्हींच कशाला सांगायला हवं!"

"हीच मुळीं तुमची चूक आहे! जी वस्तु आपल्याला हवी असते, ज्या वस्तूपासून अपेक्षित सुखाची आशा असते, तिला कोणता शहाणा त्रास देईल!—छळील-गांजील! मी उपाशीं राहीन,—पण माझ्या पत्नीला मी पोटभर जेऊं घालीन. मी वेळ आली तर फाटकीं वस्त्रं परिधान करीन पण तिला नटवीन. तिची कसलीहि हौस, इच्छा मी पुरवीन. मी स्वतःचे हाल करीन, पण दारिद्र्याची यत्किंचितहि झळ मी माझ्या आवडत्या अर्धांगीला लागूं देणार नाहीं, ही खात्री ठेवा."

"इतकं करणार, पण पोरीला घेऊन जाणारच!—"

"होय!"

"तुमची मर्जी!"

"तुमची मर्जी काय! इकडून चारूला दूर करायचा निश्चय झाला वाटतं!"

"इलाज नाहीं त्याला!" अण्णासाहेब स्वतः मनःसंयमन करीत गिरिजाबाईंची समजूत घालूं लागले. "असं पहा, केव्हांहि झाल तरी कन्या हें अन्याचं धन! त्यांची मर्जी—ठेवतील, नसली मर्जी घेऊन जातील. जाताहेत, जाऊं देत. कुठंहि असले तरी सुखांत, आनंदांत—असूं देत म्हणजे झालं. आम्ही आणि आमच्याबरोबर आमचं नशीब! जांवईबुवा, जा आपल्या अर्धांगीला घेऊन!" अण्णासाहेब उपरण्यानें डोळे पुशीत

घोगऱ्या आवाजांत म्हणाले, " जाणार तर जा बापडे. पण आज, उद्यां— सोईसवडीनं गेलांत तर नाहीं का चालणार !—"

" हो, एवढं तरी आम्हां म्हाताऱ्यांचं ऐकावं." गिरिजाबाई अजीजीनें विनंति करूं लागल्या. एवढे श्रीमंत, एवढे जहागीरदार—पण एका क्षणांत शन्तनूनें त्यांना आपल्या पायांशीं आणलें. त्यांच्या स्थितीबद्दल त्याला वाईटहि वाटलें. पण वाईट वाटून विरघळून जाण्याची ती वेळ नव्हती. एकदां जें पाऊल टाकलें त्याच चालीनें अखेरपर्यंत चाललें तरच तें हित-परिणामी होत असतें हें शन्तनू पूर्ण जाणून होता.

शन्तनूनें त्या मंडळींचें ऐकलें नाहीं. आपण सहकुटुंब उद्यां सकाळीं हा वाडा सोडणार म्हणून त्यानें जाहीर केलें.

चारुशीलेची अवस्था अगदीं शोचनीय झाली होती. तिला आईबापाबद्दल —त्यांच्यापासून दूर जावें लागणार याबद्दल जितकें वाईट वाटत होतें त्यापेक्षां निष्ठुर, दुष्ट, आपल्या आईबापाला दुःखसागरांत लोटणारा आपला पति—निर्दय असा वाटून त्याच्याबद्दल विलक्षण संताप आला होता.

तिला एकटीला त्रास होईल, करमणार नाहीं, म्हणून शन्तनूला अण्णा-साहेबांनीं हात जोडून विनंति केली, " पोरीच्या हातून नवखेपणामुळं हरघडी चुका होतील, आपण तिच्यावर रागवाल, तिला सुधरायला, धीर द्यायला—आणि तिला व आपल्याला संभाळून न्यायला आम्हीं जवळ नसलों तरी आमच्याकरितां आमच्या त्रिवेणीला आम्हीं बरोबर देतों. तिला तेवढी कृपा करून बरोबर न्यावी. "

शन्तनूनें तें आनंदानें मान्य केलें.

त्रिवेणीच्या मनांत त्यांच्याबरोबर जावें असें नव्हतेंच. पण त्यावेळची एकंदर तेथली परिस्थितीच अशी होती कीं, तिला मी जात नाहीं असें म्हणणेंच अशक्य होतें. आपल्याबरोबर आपल्याला धाकट्या बहिणीप्रमाणें वागविणारी त्रिवेणी येत आहे एवढीच गोष्ट, दगडापेक्षां वीट मऊ अशी दुःखांत सुख मानायला चारुशीलेला आधारादाखल होती.

करारी बाण्यानें आणि कृतनिश्चयानें, तात्पुरतीं अनेकांचीं अंतःकरणें दुखवून शन्तनू दुसऱ्याच दिवशीं जहागीरदार अण्णासाहेबांच्या—श्रीमंत

श्वशुरांच्या वाड्याबाहेर आपल्या अर्धांगीसह निघाला. मनोधैर्यानें, या वेळीं तरी परिस्थितीवर आपण विजय मिळविला, हा आनंद त्याच्या तोंडावर स्पष्ट दिसत असल्यास आश्चर्य कसलें?

श्रीमंतीच्या घनदाट सावलीखालीं गरीबाच्या संसाराचें रोपटें आपल्या मनासारखे फोंफावणार नाहीं, त्याकरितां तें त्या सावलींतून दूर काढलेंच पाहिजे, या कृतसंकल्पानें शन्तनूनें आपला संसार दुसऱ्याच गांवीं थाटला. त्याला तब्बल एक वर्षावर दिनावधी लोटला. या अवधींत अहोरात्र काबाडकष्ट करून, हाडांचीं काडें करून पराक्रमाच्या व बुद्धीच्या जोरावर त्यानें आपलें बस्तान चांगलेंच बसविलें आहे. त्यानें आपला दिवाणखाना तर असा सजविला आहे, त्यांत असें सुंदर, उंची भपकेदार फर्निचर भरगच्च भरलें आहे कीं, त्यांत वावरणाऱ्या चारुशीलेला आपण ज्या ठिकाणीं लहानाच्या मोठ्या झालों, ज्यांत वावरलों, त्या वडिलांच्या वाड्यांतील दिवाणखान्यांत आपण अजूनहि आहोंत असेंच वाटावें! जिवाचें रान करून शन्तनूनें चारुशीलेकरितां प्रत्येक गोष्ट याप्रमाणें घडविली होती. अहोरात्र तो चारुशीलेच्या मनाच्या प्रसन्नतेकरितां खपत होता—झटत होता!

त्रिवेणी आपल्याकडे आलेलें कार्य चोख बजावीत होती. ती म्हणजे चारुशीला व शन्तनू यांच्यामधला दुवा! तिनें चारुशीलेकरितां अमुक करा म्हणून शन्तनूला सांगावयाचें आणि ती चारुशीलेची मनीषा म्हणून शन्तनूनें तें कसोशीनें करावयाचें. चारुशीलेनें असें असें आपल्याशीं वागावें म्हणजे बरें, अशी शन्तनूनें त्रिवेणीजवळ इच्छा प्रकट करावयाची आणि तिनें चारुशीलेच्या मनांत असो वा नसो, बळजबरीनें तिच्याकडून करून घ्यावयाचें असें अजून चाललें होतें. चारुशीला आपल्या घरीं एकाद्या यंत्रासारखी वागत होती.

इतक्या दिवसांत कांहीं केल्या चारुशीला शन्तनूला हवी तशी मनानें मोकळी मात्र झाली नाहीं. त्रिवेणीच्या आज्ञेप्रमाणें ती आई वडिलांना जरी आठवड्याच्या आठवड्याला 'आमचें येथें उत्तम चाललें आहे. आम्ही अत्यंत आनंदांत आणि सुखांत आहोंत. माझ्याबद्दल मुळींच काळजी करूं नये—' अशीं पत्रें लिहित होती. तरी तशी वस्तुस्थिति मात्र येथें अजून

मुळींच नव्हती. शन्तनूबद्दलची एकदां जी अढी तिच्या मनांत बसली होती, ती त्रिवेणीनें व शन्तनूनें आटोकाट प्रयत्न चालवूनहि अजून कायमच होती. ती काम करी, सर्व कांहीं करी; पण आनंदी दिसावयाची नाहीं—शन्तनूपुढें यायची नाहीं. आपण होऊन कधीं त्याच्याशीं बोलायची नाहीं. त्याला नेहमीं चुकवायची ! यामुळें एखादे वेळीं त्रासून तो त्रिवेणीजवळ म्हणे कीं तिला असें वागायचें असेल, तिला आपल्या आई–वडिलांच्याशिवाय करमत नसेल तर तिला जाऊं दे माहेरीं. पण आतां त्यालाहि तिची तयारी नसे. त्यांच्या धरीं असा दैनिक क्रम चालू होता.

आज सकाळींच शन्तनू नेहमींसारखा कामाला गेला होता. त्रिवेणी चारुशीलेला नव्या 'सत्यकथा' अंकांतील एक भली मोठी कादंबरीवजा आलेली गोष्ट सहज वाचून दाखवीत होती. तिलाहि ऐकण्याची लहर लागली होती.

त्रिवेणी गोष्ट वाचीत होती—

" नलिनी सुंदर होती. सुस्वभावी होती. पण कसल्या तरी गैरसमजानें ती आपल्या नवऱ्याशीं प्रेमानें वागत नव्हती. नलिनीचे प्रेमाचा लाभ मिळावा म्हणून तिचा नवरा कितीतरी प्रयत्न करी. नाटकाला, सिनेमाला तो नेई. नेहमीं किती तरी लुगडीं, पोलकीं, दागदागिने तो तिच्याकरितां आणीत असे. नलिनीकरतां अमूक केलें तर ती खास खुलेल आणि आपल्यावर ती प्रसन्न होईल असें त्याला कितीतरी वाटे, आणि तो तिच्या प्रसन्नतेकरितां झटे. पण नलिनीनें सर्व श्रम फुकट घालवावे. त्यामुळें अलीकडे तो निराश होऊं लागला. नलिनीचें प्रेम या जन्मांत मिळणें कांहीं केल्या आपल्याला शक्य नाहीं अशी त्याची खात्री पटूं लागली. तें सहन न होऊन तो त्या झुरणीनें अखेर आजारी पडला. पण त्याची घरीं शुश्रुषा कोण करणार ! नलिनी तर त्याच्याकडे ढुंकूनहि पहात नसे. म्हणून त्याला घरीं रहाण्यापेक्षां एखाद्या दवाखान्यांत पडण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. तो त्याप्रमाणें खराच एका दवाखान्यांत जाऊन पडला. पुढें कांहीं दिवसांनीं—"

कांहीं विचित्र कल्पना येऊन त्रिवेणीचें वाचन थांबवून चारुशीलेनें मध्येंच विचारलें,

" काय झालं नलिनीच्या नवऱ्याचं !—कांहीं बरंवाईट झालं कीं काय !—"

" तसं कांहीं झालं नाहीं, पण—"

" पण काय !—"

" त्या दवाखान्यांत एका परिचारिकेनं त्याची मनोभावानं शुश्रूषा केली. दवाखान्यांतल्या औषधापेक्षां त्या परिचारिकेच्या शुश्रषेनं तो हळूहळू बरा होऊं लागला. त्याला घरीं ज्या सुखाची, प्रेमळ हाताची, भाषेची, वागविण्याची जरूरी होती त्याचा लाभ त्या परिचारिकेकडून मिळाल्यानं, त्याला घरांतल्यापेक्षां तिथंच बरं वाटूं लागलं."

" आणखी !—"

" आणखी काय ! हळूहळू दोघांचा परिचय झाला. ती जगांत प्रेमहीन आहे असं त्याला कळलं. हा प्रेमाचा भुकेला आहे हें तिनं ओळखलं. त्यामुळं दोघांचीं अंतःकरणं एकमेकांकडे दर क्षणीं जास्तीच ओढ घेऊं लागलीं !—"

" अगबाई, खरंच ! आणि हें नलिनीला मुळींच कळलं नाहीं !"

" तिनं लक्ष्यच दिलं नाहीं ना !—"

" पण तिनं लक्ष्य दिलं असतं तर ती धांवत गेली असती, आपलं अंतःकरण खुलं केलं असतं, व त्यांच्या प्रेमाची वाढच होऊं दिली नसती. नलिनीनं आपल्या हक्काचं प्रेम परत मिळविलं असतं, नाहीं !"

" खरंच आहे तें !"

" त्या परिचारिकेच्या प्रेमांत गुरफटत असतांना त्याला नलिनीची आठवण मुळींच झाली नसेल नाहीं ! परिचारिकेनंसुद्धां कसली चौकशी केली नसेल—"

" पण त्याचा उपयोगच काय होता !--नलिनी प्रथमपासूनच वागण्यांत चुकली होती ना !—"

" बरं पण त्या गोष्टीचा शेवट काय आहे !"

" दुसरा काय असणार ! नलिनीचा पति आणि परिचारिका विवाहित होऊन राहूं लागलीं, आणि—"

" आणि नलिनीचा शेवट—"

" तिला नंतर कळलं. मग तिला पश्चात्ताप झाला. पण घाव गेला होता. पुढचं आयुष्य तिला दुःखांतच घालवावं लागलं—"

गोष्टीचा शेवट ऐकून चारुशीलेचें सर्वांग थरारलें. तिच्या डोळ्यापुढें एकदम अंधेरी आल्यासारखें झालें. क्षणभर तिला वाटलें, आपल्या घरची हकीकत कुणाला तरी कळली असावी, आणि त्यावरूनच ही गोष्ट लिहिली असावी. निदान आपल्या पतीनें कुणाकडून तरी मुद्दाम लिहविली असावी तिनें त्रिवेणीला विचारलें, " ही गोष्ट खरी असेल का ग ? "

" 'सत्यकथा' मासिकांत ती आली आहे, तेव्हां ती खरी असलीच पाहिजे असं मला वाटतं. तुला काय वाटतं ?—"

" मी सांगतें—" चारुशीला रागानें त्रिवेणीकडे पहात म्हणाली, " आमच्याच घरांतला चावटपणा कुणीतरी उपद्यापी लेखकानं चव्हाट्यावर मांडला आहे—"

" म्हणजे ?—"

" म्हणजे ?—त्या गोष्टींतली नलिनी मी, तिचे पति म्हणजे स्वारी अन् परिचारिका—"

" परिचारिका कोण ?—"

" मी स्वारीशीं तुसडेपणानं वागतें. माझ्याबद्दल स्वारी निराश झाली आहे. तूं त्यांच्या पुढं पुढं करतेस. त्यांची मनधरणी करतेस. स्वारीला आनंदांत ठेवण्याकरितां झटतेस. अत्तां माझ्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. तिकडचं मन ताब्यांत घेणारी परिचारिका—"

" मलाच समजतेस कीं काय ? " त्रिवेणीनें चमकून तिच्याकडे पहात विचारलें.

" हो—अगदीं तस्संच !" त्रासून, मागला पुढला विचार न करतां चारुशीला उद्गारली, " बरीच आहेस कीं ग त्रिवेणी ! माझं चांगलं करण्याकरितां तूं माझ्याबरोबर आलीस, आणि शेवटीं हें चांगलं केलंस ना ?—तोंडावर एक बोलणं आणि कृति ही अशी का तुझी ?—मी जन्माची दुःखी

व्हावं आणि तुम्हीं दोघांनीं प्रेमाचं राज्य करावं, ही तुझी इच्छा चांगलीच आहे कीं !"

त्रिवेणी हतबुद्ध होऊन चारुशीलेकडे टकमक पहातच राहिली. तिच्यावर तो तिचा अनपेक्षितच मारा होता ! आणखी ती काय काय बोलली असती आणि त्रिवेणीला काय काय ऐकून घ्यावें लागलें असतें कोण जाणे. ती आपल्या तोंडाचा पट्टा सुरू करणार इतक्यांत टपालाच्या शिपायानें बाहेरून एक पत्र टाकलें. पत्र त्रिवेणीच्या नांवचें होतें. उचललें चारुशीलेनें व आपलें नाहीं असें पाहून त्रिवेणीच्या हातीं दिलें. तिनें लगेच तें फोडलें. पत्र अण्णासाहेब जहागीरदारांचें होतें. अण्णासाहेब सहकुटुंब तीर्थयात्रा करायला निघाले असून ते आजच–थोड्या वेळानें मुक्कामाला येणार आहेत, असें त्या पत्रांत होतें. 'पत्र अण्णासाहेबांचें आहे तुलाच आहे तूं वाच' म्हणून पुन्हां त्रिवेणीनें चारुशीलेच्याच हातांत दिलें. वडिलांचें पत्र आहे म्हणतांच क्षणापूर्वीची चारुशीला एकदम बदलली. तिनें भर्रकन् पत्र हातीं घेतलें; वाचण्याकरितां ती तेथें थांबलीसुद्धां नाहीं. चटकन् पलीकडच्या दालनांत चांगल्या उजेडांत वाचायला जवळ जवळ धांवतच गेली. स्थिर दृष्टीनें त्रिवेणी तिच्याकडे पहात राहिली.

याच वेळीं शन्तनु बाहेरून आला, तो त्यानें तेथून चारुशीलेला जातांना पाहिलें. त्याला वाईट वाटलें. टोपी खुंटीवर ठेवून कपडे काढीत आणि हातांतील बॅग बाजूच्या मेजावर ठेवीत त्रिवेणीला म्हणाला, " मी आलेला पाहून चारु मुद्दाम मला टाळण्याकरितां गेली ना !––"

" नाहीं, खचीत नाहीं. निदान या वेळीं तरी आपण कल्पना करतां तसा प्रकार मुळींच नाहीं ! " त्रिवेणीनें चारुशीलेबद्दल निर्वाळा दिला.

शन्तनु बाजूच्या खुर्चीवर हुश्श करीत बसला. कष्टी मनानें त्यानें त्रिवेणीला विचारलें, " खरंच, चारु कधींच नीट वागणार नाहीं का! ––"

" खचीत वागेल. "

" केव्हां !––"

" लवकरच !––"

" कशावरून !––"

" मला तसं निश्चयानं वाटतंय् !—"

" मला नाहीं खरं वाटत ! "

" कां !—"

" मला कसं सुखी करावं हें तिला कळत नाहीं, आणि तिच्या बाबतींत माझ्याकडूनहि नेहमीं बऱ्याच चुका होत असतात—"

" त्या कशा ! "

" हें माझं मलासुद्धां कळत नव्हतं, पण—" शन्तनूनें बोलत बोलत आपली बॅग जवळ घेऊन तींतून ' सत्यकथे 'चा नवा अंक काढून तिच्या-पुढें करीत म्हटलें, " या अंकांत एक सत्यकथा आली आहे. ती मीं वाचली. त्यांत हुबेहुब आमच्याच घरांतल्या चालू संसाराचं प्रतिबिंब उमटलं आहे असं मला दिसून आलं. त्यांत माझं स्वभावरेखन साग्र आणि स्पष्ट रेखाटलं आहे. त्यांत माझं बरोबर काय आणि मी चुकलों आहें काय याचं शब्दचित्र अगदीं यथातथ्य आहे. त्यावरूनच माझ्या चारुशीं वाग-तांना होत असलेल्या चुका मला कळून आल्या. हें तूं वाच म्हणजे माझ्या-प्रमाणं तुझीहि खात्री पटेल."

" आम्हीं दोघींनींहि तो अंक आतांच वाचला आहे. " जवळचा अंक त्याला दाखवीत त्रिवेणी म्हणाली.

" होय ! ती गोष्ट तुम्हीं दोघींनीं वाचली ? खरंच ! मग तुम्हांला काय वाटलं ? चारूला ती गोष्ट कशी काय वाटली !—तिच्या लक्ष्यांत-आलं का ?—"

" तिला ती अगदींच टाकाऊ वाटली. "

" अरेरे ! त्या गोष्टींत माझ्यातल्या दाखविलेल्या चुका मी सुधारण्याचा प्रयत्न करीन, अन् चारूचा मी कधीं तरी आवडता होईन ही नवी आशा मी बाळगली आहे— "

" ती मी या घरांतून निघून जातांच पूर्ण होईल. " त्रिवेणी खालीं पहात म्हणाली.

" काय ! तूं जाणार ! कां !–चारु, तुला कशी जाऊं देईल ! "

" ती जाऊं देईल. आज तिचं मन मला कळलं आहे. तुम्हां दोघांत मी आहे, माझी अडचण तुम्हां दोघांचा एकोपा होण्यांत आहे, असं मला कळून चुकलं आहे. तेव्हां तुमच्या दोघांच्या सुखाकरितां मला होईल तितक्या लवकर इथून जायला नको का ! "

" नको ! तुम्ही येथून गेल्यावर माझी घडगत नाहीं. तुम्ही असाल तरच माझ्यांतल्या चुका मला सुधारतां येतील. आजपर्यंतसुद्धां मी जर कांहीं सुधारलों असेन तर तुमच्याच दिव्य सहवासानं. आतांपर्यंत वागलों, जो कांहीं भावी आशेच्या तरंगावर जगलों तो तुमच्यामुळं; त्या तुम्हीच निघून गेल्यावर माझ्या वांट्याला कायमचीच निराशा येईल. तुम्ही गेलांत आणि चारु कधींच बदलली नाहीं---आणि मग ती कधींच बदलायचीहि नाहीं---तर मी जन्माचा दुःखीच राहीन. निदान माझ्या-करितां तरी मी तुम्हांला इथून कधींच जाऊं देणार नाहीं. " शन्तनू निक्षून म्हणाला.

" पण चारूनं माझ्याबद्दल जर भलतंच तर्क्ट---" पण पुढचें वाक्य त्रिवेणीच्या तोंडांतच राहिलें. कारण चारुशीला बाहेरून आंत आली. ती आली आणि शन्तनु चूळ भरायला म्हणून तेथून दुसरीकडे गेला.

" त्रिवेणी, अण्णासाहेब आईला घेऊन आज कदाचित् थोड्याच वेळांत इथं येतील. " चारुशीला सांगत आली. आई-अण्णासाहेब येणार या कल्पनेनं तिचा आनंद गगनांत मावेनासा झाला. अशी अचानक त्यांना यायची कशी बुद्धि झाली ! "

" मीं वाचलं आहे तें पत्र ! " त्रिवेणी उत्तरली. " चांगलंच झालं हें. तुझा संसार कसा चालला आहे हें पहायलाच येताहेत ते वाटतं ! "

" अग, ते पुढं प्रवासाला जाणार आहेत. मलाहि पण बरोबर घेऊन जाणार आहेत. इथं ते एखादा दिवससुद्धां रहाणार नाहींत. "

त्रिवेणी कांहींच बोलली नाहीं.

" स्वारीला सांग पत्रांतला मजकूर म्हणजे---"

" मी ! मी कशाला सांगूं ! शन्तनुराव आलेच आहेत. तूंच त्यांना सांग---"

" मी नाहीं सांगणार, तूंच सांग. "

" मी या घरीं नाहींच असं समज. मी कशाला तुमच्यांत उगीच पडूं !--"

" हें ग काय असं, त्रिवेणी--"

तितक्यांत शन्तनु आंत आला. चारुशीला त्रिवेणीच्या खांद्याला हालवीत हलकेच म्हणाली. " सांग ना--"

" शन्तनुराव, " त्रिवेणी म्हणाली, " चारु काय सांगते आहे पहा आपल्याला--"

यामुळें चारुशीलेला चांगलीच पंचाईत पडली, तिला सांग म्हटलें तर ती उलट अशी तिच्याच गळ्यांत पडली.

चारु आपल्याबरोबर आज आपण होऊन बोलायला सरसावली हें पाहून शन्तनुला अचंबाच वाटला. तो तिच्याकडे पहात, ती काय सांगते म्हणून ' आ ' वासूनच राहिला. चारुशीलेला आतां बोलल्याखेरीज गत्यंतरच नव्हतें.

तिनेंच सांगितलें, " अण्णासाहेबांचं पत्र आलं आहे. ते आईसुद्धां तीर्थयात्रा करायला निघाले आहेत. आज उभाउभी आपल्या घरीं विश्रान्ती-करतां येताहेत. "

" असं का ! आपल्याकडे रहाणार नाहींत का !-"

" त्यांना बरं वाटलं, तसा आग्रहच केला तर रहातीलहि. "

" मग आग्रह करायला कोण नको म्हणतो ! मला वाटतं ते आल्या-वर मी घरीं राहिलों नाहीं तर त्यांना इथं बरं न वाटायला तरी काय हरकत आहे ! त्यांनाहि बरं वाटेल, आणि सगळ्यांनाच बरं वाटेल—"

" कां ! माझ्या आई-वडिलांचं तोंड पहायला बरं वाटत नाहीं वाटतं—"

" तसं नव्हे. माझंच तोंड पहायला त्यांना बरं वाटत नसावं, म्हणून त्यांनीं उभाउभीच यायचं ठरविलेलं दिसतंय्. मग तुम्हां सर्वांच्यामध्यें आनंदाचा विरस व्हायला मी कशाला अडचण उगीच ! चारआठ दिवस तुम्हीं इथं आनंदांत घालवा. मी तेवढा वेळ बाहेरच्या बाहेर काढीन."

"त्यापेक्षां मीच त्यांच्या बरोबर जाईन. त्यांना कशाला ठेवून घ्यायचं? आम्हांला मग कुठंहि आनंदांत रहातां येणार नाहीं कीं काय ? मी त्यांच्याबरोबर जाईन." चारुशीला कपाळावर आंठ्या चढवून फणफणली. "मी कुणाला नको आहे, माझे आई-वडील कुणाला नको आहेत—मग मला तरी काय करायचं आहे कुणाशीं ?—"

"म्हणूनच मी म्हणतों, तुम्ही खुशाल आनंदांत रहा. मी बाहेर जाईन !"

"आणि हें करणं बरं दिसेल वाटतं ?" चारूला संताप सहन होईना. "मी आतां रहातच नाहीं कशी इथं. इकडून खुशाल आपल्या मनासारखं वागावं."

"ही मोठी पंचाईत म्हणायची—"

आणखीसुद्धां त्यांचें बोलणें झालें असतें, आणि तें किती विकोपाला गेलें असतें कुणाला माहीत. पण तेवढ्यांत खिडकीबाहेर चारुशीलेची सहज दृष्टि गेली. तिच्या आई-वडिलांची गाडी येत असतांना तिला दिसलीच. कितीतरी दिवसांनीं तिचे आई वडील दृष्टीला पडण्याचा सुयोग आला होता. सारें बोलणें सोडून ती तत्क्षणीं 'आई आली, अण्णासाहेब आले' म्हणत एखाद्या लहान मुलीप्रमाणें उड्या मारीतच त्यांना सामोरी म्हणून दाराकडे गेली.

"आलेच वाटतं अण्णासाहेब !" त्रिवेणी शन्तनूकडे पहात म्हणाली.

शन्तनू क्षणभर गोंधळला. घरांत रहावें कीं बाहेर जावें हेंच त्याला कळेना. त्यानें त्रिवेणीलाच विचारलें, "मी घरीं राहूं, का ती मंडळी असेपर्यंत बाहेर जाऊं ?"

"छे ! छे !" त्रिवेणीनें त्याला सांगितलें, "तुम्ही बाहेर जाऊं नये. चारूचं प्रेम संपादण्याची हीच खरी वेळ आहे. तुम्ही तिच्या आईवडिलांवर रागावून त्यांच्याशीं भांडून बाहेर पडलां आहांत ही अढी तिच्या डोक्यांत अजून आहे; ती तुम्ही आतां बाहेर गेलांत तर कायमचीच राहील, आणि मग चारु तुमच्याशीं कधींच चांगली वागणार नाहीं. आतां सर्व कांहीं चांगलं होण्याची वेळ आली आहे. माझं ऐकायचं असेल तर—आणि ऐकाच माझं,

माझ्या गळ्याची शपथ आहे—तुमच्याच कल्याणासाठीं मी सांगतें, आपण घरीं रहा. अण्णासाहेबांचं आणि आपल्या सासूबाईंच उत्तम स्वागत करा पाहिलंच प्रेम त्यांच्यावर अजून कायम आहें, हें त्यांना आणि चारूला कळूं द्या. आग्रहानं त्यांना चार दिवस ठेवून घ्या. एवढंच करा म्हणजे सारं तुमच्या मनासारखं झालंच समजा. मग चारु तुमचीच आहे. तुम्हाला हवी आहे तशीच ती झाल्याचं तुम्हांला आढळून येईल. गाडी दारांत थांबली वाटतं, त्वरा करा. चारूच्या अगोदर त्यांचं स्वागत करायला तुम्ही पुढं व्हा. मी घरांतली बाकीची व्यवस्था चोख ठेवतें. त्याची काळजी करूं नका. ”

त्रिवेणीचें म्हणणें शन्तनूला पटलें. तत्काळ तो सासू–श्वशुरांच्या स्वागताकरतां धांवला. अगदीं चारुशीलेच्या पुढें झाला. त्रिवेणीला तें पाहून किती तरी समाधान वाटलें. ती चहा–फराळाच्या आणि जेवणाच्या तयारीला म्हणून स्वयंपाकघराकडे वळली.

अण्णासाहेबांना गाडींतून बेतानें शन्तनूनें उतरवून घेतलें. त्यांना व सासूबाईंना अतिशय आदरपूर्वक नमस्कार केला. त्यांच्या हाताला धरून व त्यांची बॅग ते नको नको म्हणत असतां स्वतः हातांत घेऊन शन्तनू अण्णासाहेबांना घेऊन दिवाणखान्यांत आला. चारूनें गिरिजाबाईंना कवटाळलें. ती त्यांच्या हाताला धरून घेऊन आली.

कळकळीनें व विनयानें शन्तनूनें त्यांचें कुशल विचारलें. “ प्रवासांत फारशी दगदग झाली नाहीं ना ! आपलं पत्र वाचल्यानंतर आतुरतेनें मार्गप्रतीक्षाच करीत होतों. ” वगैरे म्हटलें.

शन्तनूची विनयाची व अगत्याची वागणूक पाहून म्हातारा–म्हातारीला फार बरें वाटलें. त्यांनींहि त्यांचें क्षेम विचारलें.

दिवाणखान्यांत आणून बसविल्यावर, ‘ आतां स्वस्थ चित्तानं आराम करा ’ असें शन्तनूनें म्हटलें. गिरिजाबाईजवळून चारूला ओढून ममतेनें पाठीवर हलकेंच थोपटीत अण्णासाहेब तिला म्हणाले, “ बेटा, नवऱ्याकडे येऊन राहिल्यावर आपल्या आईबापाला अगदींच विसरलीस कीं ! एकदां-सुद्धां इतक्या दिवसांत आमच्याकडे यायची बुद्धि तुला झाली नाहीं ना ?

इतकी आपल्या ससारांत दंग झालीस ना ! आणि तिकडे असतांना केवढा तरी प्रेमाचा आव आणीत होतीस ग !—आम्हींच म्हटलं, चारु भेटायला येत नाहीं तर आपणच तिच्याकडे भेटायला जावं; आलों झालं ! ”

हें ऐकून सगळ्यांनाच बरें वाटलें. चारूनें नुसतीच हंसून मान वेळली.

“ काय जांवईबुवा ! ठीक आहे ना तुमचं ! ” म्हाताऱ्यानें शन्तनूला विचारलें.

“ आपल्या आशीर्वादानं उत्तमच आहे ! ! ” शन्तनू सस्मित उत्तरला.

“ पोरी, तुझींहि प्रकृति चांगली ठीक दिसते आहे. सासर चांगलंच मानवलंय् कीं तुला !—आम्हांला वाटत होतं—”

“ कीं चारूची काय दशा झाली असेल ! ” गिरिजाबाई बोलल्या. त्या दिवाणखान्यांत आल्यापासून चकितपणानें चोहोंकडे पहातच राहिल्या होत्या. त्या पतीला उद्देशून म्हणाल्या, “ पाहिलंत कां ! चारूला जांवईबुवांनीं खरंच किती सुखांत ठेवलं आहे. आपण त्यांच्या घरीं आहोंत कां आपल्याच दिवाणखान्यांत आहोंत याचीच मला भ्रांत पडली आहे. इतकं असल्यावर मग कशाला पोरीला आमची आठवण होतेय् !—”

“ अरे ! खरंच कीं ! मला तर वाटतं मी आपल्याच दिवाणखान्यांत आहे! जांवईबुवा, सर्वत्र नजर फिरूवून आनंदून जाऊन अण्णासाहेब शन्तनूकडे वळून म्हणाले, “ चारूच्या जिवासाठीं हें सारं आपण मिळविलंत ! हें आपलंच आहे ! ”

“ होय ! ” लज्जायुक्त स्वरांत खालीं पाहून शन्तनूनें उत्तर दिलें.

म्हातारा-म्हातारीला तें ऐकून केवढा आनंद झाला.

“ एकूण दर पत्रांत चारु लिहीत होती तें सारं खरंच आहे तर ! ती इतकं लिही पण आम्हांला वाटे—”

“ आम्हांला बरं वाटावं म्हणून ती खोटंच लिहीत असेल. खरं म्हटलं तर तुम्ही एखाद्या पडक्या खोपटांत आपला काळ कंठीत असाल—पण पाहतों तों हें ऐश्वर्य. आम्हांला फार फार—आनंद झाला. जांवईबुवा, आमचा तुमच्या-वरचा सारा पहिला राग गेला आहे बरं का ! खरंच चारूला तुम्ही किती तरी सुखांत ठेवली आहे हो ! पाहून कसं बरं वाटलं आम्हांला ! ”

सासूबाईंच्या शिफारशीनें शन्तनूला मूठभर मांस आल्यासारखें झालें.

"पोरी," अण्णासाहेब चारूला म्हणाले, "तुझं हें भाग्य बघून आमच्या आनंदाला पारावार राहिला नाहीं. आणि खरंच, जांवईबुवा," शन्तनूला ते म्हणाले, "पुष्कळ दिवसांच्या भेटींत जो विलक्षण प्रेमाचा आनंद असतो त्याची कल्पना आज आम्हांला आली! तुम्ही त्यावेळीं म्हणाला होतां तेंच खरं. नेहमीं चारु आमच्याजवळच असती तर या आजच्या आनंदाला कायमचेच पारखे झालों असतों. बरं पण आपली त्रिवेणी अजून कशी दिसली नाहीं? आमच्यापुढं ती आली कशी नाहीं?–"

पण इतक्यांत त्रिवेणी चहा-फराळाचें घेऊन दिवाणखान्यांत आलीच.

"अरे वा! त्रिवेणी, तूं तर अगदीं कमालच केलीस कीं!" म्हातारा म्हणाला.

शन्तनूनेंच त्रिवेणीनें आणलेल्या चहा फराळाचे आपल्याकडेच घेऊन जातीनें सासूश्वशुरांच्या पुढें ठेविलें.

आपल्या आई–वडिलांशीं पति इतक्या आस्थेनें वागत असलेला पाहून चारूला चमत्कारच वाटला. ती एकसारखी त्याच्याकडे पहातच राहिली. तिला त्यानें कांहींच करूं देण्यास अवसर दिला नाहीं. ती आपल्याकडे आश्चर्यानें, कौतुकानें, आजवर न पाहिलेल्या दृष्टीनें पहात आहे हें तितक्याहि गर्दींत शन्तनूच्या दृष्टींतून निसटलें नव्हतें. त्यामुळें त्याला सासू–श्वशुरांना आदरपूर्वक वागविण्यांत अधिकच हुरूप आला होता.

आणि खरेंच, आल्यापासून शन्तनूची प्रत्येक बाबतींत मनमुक्त स्तुति आई-वडिलांच्या तोंडून होत असलेली ऐकून जितका चमत्कार चारूला वाटत होता, त्यापेक्षां तो त्यांच्याशीं गोडीनें–आदरानें, प्रेमानें वागत असल्याचें पाहून जास्त नवल वाटत होतें! ती अगदीं स्तिमितच झाली होती!

अण्णासाहेबांच्या आग्रहावरून त्यांच्याबरोबर शन्तनु, चारु आणि त्रिवेणी यांनींहि चहा–फराळाला सुरवात केली.

चहा फराळ चाल असतां अण्णासाहेब म्हणाले, "आलों बरं का त्रिवेणी तुझ्या आग्रहाच्या पत्रांवरून, चारूचा संसार पहायला आम्ही दोघंहि. चारूनं

आम्हांला इतकीं पत्रं लिहिलीं, पण एकदांसुद्धां या म्हणून लिहिलं नाहीं. तूं लिहिलंस म्हणून आलों हं ! "

त्रिवेणी नुसतीच हंसली. शन्तनु व चारु त्रिवेणीकडे एकदम कांहीं निराळ्याच दृष्टीनें पाहूं लागलीं. दोघांच्या मनांत " काय ! त्रिवेणीनं यांना या म्हणून पत्र लिहिलं होतं ! " हा एकच प्रश्न एकदम आला असावा.

" बरं का जांवईबुवा, " म्हातारेबुवा पुढें म्हणाले, " आम्हां दोघांना तुम्ही गेल्यापासून वाड्यांत मुळींच करमेना. उभे वारे सुटले ! तेव्हां आम्हीं तीर्थयात्रा तरी करावी म्हणून ठरविलं. इतक्यांत त्रिवेणीचं पत्र आलं. म्हटलं जातां जातां उभाउभी तुमच्याकडं जावं. पहावं, चारूहि कंटाळली असेल, तिलाहि बरोबर न्यावी. म्हणजे तिलाहि बरं वाटेल, आम्हांलाहि बरं वाटेल, म्हणून आलों. आल्यासारखा पण फार आनंद झाला. आतां म्हणतो दुपारीं विश्रांति घ्यावी आणि संध्याकाळीं मार्गस्थ व्हावं. कां, खरं कीं नाहीं ! काय ग चारु, येणार ना तूं आमच्याबरोबर !—"

चारु, शन्तनू काय म्हणतो म्हणून त्याच्याकडे पाहूं लागली.

" पण चारूला बरोबर घेतली तर जांवईबुवांचे हाल नाहीं का व्हायचे ! " आतां सासूबाईंना जांवयाचा कळवळा आला.

" त्रिवेणी आहे ना इथं ! ती कशी त्यांचे हाल करील ! " म्हातारा म्हणाला, " मग काय संध्याकाळीं मार्गस्थ व्हायला तुमची परवानगी आहे ना जांवईबुवा ! "

" तें पाहूं मग. आतांच तर आपण आलां आहांत. अशा उतार वयांत एकसारखी प्रवासाची दगदग सोसली तर पाहिजे ! शिवाय माझ्या घरीं आपण आलां आहांत आपल्या पायानं, पण येथून जायचं आहे आमच्या इच्छेनं घरीं चार दिवस ठेवून घेतल्याखेरीज आम्हीं आपल्याला कसं सोडूं ! चार दिवस आमच्या इथं राहिलं पाहिजे. आमच्याकडून होईल तशी सेवा स्वीकारली पाहिजे. गरीबाची मीठभाकर गोड करून घेतली पाहिजे. मग पुढचा विचार ! मग कोण कोण जाणार, कोण कोण राहणार हें सावकाशीनें ठरवितां येईल; त्याचं आतांच काय ! " शन्तनूनें मनापासून आग्रह केला.

त्या आग्रहापुढें म्हातारा-म्हातारीला जातां येणारं थोडेंच! "आतां आपण ठरवाल तसं!" एवढेंच म्हातारा म्हणाला.

शन्तनू इतका आग्रह करील अशी चारूला मुळींच कल्पना नव्हती! तिलाही बरें वाटलें.

दुपारींच सासू—श्वशुरांना शन्तनूनें थाटाची मेजवानी—अतिशय आवडणाऱ्या पदार्थांची—पक्वान्नांचीच केली. त्यांचें कांहीं म्हणतां कांहीं उणें पडूं दिलें नाहीं. एकसारखा त्यांच्या हांकेला तो उभा होता!

जांवयानें मनपसंत बरदास्त ठेवल्यामुळें म्हाताराम्हातारीला खूपच आनंद झाला. आपल्यापेक्षां आपल्या पतीलाच आपल्या वडिलांच्या आवडीनिवडी जास्त माहीत असून त्याकरितां हौसेनें तो खटपट करीत असल्याचें पाहून चारूला दर क्षणीं आतांपर्यंत न वाटलेला आदर वाढीस लागला आहे असें आढळून येत होतें. जेवणें झालीं! दुपारची वामकुक्षी—विश्रान्ति झाली, संध्याकाळ झाली. संध्याकाळीं म्हाताम्हातारीभोंवतीं त्यांच्याच बोलावण्यावरून चारु, शन्तनू, त्रिवेणी गोळा झालीं. ऐसपैस गप्पासप्पांना सुरुवात झाली. बोलतां बोलतां अण्णासाहेबांनीं सहज गंमतीनें विचारलें, "चारु, वरचेवर आमचं चांगलं जमलं आहे, आम्हीं एकोप्यानं आणि प्रेमानें वागतों असं लिहीत असे खरी, आणि प्रत्यक्षहि तें आम्हीं आज पाहिलंच. पण तुम्हीं आमच्या घरांतून निघालां तेव्हां असं वागत असाल अशी आम्हांला मुळींच कल्पना नव्हती. तें हें तुमचं इतकं चांगलं मेतकूट जमलं कसं आणि केव्हां! काय ग चारु, सांग पाहूं तूंच!—"

चारु काय सांगणार, कपाळ! तिनें आपली लाजेनें खालींच मान घातली.

"जांवईबुवा! तुम्हीच सांगा हो—चारूची कांहीं इच्छा दिसत नाहीं. आणि आम्हांला तर इच्छा आहे—"

शन्तनू हंसून चारूकडे पाहूं लागला. 'सांगूं!' अशा अर्थानें तिच्याकडे पाहिलें. तिची छाती धडधडूं लागली. आपण पत्रांतून खोटेंच कळविलेलें बेंड बाहेर फुटून आपली फजिती उडणार, असें तिला वाटून ती

म्याली आणि तो प्रसंग टाळण्याकरितां तिथून उठून जायला लागली. गिरिजाबाईनीं व त्रिवेणीनें तिला हाताला धरून " बैस ग, चाललीस कुठं ! इतकं लाजायला काय झालं ? " म्हणून बळेंच बसविली.

शन्तनू आपल्या संसाराची हकीकत सांगायला सरसावला. तो म्हणाला, " खरं सांगायचं म्हणजे आम्ही प्रथम आलों त्या वेळीं आमचं मुळींच जमलं नाहीं. जरी हिचीं पत्रं आपल्याला येत होतीं तरी तीं साफ खोटीं होतीं--"

" आमची ती कल्पना होतीच नाहीं तरी ! " म्हातारा म्हणाला.

" नाहीं हो अण्णासाहेब, मी मुळींच खोटं लिहीत नव्हतें, "

" पण जावईबुवांचं ऐकूं दे तरी आम्हांला. " गिरिजाबाई मुलीला म्हणाल्या, " असं पाहिल्यापासूनच त्यांना खोटं ठरवूं नकोस. अगदींच खोटं बोलायला लागले तर तें त्यांचं खोडून काढ. त्याचकरितां तर आम्हीं तुला बसवून घेतलं आहे. हं, चालूं द्या जांवईबुवा तुमचं !–"

" मीं हिच्याकरितां वाटेल ते प्रयत्न केले, राबलों; पण ही कांहीं प्रसन्न होईना. माझ्याकरितां या त्रिवेणीबाईसुद्धां धडपड करीत, पण यांनाहि यश येईना ! मी तर अगदीं निराशच झालों होतों. पण--माझा–आमचा भाग्योदयकाळ जवळ आला. एक दिवस काय झालं पहा, आजच्यासारखाच एक चांगला दिवस उजाडला. त्या दिवशींच्या सुन्दर सकाळीं--तो दिवस मी जन्मांत कधीं विसरणार नाहीं–हिच्या वडिलांचं हिला 'आपण तुझ्याकडे येत आहोंत ' अशा मजकुराचं पत्र आलं. त्यानंतर लगेच ते आलेच. त्या वेळीं हिला वाटत होतं, कीं मी त्यांचं स्वागत करणार नाहीं—कुठं तरी निघून जाईन, माझं त्यांच्यावर कांहीं प्रेम नाहीं. पण जेव्हां तिच्याहि पुढं जाऊन मीं हिच्या मातापितरांचं माझ्याच पितरांप्रमाणं जाऊन स्वागत केलं आणि त्यांना घेऊन घरांत आलों, तेव्हां हिनं ज्या दृष्टीनं प्रथम माझ्याकडे पाहिलं त्या वेळींच प्रथम हिच्या दृष्टींत माझ्या विषयींची पहिली खऱ्या प्रेमाची वीज चमकल्याचं मला दिसलं. नंतर तेव्हांपासून आपल्याशीं वागतांना, बोलतांना, आपल्याला आग्रहानं रहा म्हणून म्हणतांना, आपल्याला आवडत्या पक्वान्नांची मेजवानी करून आग्रहानं

जेवूं घालतांना—हिच्या डोळ्यांत, वाणींत, वर्तनांत, चढत्या पायऱ्यांनीं आमचं जमत चाललं आहे--जमलं आहे—जमणार--जमलं--अस माझ्या प्रत्ययाला येऊं लागत आहे, तोंच—"

चारूच्यानें रहावलें नाहीं. ती एकदम जागेवरून उठली. आई–वडील त्रिवेणीजवळ आहेत हें देखील त्या क्षणीं विसरून विजेसारखी उठून शन्तनूजवळ गेली आणि आणखी कांहीं जास्त बोलून आपल्याला फजीत करूं नये म्हणून बिनदिक्कत 'आतां पुरे हं' करीत त्याच्या तोंडावर लाडिकपणानें चारूनें हात ठेवला !--

तरीहि हंसत हंसत शन्तनु " आणि जमतां जमतां आतां जमलं–आणि हें असं जमलं !" अण्णासाहेब, गिरिजाबाई तें ऐकून मोठमोठ्यांदा हंसल्याशिवाय कशी रहाणार !

त्रिवेणीदेखील मनापासून हंसली.

चारुशीला तर लज्जेनें अर्धमेली झाली !

जांवयाकडचा चार दिवस चमचमीत पाहुणचार घेतल्यानंतर अण्णासाहेबांनीं तीर्थयात्रेला निघण्याचा दिवस मुक्रर केला. निघतांना चारूला बरोबर नेऊं काय ? पाठवितां काय ? असे शन्तनूला विचारलें. त्यानें म्हटलें, " माझी कांहीं हरकत नाहीं. तुमच्या मुलीला विचारा अन् खुशाल घेऊन चला."

" चारुशीलेनें स्पष्टच नकार दिला. तिनें स्वच्छ म्हटलें, " या तीर्थयात्रा मला कशाला ?"

" मग म्हातारपणीं आमची प्रवासांत व्यवस्था कोण ठेवणार ?"

त्रिवेणी तयार झाली. ती, मी येतें म्हणाली. तिला शन्तनूनें व चारुशीलेनें सढळ शब्दांनीं परवानगी दिली. तेव्हां अण्णासाहेबांनीं हंसत हंसत म्हटलेंच, " आतां तुम्हां तरुण मण्डळींना आम्हांसारख्या म्हाताऱ्यांची काय, किंवा त्रिवेणीसारख्या त्रयस्थाची काय--अडचण वाटायचीच ! आमची चार दिवससुद्धां बरीच अडचण झाली असेल, नाहीं !" चारु त्यावर काय बोलणार !

त्रिवेणी निघायच्या वेळीं चारूला म्हणाली, " चारु, आतां सुखानं नांद बरं. माझी अडचण अगोदरहि तुला नव्हती, आणि यानंतरहि व्हायची नाहीं. इथलं माझं काम झालंच आहे. आतां ' लघुकथा ' मासिकाला इथल्या अनुभवाची जशी एक गोष्ट मला देतां आली, तशी इथून जाईन तरच बाहेर नवा अनुभव मिळेल व आणखीहि लिहितां येईल, नव्हे का ?

---

# परिस्थितीनें घातलेलें कोडें ! : ६

शंभुराव–गौरीचें तें एक नमुनेदार जोडपें–दोघेंहि सुशिक्षित, सद्गुणी, समंजस आणि एकमतानें, खेळीमेळीनें, आनंदानें वागणारे. त्यांचा प्रीति-विवाह झाला होता. त्यांच्या विवाहाला उणींपुरीं नऊ दहा वर्षें होऊन गेलीं होतीं. या अवधींत त्यांचें कधीं तसें तीव्र भांडण झाल्याचें कुणाच्याही ऐकिवांत नव्हतें. इतकेंच काय, त्यांना जर कुणीं त्याबद्दल विचारलें असतें, तर त्यांना आठवण करूनही सांगतां आलें असतें कीं नाहीं कोण जाणे ! तशीं रागावणीं, रुसणीं, धुसफुसणीं अधूनमधून झालीं असतील, नाहीं असें नाहीं; पण तीं किती ?–जितक्यास तितकीं ! दुपारीं रागाचें ऊन्ह तर संध्याकाळीं अनुरागाची लगेच शीतळ सांवली; असाच प्रकार बहुधा होता. त्यांच्या प्रीतिसंगमावर पमा, कुसुम, मधु, प्रभा हीं सुंदर फुलें फुललीं होतीं. तीं गोड होतीं. तीं दर दिवशीं आपल्या मातापितरांच्या सौख्याला बोबड्या बोलांनीं, बाळ–लीलांनीं आणि चतुर खेळांनीं भरतीच आणीत होतीं !

जी एक गोष्ट त्यांना मिळाली नव्हती, ती म्हणजे संपत्तीची समृद्धि, लक्ष्मीची पूर्ण कृपा ! शंभुरावांना इतका कांहीं पगार नव्हता कीं, ज्यामुळें त्यांना आपल्या कुटुंबास श्रीमंती थाटानें वागवितां येईल.

परंतु अजूनपर्यंत तरी त्या गोष्टीनें शंभुरावांच्या किंवा गौरीबाईच्या हृदयाला धक्का दिलेला नव्हता. तसें म्हणा किंवा समंजसपणानें आणि शहाणपणानें त्यांनीं तो धक्का लावून घेतला नव्हता म्हणा.

कंजूषपणा करायचा नाहीं, पण उलट कधीं उधळपट्टीहि होऊं द्यायची नाहीं; उपाशी रहायचें नाहीं किंवा ऋण काढून सणही साजरा करण्याच्या भानगडींत पडायचें नाहीं !

यामुळें कधींहि व केव्हांही शंभुराव बाहेरून आले, तरी गौरबाई हंसत–मुखानें त्यांचें स्वागत करायला सामोऱ्या झाल्या नाहींत, असें कधीं झालें नाहीं. जेवतां–खातांना, बसतां–बोलतांना परस्परांनीं वाचलेल्या पुस्तकांतील

अनेक गंमती—जमतीसंबंधानें किंवा कित्येक पाहिल्या-ऐकलेल्या बाबीसंबंधानें देवाण घेवाण करण्यांत कसूर करून आपल्या आनंदाला वैगुण्य आणिलें नाहीं.

फॅमिली डॉक्टर जेजुरीकर किंवा त्यांच्या बैठकींतले अण्णासाहेबांसारखे शेजारी, या जोडप्याच्या सुंदर आणि सौख्यपूर्ण संसाराकडे पाहून नेहमीं कौतुकानें आणि अभिमानानें म्हणत, " आपल्याला बोवा तुमच्या या सुरेख संसाराचा हेवा वाटतो ! हें असें आम्हांला कां साधत नाहीं ! 'पुरुष-धनुर्धर संसार—रथा—सारथिसम भार्या', असा प्रकार असला म्हणजे हा असा चमत्कार दृष्टीला पडतो ! हें मिळवायला कोणती जडीबुट्टी तुम्ही प्राप्त करून घेतली आहे, तें तरी आम्हांला सांगा ! "

× × ×

" आणि खरेंच—पुष्कळ कालपर्यंत शंभुराव गौरीबाईंचा संसार वर लिहिल्याप्रमाणेंच चालला होता. परंतु जगांत एकच एक स्थिति टिकली आहे का कुणाची ! काळ बदलून महर्घता आली, कित्येकांच्या नोकऱ्या गेल्या, तर शंभुरावांच्या मासिक वेतनाला ऑफिसांत कात्री लागली ! मुलांनीं मागितलेला पदार्थ मिळूं शकेना. कित्येकदां शाळेची फी व पुस्तकें मागविण्याची पंचाईत पडूं लागली. अनेकदां मुलांमुलींना फी मिळेना म्हणून घरीं राहण्याचा प्रसंग येऊं लागला.

गौरीबाई उघड्या डोळ्यांनीं हें कसें सहन करणार !—आणि शंभु-रावांच्या काळजाचे लचके तुटल्याखेरीज तरी कसे राहणार !

लोकांनीं म्हणावें ' मधु आणि प्रभा किती कुशाग्र बुद्धीचे आहेत—आणि मुली तरी कशा चुणचुणीत अन् हुशार आहेत. "

' मुलें दिगंत कीर्ति करतील; अन् कुसुम, पमासुद्धां कितीजणींना आदर्श होऊन बसतील. "

शंभुराव—गौरीबाईंना हें ऐकायला येत असे, त्यांना पटत असे. त्यांचींच तीं मुलें. लोकांच्यापेक्षा त्यांना तें जास्त नाहीं का पटणार ! पण करणार काय ! कळलें तरी वळायचें कसें ! जगांत सारीं सोंगे आणतां येतात; पण पैशाचें सोंग कुणालाच साजरें करतां येत नाहीं.

परंतु निष्ठुर परिस्थितीनें शंभुराव–गौरीबाईंना अगतिक बनविलें. त्यांच्या मुलांमुलींच्या हौसेच्या किंवा जरूरीच्या मागणीचा अनुकूल विचार करण्याचीहि सक्त मनाई केली. शंभुराव रडकुंडीस आले व वैतागानें उद्गारले

" अरेरे ! काय ही माझी लाचारीची परिस्थिति ! "

गौरीबाईंनीं आपल्या पदरानें डोळे पुसले. त्या कळवळून म्हणाल्या.

" आपलं आतां असंच पुढें चालायचं का ! "

" मी तरी काय सांगूं !—उद्योगासाठीं दिवसभर मर–मर मरण्यांत मी कसूर करतों आहे काय ! "

" माझी तरी वागण्यांत कसली चूक होतेय् का ! "

" मी कुठं तसं म्हणतों आहें ! माझ्या पुरुषाच्या पराक्रमाला वावच नाहीं तर मी तरी त्याला काय करणार ! "

" पुरुषांच्या पराक्रमाला वाव नाहीं ! मग काय स्त्रियांच्या सद्दीचे दिवस आहेत ! तसं असेल तर–"

" तर काय ! "

" आपल्या सोन्यासारख्या मुलांची देखतां डोळां आबाळ पाहण्यापेक्षां स्त्रियांच्या सद्दीचा जोर असेल तर मला पुढें व्हायला हवं. मी पाहूं का एकादी चाकरी ! आपल्यापेक्षां मला नोकरींत जास्त प्राप्ती झाली तर आजची दैना टळणार नाहीं का ! "

गौरीबाई ओघांत भर्रदिशीं बोलून गेल्या.

शंभुराव तें बोलणें ऐकून चम्‌कन् चमकले. त्यांनीं वर मान करून गौरीबाईकडे आपादमस्तक पाहिलें. आपली पत्नी थट्टेनें, उपहासानें कीं खऱ्या निश्चयानें उद्गारली आहे, हें पाहण्याचा मोह त्यांना आंवरला नाहीं.

पण त्यांना गौरीबाईच्या बोलण्यांत थट्टा तिरस्कार मुळींच आढळला नाहीं. त्यांत कडवट निश्चय होता.

" काय तूं नोकरी पहाणार ! पत्करणार !

" काय हरकत आहे ! मी शिकलेली आहे, असं मला सर्टिफिकेट मिळालेलं आहे. प्रयत्न करीन तर मला खास चांगली नोकरी मिळेल.

आपले आणि आपल्या मुलांबाळांचे उघड्या डोळ्यानीं हाल पाहण्यापेक्षां प्रसंगाकडे लक्ष्य देऊन मी नोकरी धरली तर काय बिघडणार आहे ! ''

" तूं म्हणतेस तें खरं आहे—"

" मग काय !—उद्यां पाहूं माझ्याकरितां नोकरी ! "

" हुं ! "

" आणि मग ! मी नोकरीला जाऊं लागलें तर—घर, मुलें स्वयंपाकपाणी—! "

शंभुरावांना पुन्हां कसला तरी एक जोराचा धक्का बसला ! गौरीबाईच्या वाक्यानें कल्पनेला खिजविणारी, मनाला मारणारी, रूढीला रसातळाला पोंचविणारी एक भयानक कल्पना त्यांच्यापुढें उभी ठाकली ! त्यांच्या डोळ्यांपुढें जरा वेळ अंधेरीच आली! सर्वांगांतून कसलीतरी चमक निघून गेली. आपली पत्नी बाहेर नोकरीकरितां जाणार !—आणि आपण, आपण!—गृहकृत्याकडे वळणार !— ' गृहकृत्यांत दक्ष ' होणार ! मुलें संभाळणार, स्वयंपाकपाणी करणार. आपल्या पुरुषार्थाला आपणच पायांखालीं तुडवायला तयार होणार !—

मनांत हजारों—लाखो कल्पना आल्या. शंभुराव ताठरलेल्या, तारवटलेल्या डोळ्यांनीं गौरीबाईकडे कितीतरी वेळ पहातच राहिले !

गौरीबाईनीं तें सर्व ओळखलें. पतीची मनःस्थिति पुरेपूर जाणली. त्या जवळ गेल्या, त्यांचा हात आपल्या हातांत त्यांनीं घेतला. आणि अत्यंत मृदुपणानें त्या उद्गारल्या—

" ऐकायचं का ! "

" काय ! "

" पुरुषार्थाची पायमल्ली करावी म्हणून, आपल्या पराक्रमाला हीन लेखावं म्हणून, पुरुषांपेक्षां स्त्रिया अधिक पराक्रमी असतात हें तोऱ्यानं दाखवावं म्हणून मी असं म्हटलं, अशी का इकडची समजूत झाली !—"

" अं !—हं—अं—हं—नाहीं ! "

" परिस्थितीला पचनीं पाडण्यासाठीं, सोन्याची माती न व्हावी—मातीचं

सोनं करतां यावं म्हणून प्रयत्न करावयाचा म्हटलं तर जो मार्ग दिसला त्याबद्दल सहज मीं बोललें."

"कबूल आहे मला—!"

"आणखी प्रयोगाकरितां चार दिवस इकडून घरीं राह्यचं झालं आणि मीं उद्योग करून पाहिला तर एवढ्यावरून आपल्यामध्यें विषमता निर्माण होईल अशी भीति—"

"मुळींच नाहीं. चला. आपण तसा प्रयोग करून पाहूं या. साधला तर आपल्यासारख्याच परिस्थितींतल्या लोकांना तो एक धडा होईल. आजपर्यंत तूं शिक्षण-संपन्न असूनहि आपलं शिक्षण घरांत चुलीपुरतं, मुलांबाळांपुरतंच, वापरलंस, तसाच प्रयोग करून पाहण्यास मी कां तयार होऊं नये! जरूर. मला त्यांत कांहीं वाटणार नाहीं. तेवढ्यावरून आपल्यामधल्या प्रेमाला निराळें स्वरूप येईल असंहि मी मानायला तयार नाहीं.——केव्हांपासून उद्योगाला लागायचं!"

शंभुराव तयार झाले!

पण आतां गौरीबाईंना चमत्कारिक वाटूं लागलें. काय,——आपण नोकरी करायची आणि तिकडून घर संभाळलं जायचं! लोक तरी काय म्हणतील! चमत्कारिक नाहीं का दिसायचं!—जग नांवं नाहीं कां ठेवणार!—

गौराबीई अशा गडबडल्या.

शंभुरावांनीं आतां गौरीबाईंनाच प्रोत्साहन देण्याचा सपाटा चालविला. रजा घेऊन शंभुरावांनीं घरीं रहावयाचें आणि गौरीबाईंनीं आपल्याकारितां नोकरी पाहून ती लगेच पत्करायची असें पति-पत्नींत शेवटीं टरलें एकदाचें!

× × ×

काय योगायोग तरी विलक्षण! ज्या दिवशीं आपल्या उद्योगाची उलटापालट करावयाची असें पति पत्नींनीं ठरविलें, त्याच्या दुसऱ्याच दिवशींची गोष्ट, शंभुराव नित्याप्रमाणें व संवयीप्रमाणें ताजें वर्तमानपत्र वाचीत वरील सोप्याच्या जोत्यावर उभें असतां भोंवळ आल्यासारखें होऊन खालील फरशीवर चांगले साडेचार—पांच फूट उंचीवरून गुडघ्यावर आपटले!— आजारी झाले. डॉक्टर जेजुरीकर आले. त्यांनीं त्यांना तपासलें. हा अपघा

म्हणजे भिण्यासारखा, जिवाला अपायकारक नसला तरी तें एक-दोन महिन्यांचें तरी दुखणें होतें. औषधोपचार सुरू झाले. डॉ. जेजुरीकरांच्याच सर्टिफिकिटा-सह रजेचा अर्ज ऑफिसांत धाडणें भाग पडलें. शंभुरावांनीं अंथरूण धरलें.

चूल चालती राहण्याकरितां गौरीबाईंना निकडीनें नोकरी धुंडाळणें अगदीं आवश्यकच झालें.

शंभुरावांच्या आजारीपणाचे पहिले दहापंधरा दिवस गौरीबाईंना जरा जास्तच जिकिरीचे गेले. आजाऱ्याच्या पथ्यापाण्याचें करावयाचें, मुलां-मुलींचें वेळच्या वेळीं उरकावयाचें, सर्वांचीं जेवणींखाणीं करावयाचीं आणि मग नोकरीच्या मागें लागावयाचें—पण गौरीबाईंना नोकरीसाठीं फारसे प्रयास पडले नाहींत.

स्त्रियांनीं स्त्रियांच्याकरितांच चालविलेल्या एका प्रचंड संस्थेंत गौरी-बाईंना अल्पायासानें भरपूर वेतनाची नोकरी मिळाली.

तशाही स्थितींत त्यांना हायसें वाटूं लागलें.

शंभुरावांना जरा हालचाल करायला येऊं लागतांच, घरकामाचा ताबा पूर्वसंकल्पाप्रमाणें आपल्याकडे त्यांनीं घेतलाच !

प्रथम प्रथम शंभुरावांकडून स्वयंपाकांतले पदार्थ बिघडत असत; पण त्याबद्दल कोणी कधींच तक्रार करीत नसे. गौरीबाईंचा स्वयंपाक बिघडला तर प्रीतीच्या पोटीं आपण कधीं त्यांची कानउघाडणी केली नाहीं तर ती आपल्याला कां बोलेल ! अशी तें आपल्या मनाची समजूत करून घेत; मनाशीं ओशाळत;—पण बोलून मात्र दाखवीत नसत. गौरीबाईंना मनाशीं हंसूं येई; पण बोलून पतीचा पाणउतारा होईल म्हणून त्या कधींच कांहीं बोलत नसत.

शंभुराव जुलूम जबरदस्तीनें कां होईना, पण चुकत माकत घरकामांत जम बसवीत होते; पण गौरीबाईंचं नोकरींत फारच लवकर बस्तान बसलें. त्यांना प्रयास पडले नाहींत. त्यामुळें मुलां-मुलींना फीशिवाय, पुस्तकांशिवाय, कपड्या—लत्त्याशिवाय शाळा सोडून घरीं राहण्याची जरूर राहीनाशीं झाली. इतकेंच काय-पण गौरीबाई मुलांकरितां बाहेरून येतांना अधूनमधून, खाऊ, खेळणीं, चित्रें, वगैरे आणूं लागल्या.

याप्रमाणें गौरीबाईच्या कर्तेपणाच्या कारकीर्दीत निस्तेज, रुक्ष, उदास वाटणाऱ्या त्यांच्या संसारांत एक प्रकारचा उत्साहजनक आनंद खेळूं लागला. मुलांमुलींच्या मुखांवर तजेला खेळूं लागला. गौरीबाईच्या तोंडावर टवटवी झळकूं लागली. शंभुराव, निदान बाह्य वर्तणुकीनें, बोलण्या-चालण्यानें आपल्या संसारांत 'राम' आहे, जगांत जगण्यांत कांहीं अर्थ आहे, असें वेळीं प्रसंगीं दाखवूं लागले.

आणि असें कां नाहीं वाटणार? पैसापरमेश्वर प्राप्त होऊं लागल्यावर तसें कुणाला कां वाटणार नाहीं!

आपल्या शिक्षणाचें चीज होत आहे हें पाहून गौरीबाईंना कामांत अपूर्व उत्साह वाटूं लागला.

शंभुरावांची प्रकृति झपाट्यानें सुधारण्याच्या मार्गाला लागली!

× × ×

"देवाच्या दयेनं इकडची प्रकृति अगदीं पहिल्यासारखी झाली. आतां मला बरं वाटूं लागलं."

"हं, आणि आतां माझी रजाही संपली. कामावर रुजूं झालंच पाहिजे—"

"होय, खरंच कीं! माझ्या ध्यानांतच नव्हतं हें!"

"आणि माझ्या तरी कुठं होतं? आज दुपारींच ऑफिसांतला तो परचुरे येऊन गेला. त्याच्या बोलण्यावरून मला आठवलं. साहेब म्हणत होता म्हणे कीं, यापुढें माझी रजा कोणत्याही कारणानं वाढवितां येणं शक्य नाहीं. आतां कामावर हजर तरी व्हायला पाहिजे, नाहींतर नोकरीला कायमचा रामराम तरी ठोकला पाहिजे."

"मग उद्यां ऑफिसला जाणं भागच आहे—"

"अर्थात्!"

"आणि मला घरकामाचा चार्ज घेतला पाहिजे!"

"ओघालाच आलं तें!"

"माझी कांहीं ना नाहीं."

संध्याकाळच्या वेळीं व्हरांड्यांत बसल्या बसल्या शंभुराव आणि गौरीबाई यांच्यांत बोलणें चालू होतें. आतांपर्यंत आपल्याकडे घेतलेल्या भूमिका उभयतांनीं यथायोग्य वठविल्या होत्या. गौरीबाईला कामाचा कंटाळा आला होता असें नव्हे; पण स्वयंपाकघराचा चार्ज उद्यांपासून घ्यावा लागणार म्हणून त्यांना मुळींच वाईट वाटलें नाहीं. शंभुरावांनीं आपली ड्यूटी चांगली बजावली होती, तरी उद्यां आपल्याला ऑफिसांत जावयाला मिळणार म्हणून त्यांना विलक्षण हुरूप वाटावयाला लागला. इतकेंच काय, पण उद्यां उजाडतें केव्हां, ऑफिसची वेळ होते केव्हां आणि आपण आपल्या खुर्चीवर जाऊन विराजमान होतों केव्हां, असें त्यांना होऊन गेलें. आपलें ऑफिस, आपल्या बरोबरचे लोक, ऑफिसचा चपराशी, हेडक्लार्क, साहेब, ऑफिसमधल्या आपल्या चालणाऱ्या गोष्टी, इत्यादि मागील देखावे शंभुरावांच्या मनःचक्षूपुढें भराभर येऊं लागले. उद्यांपासूनचा त्यांचा ऑफिसचा संसार त्यांना दिसूं लागला. आपलं तें खरें, असें त्यांच्या कानांत कोणी तरी गोड वाणीनें कुजबुजत आहे असा त्यांना भास होऊं लागला.

घरांत गौरीबाईंनीं आणि ऑफिसांत शंभुरावांनीं 'पुनश्च हरि ॐ' म्हणून कामाला आरंभ केला.

त्या दिवशीं संध्याकाळीं शंभुराव ऑफिसांतून परत आले, तेव्हां मुलें शाळेंतून आलींच होतीं. पमा दारांतच जाऊन त्यांना बिलगली. कुसूम–"बाबा आले, बाबा आले !" म्हणत घरांत आपल्या आईकडे तिनें धूम ठोकली. मधूनें त्यांच्या हातांतली छत्री घेतली. प्रभा नुसताच त्यांच्या आंवतींभोंवतीं हिंडत होता.

शंभुरावांचें शरीर दिवसभराच्या ताटकळीनें बरेंच थकलें होतें; पण मन किती आनंदित झालें होतें !

x x x

शंभुराव संसारांतल्या अशा सुखाचा गोड घुटका घेत असतां त्याच वेळीं परिस्थिति–कवटाळीण त्यांच्याकडे पाहून हिडिसपणानें आणि उपहासानें हसत होती, हें कुठें त्यांना माहीत होतें !

जेव्हां केल्या कामाचा दाम महिन्याच्या अखेरीस त्यांच्या हातावर पडला, तेव्हां त्यांचें तोंड कडवट झालें. जिभेला कोरड पडली–" यांत कसा निभाव लागणार ! " असे चार शब्द त्यांच्या तोंडांतून बाहेर पडण्याची इच्छा करीत होते; पण जीभ जागच्या जागींच खिळली. ती हलेचना !

इतिहासाची पुनरावृत्ति होत असल्याचें शंभुरावांना दिसूं लागलें. त्यांना परिस्थिति पुन्हां डिवचूं लागली.

चिवटपणाने हें ते सहन करीत आहेत, हें सहन न होऊन कीं काय, परिस्थितीनें थोड्याच अवकाशांत आणखी एक पाऊल पुढें टाकलें—

" कळस झाला आतां ! आतां आहे त्या पगारावर बदली केली आहे त्या ठिकाणीं निमूटपणें गेलें पाहिजे एक, नाहींतर नोकरीला रामराम ठोकून घरीं स्वस्थ माशा मारीत बसलें पाहिजे ! " शंभुराव एक दिवस ऑफिसांतून आले–आले ते ही अशी विचित्र बातमी घेऊन आले. येतांक्षणींच अत्यंत वैतागानें आणि उद्वेगानें त्यांनीं नित्याप्रमाणें स्वागत करायला आलेल्या गौरीबाईच्या कानावर सदर गोष्ट घातली ! पुष्कळ–पुष्कळ बोलायचा त्यांचा विचार होता; पण त्यांना बोलवेनाच !

त्यांच्या मनाला कसें सांवरावें, त्यांना कोणत्या नेटक्या शब्दांनीं धीर द्यावा, हें गौरीबाईनाहि समजेना. आणि नुसत्या धीराच्या शब्दानीं तरी त्या वेळीं विशेष काय होणार होतें !

तरी पण तितक्यांतूहि त्या कांहीं बोलणार होत्या. त्याकरितां त्यांनीं मान वर उचलली, थोडेसें खाकरल्यासारखें केलें, पदरानें तोंड पुसलें, नाक शिंकरलें आणि " होय " म्हणून म्हटलें, इतक्यांत बाहेर कुणीशी हांक मारली.

तो विषय तितकाच राहिला. गौरीबाईनीं चट्दिशीं उठून बाहेर डोकावून कोण आहे म्हणून पाहिलें.

ते गोपाळराव बावळे होते.

ज्या संस्थेंत गौरीबाईनीं कांहीं काळ नोकरी केली होती त्या संस्थेचे गोपाळराव बावळे आजन्म सेवक. ते आज गौरीबाईना मुद्दाम भेटायला

आले होते. त्यांना आपल्याकडे अचानक आलेलें पाहून गौरीबाईंना जरा आश्चर्य वाटलें.

पति-पत्नींचा पहिला विषय गोपाळरावांना "या बसा" वगैरे करण्याच्या उद्योगांत तसाच राहिला.

गौरीबाईंनीं त्यांची शंभुरावांशीं ओळख करून दिली. त्यांना जरा वेळ बोलत ठेवून चहा वगैरे आणून देण्यासाठीं त्या आंत गेल्या.

चहा-फराळाचें झालें. "इकडे कुणीकडे !" अशी पृच्छा करण्यापूर्वीच गोपाळरावांनीं आपल्या आगमनाचा हेतु सांगायला सुरवात केली—

"गौरीबाई," डोक्यावरील कॅप बाजूला ठेवीत गोपाळराव म्हणाले, "मी आज आपल्याकडे मुद्दाम अशासाठीं आलों कीं-म्हणजे आपल्याला कळलंच असेल-आमच्या संस्थेच्या मुख्य संचालक सुशीलादेवी नुकत्याच परवां विलायतेहून आल्या. आपल्या गैरहजेरींत झालेल्या कामाची तपासणी करतांना आपण संस्थेला येऊन मिळालांत आणि राजीनामा देऊन पुन्हां: घरीं बसलांत, हें त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आलें. त्या आपल्या वर्गभगिनी आहेत. असें त्यांच्याकडून आम्हांला कळलें. आपण राजीनामा दिल्याबद्दल त्यांना वाईटहि वाटलें. अकारण राजीनामा देण्याचें कारण त्यांना कळेना आणि आपल्याला वागविण्यांत आमच्याच हातून कांहींतरी गैरवर्तन झालें असलें पाहिजे अशी त्यांची समजूत झाली आहे. 'ती माझी बालमैत्रीण आहे. ती माझ्या बरोबरीनें काम करायला आली, तर ती आणि मी संस्थेंत किती हुरूपानें काम करूं आणि संस्था नांवारूपाला आणूं, याची तुम्हांला अगोदर कल्पनाच येणार नाहीं' हें त्यांचें बोलणें मला अनुभवानें अक्षरशः पटलें आणि म्हणून सुशीलादेवींच्या आग्रहावरून आणि स्वतःच्या प्रेरणेनें मी आपल्याकडे आलों आहें. आम्हां सर्वांची तीव्र इच्छा आणि कळकळीची तुम्हांला विनंति आहे कीं, मागें काय झालें असेल तें विसरून जा आणि आपल्या सर्व्हिसचा आमच्या संस्थेला लाभ द्या."

दरवाज्याच्या बाहेर पडेपर्यंत गोपाळरावांच्या बोलण्यांत खळ पडला नव्हता ! गोपाळरावांना दारापर्यंत पोंचवून गौरीबाई परत आल्या.

त्यांची व शंभुरावांची दृष्टादृष्ट झाली !

कुणी कुणाशीं शब्दानें बोललें नाहीं! परस्परांचे डोळे परस्परांशीं बोलत होते.

× × ×

" काय! अजून जागंच असायचं वाटतं!" सहानुभूतीपर स्निग्ध आवाजानें गौरीबाईंनीं शंभुरावांना विचारलें.

होय, शंभुराव कितीतरी रात्र झाली होती तरी अजून जागेच होते. अंथरुणावर आडवेसुद्धां झाले नव्हते—बसून होते.

आणि गौरीबाईंची तरी स्थिति काय होती!—

त्यांना झोंप येत नव्हती. त्यांचें शंभुरावांच्याकडे लक्ष्य होतें. स्वस्थ पडल्यानें कदाचित् दोघांचाहि डोळा लागेल या कल्पनेनेंच त्या आतांपर्यंत स्वस्थ होत्या. पण जेव्हां स्वतःलाहि अगदींच झोंप येईना आणि पतीची स्थिति तीच आहे असें त्यांना वाटलें, तेव्हां त्यांना आतां स्वस्थ राहवेना. त्यांनीं उठून उशालगतचा दिवा चेतवीत पहिला प्रश्न केला, " होय!— अजून कां जागायचं?"

गौरीबाईंनीं दोनदां एकच प्रश्न केला तरी उत्तर न मिळाल्यानें त्या लगेच खट्टू झाल्या. चैन तर पडेना आणि पुन्हां विचारण्याचा त्यांना धीरहि होईना; पण पुन्हां त्यांनीं जीव मुठींत धरून शंभुरावांकडे पाहिलें— निकरानें विचारण्याचा संकल्प केली. या वेळीं शंभुरावांनीं त्यांच्याकडे पाहिलें आणि घोगऱ्या आवाजांत म्हटलें, " कशाला उगाच दिवा लावलास—बरा अंधार होता तोच!"

गौरबाई कांहींच बोलल्या नाहींत. त्या नुसत्या त्यांच्याकडे पहात राहिल्या.

" या दिव्यानें या जागेंतला अंधार घालविला " शंभुराव कांहींसें तोंडांतल्या तोंडांतच पुटपुटले, " पण यानें डोक्यांतला अंधार कसा नाहींसा होणार!—"

" कांहीं वेळ तसाच स्तब्धतेंत गेला.

" गौरीबाई तर घाबरल्याच. टच्कन् त्यांच्या डोळ्यांत पाणी आलें. " हें काय बरं हें असं!"—इतकेंच त्या कशाबशा म्हणाल्या. पुढें

त्यांच्या तोंडून शब्दच फुटेना. त्यांच्या मधुर स्पर्शानें, डोळ्यांतल्या पाण्यानें आणि करुणापूर्ण ‘ हें काय बरं असं हें ! ’ या मंत्रानें खरें म्हटलें तर शंभुरावांच्या डोळ्यांतून अश्रूंचा पूर लोटायला पाहिजे होता; पण तसें झालें नाहीं. त्यांच्या डोळ्यांतील पाणी अगोदरच आटून गेले होते-मग डोळ्यांत अश्रू येणार कुठून !

“ ऐकायचं का—मी उद्यां त्या संस्थेंत नोकरीकरितां जाणार नाहीं. मला काय करायची आहे ती संस्था ! ”

“ असं म्हणून कसं चालेल ! संस्थेकरितां नसलं तरी आपल्या संसाराकरितां जाणं भाग आहे. आपला संसार चालविण्याचं सामर्थ्य माझ्यांत नसलं तरी तुझ्यांत आहे, याचा मला आनंद आहे. तुला उद्यां तिकडे गेलंच पाहिजे- ”

“ असें जर आहे, तर मग कसला विचार करायचा ! जिवाचा संताप कां करून घ्यायचा ! ”

“ तूं उद्यां नोकरीला जाणार म्हणून नव्हे–” शंभुराव त्यांच्याकडे न पाहतांच म्हणाले, तर हातांत बांगड्या भरून उद्यांपासून मला स्वयंपाक–घरांत तोंड खुपसून रहावं लागणार आहे, त्याचा विचार असह्य–उद्यांपासून लाजिरवाणं जिणं जगवण्याकरितां स्वयंपाक–घरांत घुसावं कीं त्या यातनांचा नायनाट करण्यासाठीं आत्महत्त्या करून मोकळं व्हावं–कोणतं खरं, कोणतं खरं–हें माझं मींच ठरवावं ! असें परिस्थितीनें मला घातलेलें कोडें आहे. त्याचा निर्णय मला करतां आल्याशिवाय माझ्या मनाला शांतता येणार नाहीं कीं मला झोंपहि पण लागणार नाहीं ! ”

गौरीबाई हें ऐकून हतबुद्ध झाल्या !



चहाच्या कपबशांची विश्वपरिषद् भरली असतांना हिंदुस्थानमधलाहि एक कपबशांचा पुढारी त्या परिषदेचा प्रतिनिधि म्हणून आपल्या अर्धांगीसह हजर राहिला होता. आपल्या अर्धांगीसह विश्वपरिषदेंत प्रतिनिधित्वाचा मान आपल्याला मिळाला एवढ्यावरच हिंदुस्थानचा हा प्रतिनिधि खुष राहिला नाहीं, तर आलेल्या संधीचा फायदा त्यानें उत्तम प्रकारानें घेण्यास कमी केलें नाहीं. हिंदुस्थानांत चहाच्या कपानें जी कर्तबगारी केली आहे, जो दरारा बसविला आहे, जी छाप ठेविली आहे; आणि 'कर्तुम् अकर्तुम् अन्यथा कर्तुम्' अशी जी आपली शक्ति निदर्शनास आणली आहे, त्या सर्वांचें रसभरित वर्णन या चहाच्या कपानें त्या परिषदेपुढें विस्तृत प्रमाणावर, अस्खलित वाणीनें केलें. आणि मजेची गोष्ट ही कीं, या चहाच्या कपांच्या आखिल विश्वपरिषदेपुढें झालेल्या सर्व भाषणांत ह्या हिंदुस्थानच्या चहाच्या कपाचेंच वक्तृत्व श्रेष्ठ प्रतीचें ठरलें ! असें सांगतात कीं, हिंदुस्थानच्या प्रतिनिधीनें आपल्या व्याख्यानांत दिलेल्या माहितीनें परिषदेंत आलेल्या सर्व जगांतील सर्व देशाच्या, सर्व राष्ट्राच्या, प्रतिनिधींनीं आनंदानें, कौतुकानें, आणि आश्चर्यानें तोंडांत बोटें घातलीं ! कित्येक अहंमन्यांनीं कीं, ज्यांना स्वतःच्या कर्तबगारीपुढें दुसऱ्या कोणाचीहि कर्तबगारी फिकीच असावयाची, अशी त्या वेळेपर्यंत ज्यांची साधारणतः खात्रीच, त्यांनींही निरभिमानतेनें हिंदुस्थानच्या प्रतिनिधीच्या आवेशपूर्ण, सखोल, सार्थ भाषणप्रसंगीं गौरवाच्या टाळया पिटल्या !

हिंदुस्थानच्या या चहाच्याकपानें मिळविलेला विश्वविजय ऐकून कोणाहि हिंदु म्हणविणारास सादर अभिमान वाटेल अशी खात्री आहे ! हिंद्वेतरांनाहि हिंदुस्थानच्या या चहाच्या कपाच्या विजयावरून असें कळून येण्यासारखें आहे कीं, ज्या हिंदुस्थानला अद्यापहि पुष्कळ बाजूनीं मागासलेला म्हणण्यांत येतें, तो हिंदुस्थान संधि दिली असतां जगाच्या पुढें स्वतेजानें असा झळकत राहतो ! हा अनुभव एक चहाचा कप जगाच्या निदर्शनाला आणून देत आहे ! ही स्पृहणीय गोष्ट नव्हे काय !

माननीयांना मान देणें, हें सूज्ञ म्हणविणारांचें आद्य कर्तव्य आहे. त्याप्रमाणें ज्या हिन्दवासी चहाच्या कपानें चहाकपबशांच्या अखिल विश्वपरिषदेमध्यें सर्वतोमुखीं वाहवा मिळविली, त्याला यथाशक्ति व यथामति हिन्दवासीयांनी मान देणें जरूर आहे. आतां परिषदेच्या प्रसंगीं प्रत्यक्ष जे कोणी हजर असतील त्यांनीं त्याचवेळीं हिंदी चहाच्या कपाचा गौरव मनमुराद केला असेल, आणि त्या कपाचें हृदयंगम व्याख्यान कर्णसंपुटांत सांचवून ठेविलें असेल, परंतु ज्यांना तें भाग्य लाभलें नाहीं, त्यांना व्याख्यानाचा रिपोर्ट वाचण्यावरच संतुष्ट झाले पाहिजे, आणि चहाच्या कपाचें मनःपूर्वक अभिनंदन करण्याचें पवित्र कर्तव्य बजाविलें पाहिजे ! रिपोर्टांत व्याख्यात्याच्या सर्वांग सुंदर व्याख्यानकौशल्याची माधुरी उतरणें सर्वथा अशक्य असतें व आहे. तरी पण सारांशरूपानें जें कांहीं रिपोर्टांत मिळेल, त्यावरून चाणाक्ष वाचकांना त्याचा अंदाज खास करितां येईल. तेव्हां हिंदी चहाकपाच्या व्याख्यानाचा सारांशच पुढें देणें बरें.

परिषदेच्या अध्यक्षांची परवानगी मिळाल्यावर हिंदी चहाचा कप व्यासपीठावर जाऊन उभा राहिला. प्रथम त्यानें अध्यक्षांना व आपल्या ज्ञातिबांधवांना सविनय प्रणाम केला. तो व्यासपीठावर येतांच चारी देशांच्या जमलेल्या चहाच्या कपबशांच्या समाजांत, एकमेकांच्या कानाशीं कुजबुज सुरू झाली, " हुश्श हुश्श !" असें मधून मधून शब्द होऊं लागले. कित्येकांच्या चेहऱ्यावर तिरस्करणीय हास्य विलसूं लागलें ! त्या सर्वांचा इत्यर्थ इतकाच दिसत होता. कीं, " या दरिद्याला ही नसती उठाठेव कोणी सांगितली ! अमेरिका, इंग्लंड, फ्रान्स, जर्मनी, जपान, चीन, इजिप्त, इत्यादि ठिकाणचे वैभवशाली प्रख्यात प्रतिनिधि येथें हजर होतें; त्यांना तर हा एक प्रकारचा स्वतःचा उपमर्दच वाटला! या दरिद्री हिंदी कपाला हा उपद्व्याप कशाला पाहिजे ! अशा प्रकारचा क्षणभर गलबला झाला. पण त्यांना न जुमानतां, किंबहुना तिकडे जाणून बुजून दुर्लक्ष करून हिंदी चहाच्या कपानें आपल्या भाषणास सुरवात केली. थोडा वेळ झाला नाहीं, तोंच परिषदेचा हिंदी कपाविषयींचा पूर्वग्रह बदलूं लागला. त्याच्याविषयींची सहानुभूति वाढूं लागली, कौतुक करण्याची इच्छा होऊं लागली.

भाषणाच्या ऐनरंगांत टाळ्या पिटण्याची आपोआप स्फूर्ति स्फूरूं लागली. त्याच अनुक्रमानें सर्व परिषदेला प्रथम दरिद्री, बावळट वाटणारा हिंदी चहाचा कप सर्वांचा अनभिषिक्त राजाच वाटूं लागला. इतकेंच नव्हे, तर तेथल्या तेथेंच कित्येक परदेशस्थ वजनदार, थोर, चहाच्या कपांनीं या हिंदी चहाच्या कपाला सर्वांचा मूर्धाभिषिक्त राजा लवकरच करण्याची वाटाघाटहि चालविली ! असो. या बाकीच्या वर्णनांतच वेळ जायला लागला तर 'मिया मूठभर आणि दाढी हातभर' अशी स्थिति व्हावयाची. कपाच्या ज्या व्याख्यानाकरितां जागा द्यावयाची, ती जागा त्याच्या अवांतर वर्णनानें भरून गेल्यानंतर व्याख्यानाच्या सारांशाचा सारांशसुद्धां देणें कठीण जावयाचें. म्हणून आतां इकडे तिकडे न करतां एकदम व्याख्यानाचा रिपोर्ट द्यावयाला सुरवात करावी हें बरें.

व्याख्याते श्रीयुत हिंदु चहाचे कप म्हणाले:—अध्यक्ष महाराज, आणि परिषदेस जमलेल्या सर्व देशाच्या, सर्व दर्जाच्या बंधुभगिनीनो, आज या चहाच्या कपवशांच्या अखिल विश्वपरिषदेपुढें उभा राहून चार शब्द बोलण्याची परवानगी मला दिलीत याबद्दल प्रथम आपले मनःपूर्वक आभार मानणें माझें परम पवित्र कर्तव्य आहे. मी मोठा पदवीधर विद्वान् नाहीं, श्रीमान् नाहीं, अनुभवी नाहीं तर आपणां सर्वांसारखाच आपल्याच जातीगोताचा, कुलशीलाचा आहे ! आपण जसे जगाच्या पाठीवरील निरनिराळ्या खंडांत निरनिराळ्या देशांत आपली वसाहत करण्याकरितां गेलांत तसाच मीहि हिंदुस्थानांत आपली वस्ती करण्यासाठीं गेलों. आतांपर्यंत आपणा सर्वांचे वसाहतीच्या ठिकाणचें वर्णन ऐकिलें आहे; त्यापेक्षां हिंदुस्थानच्या वसाहतीच्या हकीकतींत थोडासा फरक आहे, आणि तो मनोरंजक आहे, अशी माझी समजूत आहे. मी विद्वान् नाहीं हें आपल्याला प्रथम सांगितलें आहे तेव्हां माझें व्याख्यान, विद्वत्तापूर्ण, काव्यमय, आहे अशा रीतीनें कृपा करून पाहूं नका ! मी बोलणाराही तितका वाकबगार नाहीं, त्यामुळें अडखळलों, घाबरलों, तर कृपा करून हंशा करून, टाळ्या वाजवून मला जास्तच घाबरवूं नका एवढेंच आरंभीं हात जोडून सांगणें आहे. ( हंशा व जोराच्या टाळ्या ! ) पुन्हां आपल्याला हात जोडून विनंति

करतों कीं हंसू नका ! माझा कान जरी तुटलेला असला ( हंशाच हंशा ) तरी मी शक्य तितकें करून माझ्या प्रतिपाद्य विषयाचा मुद्दा सोडणार नाहीं ! परंतु असेंच आपण हंसत राहिलांत, किंवा टाळ्याचा गजर चालविलांत, तर मला बोलावयाचें कांहींच सुचणार नाहीं. आणि काय हवें तें बोलत सुटेन. तर अगोदर मला तसें सांगा. मी बोलूं नये अशी इच्छा आपण दाखविलीत तर मी आपल्या जागीं जाऊन बसतों ! ( व्यासपीठावरून परत जाण्याचा आविर्भाव आणतो. लोक ' बोला ! बोला ! ' म्हणून एकच गिल्ला करतात. ) मेहरबानी करून आपण जर असा मोठा गोंगाट करणार नाहीं, तर माझें भाषण आपणां सर्वांना ऐकावयाला जाईल. ( शांतता व ऐकण्याचें औत्सुक्य. ) मी आपणा सर्वांच्या मानानें सर्व बाबतींत सर्व प्रकारांनींच लहान आहे. आपल्या मागून मला वाटतें—माझी समजूत जर चुकीची नसेल तर कित्येक शतकानंतर मी हिंदुस्थानांत वसाहतीस गेलों आहे. आपण आपल्या वसाहती कायम करून नागरिकत्वांचे हक्क मिळवून कांहीं पिढ्या झाल्यानंतर मग मी हिंदुस्थानांत शिरलों. परंतु सांगण्यासारखी गोष्ट अशी कीं, आपल्या पुण्याईच्या जोरावर अवघ्या दहापंधरा वर्षांतच मीं सर्व हिंदुस्थान देश पादाक्रांत केला आहे ! माझी झपाट्याची मोहीम पाहून हिंदुस्थानवासीयांनीं आश्चर्यानें तोंडांत बोटांच्या ऐवजीं मलाच धरलें ! त्यांच्या मतें माझा झपाटा—कॉलरा, प्लेग, किंवा इन्फ्लुएंझा, याहीपेक्षां जोराचा व कायमचा झाला ! मी लहानापासून थोरापर्यंत, श्रीमंतापासून भिकाऱ्यापर्यंत, सूज्ञापासून मूर्खापर्यंत सर्वांना सारखाच प्रिय व आवश्यक होऊन बसलों आहें. हिंदूना हिंदूंचा देव जितका प्रिय, आदरणीय, पूजनीय, तितकाच मी त्यांना आहे. हिंदूंतील ज्ञात्यांना मी त्यांच्या वेदांत आढळलों—त्यांच्या हृदयांत सांपडलों ( सर्वस्व चाहं हृदिसन्निविष्टाः—इति वरेरकर ) मग ते मला ईश्वराच्या ठिकाणीं कां पहाणार नाहींत ! घरीं, दारी, अशनीं, शयनीं, रतिसुखाचे अवसरीं हिंदु चहाच्या कपाला विसंबत नाहींत ! सुधारलेल्या व पुढारलेल्या सर्व देशांत आज जशी मद्याला राजरोस लोकमान्यता आहे, तशीच मी हिंदुस्थानांत राजमान्यतेबरोबर लोक-

मान्यताही मिळविली आहे! घरांत, चारचौघांत, समाजांत, मुलीबाळींत, लेकीसुनांत, वेळीअवेळीं कोणीही, कुठेंही, माझें घरांत स्वागत करण्यास, माझा सत्कार करण्यास, कोणत्याच प्रकारचा कमीपणा बाळगीत नाहींत. कवि, लेखक, विद्यार्थी, मुत्सद्दी, राजकारणधुरंधर, वर्तमानपत्रकर्ते वकील, डॉक्टर, नौकरचाकर, स्वतंत्र धंदेवाले, गिरणीवाले, हमाल, सर्वांच्या घरीं माझ्याशिवाय पान हलत नाहीं, असें आज जर तुम्ही हिंदुस्थानाकडे पहाल तर तुम्हांला दिसेल, 'चहाची चहा' आज तुम्हांला कुठें पहावयाची असेल तर ती हिंदुस्थानांतच! मुलीबाळी माझ्यावर प्रेमळ गाणीं करतात. आधुनिक विद्वान् पंडीत–ऋषीमुनी माझीं संस्कृत प्राकृत स्तोत्रें करतात. एकपासून दहापर्यंत धडा शिकविण्याकरितांसुद्धां माझ्या साह्याशिवाय तो धडा शिकविण्यास सुगम होत नाहीं! उदाहरणार्थ म्हणून सांगतों, मला तो सर्व पाठ येत नाहीं. येतो येवढांच सांगतों:—"चहा–एके चहा–डबा उघडून पहा! चहा दुणे साखर–ताटांत घेऊन साफ कर! चहा त्रिके कीटली–आज अशी कां वीटली! चहा चौक पाणी-बोलावा अपुली राणी! चहा पंचे ताट–काढा हंटली पामर बिस्किटें! चहा सके चादर–अंथरा ती टेबलावर! चहा सते स्टोह–पेटविला कां पहा!–चहा अठे पाव–आले का पहा राव! चहा नवे दूध–घाला सर्व त्यांत! चहा दाही चमचा-सगळा चहा आमचा" (टाळ्यांचा दोन मिनिटें कडकडाट!!) असो. हीं अशीं काव्यें आमच्यावर होत आहेत. त्याचप्रमाणें मी त्यांना सन्मार्गदर्शक कसा आहे, हें माझ्यासंबंधीं:—

"सुव्यसनीं मार्गाला नेणारा सुष्ट एक चहा"
"याच्या व्यसनीं जडतां मद्यादिक लोक चाखितीच अहा!"

यासारखीं प्रौढ व मजेदार सुभाषितें रचिलेलीं ऐकण्यांत येतात! कवींना माझ्या सानिध्याखेरीज काव्यें सुचत नाहींत, लेखकांना लेखाचें जमत नाहीं, वक्त्यांचा घसा माझ्याशिवाय साफ होत नाहीं. माझ्याविरुद्ध केस चालवावयाची असली तरी किंवा डॉक्टरांना माझ्याचमुळें एखाद्याला रोग जडला असला तर त्यावर उपाययोजना करावयाची असली तरी, अगोदर माझा सादर स्वीकार केल्याखेरीज त्यांना त्या त्या कामाला हातच घालतां येत

नाहीं ! विद्यार्थ्यांना माझ्याशिवाय अभ्यास झेंपत नाहीं, मजुरांना, हमालांना ' च्याई ' खाल्ल्याशिवाय मजुरीला हमालीला त्राण येत नाहीं ! मूल जन्मास येतांच ' ट्यंहां ! ट्यंहां ! म्हणजे चहा ! चहा ! असा माझ्याच नांवाचा उच्चार करूं लागतें ! किंवा इहलोक सोडून जाणारा मानवप्राणी देवाच्या नांवाच्या ऐवजीं, ' हच ! हच ! हच ! ' अशा ज्या उचक्या देतो, त्या माझ्याच नांवाच्या द्योतक होत ! त्याला या जगांतून दुसऱ्या जगांत जावयाचें असल्यामुळें तें जग त्या प्राण्याला सुलटे व हें जग उलटें दिसणें स्वाभाविक आहे ! त्याला अनुसरून 'चहा'च्या ऐवजी " हच ! " अशा नांवाच्या अक्षरांचा उलटा क्रम लागतो ! शिवाय बरोबर आहे कीं नाहीं हें पहावयास तितकी त्या वेळीं त्याला शुद्धि तरी कुठें असते, (हंशा!)

असो, तर हिंदु कुटुंबांत मी सांप्रत पूर्णपणें मिसळला गेलों आहे. अगदीं त्यांच्यांतला झालों आहे. हिंदुकुटुंबांतील माणसेंच काय पण कुत्रीं, मांजरें, गाई, म्हशी, घोडे, पोपट इत्यादि पशुपक्षांनाही हिंदू मंडळी मोठ्या प्रेमानें व हौसेनें माझा लाभ करून देतात. हें काय मजवरील त्यांच्या अनन्य लोभाशिवाय होईल ! असें असल्यामुळें स्वाभाविकच हिंदूंच्या जिवाशीं जिव्हाळ्याची दोस्ती जमली आहे. हिंदुस्थान माझ्या मुठींत, किंवा मी हिंदुस्थानच्या हातांत, तनु मन धनें उभयतांची गट्टी कालत्रयीं सुटणें शक्य नाहीं. याप्रमाणें हिंदुस्थानांत स्थिर–चर व्यापून आणखी शिल्लक राहिलेला मी राजकीय, सामाजिक, शास्त्रीय, औद्योगिक बाबतींत अग्रेसरत्व मिळविलें असल्यास नवल काय !

कौन्सिलांत काम करण्यापूर्वी किंवा केल्यावर नामदार खासदारांना ' चहापार्ट्यांची ' जरूरी कां लागते ! वरिष्ठ अधिकारी कनिष्ठाकडे कांहीं कामानिमित्त गेला तर कनिष्ठाकडून ' चहाच्या कपाची ' अपेक्षा कां करतो याची चौकशी केल्यास माझें राजकारणांतील महत्त्व सर्वांच्या लक्षांत सहज येईल ! कित्येक सामाजिक सुधारणांचा उपक्रम कोणामुळें झाला ! आज ज्या कित्येक सामाजिक सुधारणा मूर्त स्वरूपांत दिसत आहेत, त्यांचा आधारस्तंभ–प्रवर्तक–प्रचारक कोण ! याचें एकरूप एक उत्तर म्हणजे " चहाचा कप ! " हेंच होय ! जातिभेदविध्वंस, पुनर्विवाह, विवाह

त्यांचा हल्लींचा एजंट कोण? तर हाच 'चहाचा कप!' इराण्याच्या हॉटेलांत राजरोस माझ्यासाठींच सोवळा महाराष्ट्रीय कडकडीत ब्राह्मण शिरतांना पाहिल्यावर आपल्याला हेंच वाटेल. एकादा मुसलमान, ख्रिश्चन, पार्शी, युरोपियन, युरेजिअन, किंवा कोणीही अस्सल कर्मठ ब्राह्मणांच्या घरीं जाऊन एका टेबलावर 'चहा' चाखतात, तें तरी कोणत्या मुद्यावर ! 'पुनर्विवाहा'ची गुप्त मसलत माझ्याचमुळें होते व ठरते, आणि सर्वांच्या अगोदर पुनर्विवाह होणार हें मलाच माहीत असतं. अशी माझी प्रौढीची पण प्रामाणिक समजूत आहे ! आतां विवाह-संबंध ! हे तर काय उघडाउघड माझ्याचमुळें जमत असतात, हें हातांतल्या कांकणाइतकें खरें आहे ! वधूवरांच्या गळ्यांत घालण्याकरितां घ्यावयाच्या माळा अगोदर; "Love me" "Kiss me" "Pick me" "Hold me" इत्यादिकांनीं मला मंडित करून वराला देण्याकरितां मलाच हातीं घेऊन उभ्या असतात ! असो.

मी कांहींसा स्थिरस्थावर होतांच, हिंदुस्थानचा व्यापार वाढविण्याकडे मी लक्ष घालूं लागलों. केवळ माझ्यासाठींच, आप्टिमस, प्रायमस्, ज्युवेल वगैरेंचे 'स्टोव्ह' 'लिप्टन' 'ब्रुकबॉंड' 'ऑरेंजपीको,' "अंबरटिप्स पीकोसूचांग" 'सौभाग्यसुंदरी' 'निलगिरीडस्ट' 'साव्हरीन' 'कर्झन कांगो,' इत्यादि नानाप्रकारचे चहा ! परदेशी साखर, साखऱ्या, हंटली-पामर भटजींचीं ताजीं बिस्किटें, या सर्वांची अमर्याद आयात होऊं लागून हिंदुस्थानच्या व्यापारांत एकदम केवढी क्रांति घडून आली हें वर्तमान-पत्रांच्या वाचकांस निराळें सांगण्याची आवश्यकता नाहीं !

माझा व्यक्तिशः ज्यांचा विशेषप्रकारचा संबंध आला, ज्यांनीं माझ्या स्नेहाची विशेष अपेक्षा केली, माझ्या ठायीं ज्यांनीं इतराहून अधिक भक्ती दाखविली, ज्यांनीं माझीं खरोखर भक्तिभावानें देवालयें (हॉटेलें) स्थापिलीं, त्यांना मी माझ्या प्रेमाचा मोबदला म्हणून धनिक बनविलें. त्यांनीं बऱ्या इस्टेटी कमविल्या, मोठमोठ्या हवेल्या उठविल्या, व संपादन केल्या ! ( पुणें, मुंबईसारख्या ठिकाणीं थोडीफार याबद्दल चौकशी केली असतां माझें म्हणणें खरें असल्याचें कळून येईल. )

मी कांहीं कांहीं बाबी हिंदूंच्या कलानें अमलांत आणतों. व मग पुष्कळशा, किंबहुना मी म्हणेन त्या गोष्टी माझ्या मनाप्रमाणें त्यांच्याकडून करवून घेतों ! उदाहरणार्थ:--तुम्हीं आपापल्या ठिकाणीं आपल्या मूळ स्वरूपांतच वसाहती केल्या. व तुम्हांला त्याला कोणी हरकत घेतली नाहीं. तुम्हांला तशा वसाहती करूं दिल्या, पण हिंदुस्थान कांहींसा पूर्वपरंपरेचा व पूर्वसंस्काराचा अभिमानी आहे, मला मूळ स्वरूपांत हिंदुस्थान स्वीकारणार नाहीं, आपल्या मूळच्या गोल्डन कलरची, मद्याच्या कलरशीं साम्यता आहे, तेव्हां हिंदूंना तें पटणार नाहीं, म्हणून हिंदूंचें आवडतें पेय जें दूध, तें मी माझ्यांत मिसळून घेतलें. तसेंच माझी मूळची कडवट चव हिंदूंना हितकर वाटणार नाहीं, त्यामुळें, स्वीकाराबरोबरच ते माझा तिरस्कार करतील, हें मला माहीत झाल्यामुळें मीं साखरेशीं संगनमत केलें. दूध व साखरेच्या मिश्रणानें मी हिंदूना मनापासून आवडूं लागलों. चहा व साखर यांच्या संगतीनें माझा जातस्वभावही लोपविण्यासारखा नव्हता ! मी Stimulent असल्यामुळें माझी पक्कड एकाद्यावर बसली कीं, कायमचीच ! त्यांत हयगय नाहीं ! ह्या सर्वांमुळें मला आतां असा खात्रीपूर्वक भरंवसा वाटूं लागला आहे कीं आतां हिंदुस्थानांतल्या दारूबाजीची दारू सुटेल, एखादेवेळीं हिंदुस्थानांतील परकी सत्तेला पळ काढावा लागेल; पण मी मात्र हिंदुस्थानावर यावच्चंद्रदिवाकरौ सत्ता चालविणारच !

अशा प्रकारची क्रांति आपणां सर्वांच्या कृपेनें मीं हिंदुस्थानांत करून ठेविली आहे. आपल्या कुळांत जन्माला येऊन कुळाचें नांव अजरामर होईल, अशी माझी वर्तनपद्धति आहे. यापेक्षांही अगणित चमत्कार मला करून दाखवावयाचे आहेत. आपली अशीच कायम कृपा मजवर असेल, तर मी इष्ट ती सुधारणा घडाडीनें घडवून आणीन, अशी मला उमेद आहे. मी जें केलें आहे तें कोणाला करून मोठेपणा मिळविण्यासारखा असेल तर त्यानें तो खुशाल मिळवावा; म्हणून मी अशाप्रकारचें विस्तृत विवेचन केलें आहे. आपणाजवळूनही कांहीं नवीन ऐकण्यासारखें व आचरणांत आणण्यासारखें असल्यास मी तें अवश्य ऐकेन व करीन. इतकें सांगून

व माझें लांबलचक भाषण शांतपणें ऐकून घेतल्याबद्दल पुन्हां एकदां आभार मानून आपली रजा घेतों. ”

हिंदुस्थानचा कप हें आपलें भाषण संपवून खालीं बसतांच, चौंहीकडे टाळ्यांचा कडकडाट झाला. जिकडे तिकडे ‘ वाहवा ! वाहवा ! शाबास ! धन्य ! धन्य ! ’ इत्यादि उद्गार निघाले. या चहाच्या कपावर दहापांच सेकंदपर्यंत फुलांची वृष्टि झाली.

नंतर थोड्या वेळानें अन्य देशीय एक चहाचा कप प्लॅटफॉर्मवर आला व त्यानें हिंदु-चहाच्या कपाचें जाहीर अभिनंदन केलें; पण त्याबरोबर त्यानें एकदोन शंकित असे मुद्दे काढून त्याचें निराकरण हिंदु-कपानेंच आपल्या रसाळ वाणीनें करावें, अशी विनंती केली. शंकेचे मुद्दे असे होते कीं, हिंदुस्थानांत चहाचें उच्चाटण करूं पाहणारा वर्ग तयार झाला आहे. ‘ चहाचें बंड ’ आहे, व तें निःशेष झालेंच पाहिजे, असें त्या वर्गाला वाटत असून, तो चळवळीच्या रूपानें चहाला प्रतिबंधक उपाय योजीत आहे. कित्येक वेळीं, चहाच्या गुत्त्यावर पिकेटिंग करीत असतात, असें वर्तमानपत्रांतून वाचावयाला मिळतें; तें खरें काय ! ’ तें खरें असेल तर त्यासंबंधानें चहाचे कप याचा काय विचार करतात ! या शंकांचें निरसन आमच्या हिंदुस्थानच्या कपानें थोडक्यांत पण गोड रीतीनें करावें.

“ आपल्याला वर्तमानपत्रांतून ऐकायला मिळतें त्याची किंमत वर्तमानपत्रापुरतीच असतें, हें आपण विसरूं नये. जगांत कांहीं लोक असेही असतात कीं, चांगल्यांचें चांगलें त्यांना पहावत नाहीं. हा वर्ग हिंदुस्थानांतही आहे. पण अल्पसंख्यांक आहे. त्याची भीति आम्हांला वाटत नाहीं. हा वर्ग आमच्या विरुद्ध वर्तमानपत्रांतून, मासिकांतून, मधून मधून लेख लिहितो, ( व्याख्यानांत व्याख्यान देतो, व प्रसंगीं पिकेटिंगचेंही प्रदर्शन करतो ! ) पण तें सर्व फोल असतें. हे सर्व वीर हे सर्व करितांना अगोदर माझा मनमुराद प्रसाद घेतात, व कार्याला लागत असतात ! कोणी तितकाच कठोरपणानें मजकडे पाहूं लागला, तर त्याला कह्यांत आणण्या-साठीं मी त्यावेळीं त्यांच्यापुढें न जातां माझ्या अर्धांगीला त्याच्या ओठाचें चुंबन घ्यावयाला त्याच्या पुढें करितों ! परस्त्रीच्या अधराचें चुंबन घेण्यांत

पुरुषार्थ मानणारा तो हरीचा लाल, तदनंतर माझ्याविरुद्ध बोलावयाला किंवा लिहावयाला कोणत्या तोंडानें किंवा कोणत्या लेखणीनें धजणार ! आपण असें खास समजा कीं, वर्तमानपत्रांत ज्याचें नांव 'चहा सोडला' या सदराखालीं आलें, तो पहिल्यापेक्षां दसपट चहा घ्यावयाला लागला आहे ! जो 'चहाचें बंड' म्हणतो, तोच या बंडाचा फैलाव करावयाला उत्तेजन देतो, हें बिनदिक्कत ध्यानांत बाळगा. शिवाय मी मद्याप्रमाणें निषिद्ध नाहीं, क्रूर नाहीं, मद्याप्रमाणें एकाद्याच्या घरादारांचें–मुलांमाणसांचें हां हां म्हणतां वाटोळें करणारा नाहीं; हें हिंदूंना माहीत झालें आहे. त्यांना मारायचें झालें, तरी त्यांच्याच कलानें, त्यांच्याच समजुतीनें, त्यांच्याच बेतानें हलकें हलकें त्यांना न कळतां त्यांचें अन्न कमी कमी करून, त्यांचा आयुर्दाय कमी करीत असतों, त्यांच्यापेक्षां त्यांची पुढची पिढी निःसत्व, अल्पायुषी करीत असतो, हें ते काय जाणून नाहींत ! मारावयाचें झालें तरी गोडीगुलाबीनें हंसत हंसत, व सशास्त्र 'चहा मारतो' इतका सदय शत्रु हिंदूंना चहा-शिवाय आज कोण मिळाला आहे ! बरें त्यांतूनही कांहींची निकराची इतराजी झाली, तर माझ्या या संकटकालीं, आणिबाणीच्या वेळीं मी ज्यांना आतांपर्यंत घरेंदारें बांधून दिलीं आहेत, ज्यांना, व ज्याच्या कुटुंबाला वैभवाच्या शिखरावर चढविलें आहे, तसेंच ज्याचे प्रेमाचे पुनर्विवाह, विवाह जुळवून प्रीतीचे संसार थाटून दिले आहेत, ते ऐनवेळीं माझ्या साह्याला आल्या-खेरीज कसे राहतील ! तेव्हां मला कसलाच धोका नाहीं, व भीति नाहीं. आतां बहुसंख्याक अडाणी समजला जाणारा मजुरांचा वर्गही जागा झाला आहे. नित्य व्यवहारांत आदरातिथ्यांत, शिष्टसंप्रदायांत आगत–स्वागत प्रसंगीं, पाहुण्यांच्या पाहूणचारांच्या वेळीं, एकाद्याकडून फुकटांत काम करून घेण्याच्या वेळीं, माझें महत्त्व काय, माझी करामत काय–हें ज्यांच्या प्रत्ययाला आलें आहे, ते मला कोणत्याही कारणानें दूर काय म्हणून लोटतील ! अशी एकंदरींत वस्तुस्थिति आहे ! आणि जोपर्यंत माझ्या मध्यस्थीनें प्रेमळ जोडपीं विवाहपाशांत बद्ध होताहेत, जोपर्यंत तरुण खट-पट्या लटपट्यांना माझ्यामुळें अर्धवट मनाच्या पण गडगंज श्रीमंतीच्या श्रीमंतांना धनाच्या बाबतींत मनसोक्त लुबाडतां येत आहे, तोंपर्यंत मला,

हिंदुस्थानांतून माझें चंबुगवाळें उठवावें लागेल, अशी स्वप्नांतही कल्पना येत नाहीं ! आपण निर्धास्त असा ! माझी सर्व मदार तरुणांवर आहे ! माझें तेज कमी व्हावें, मला महत्त्व राहूं नये, म्हणून मजविरुद्ध चळवळ्यांनीं ' कॉफी–कोको, टिळकपेय, गांधीपेय ' वगैरे पुष्कळ पेयें काढलीं पण त्या बिचाऱ्यांचें मजसारख्या Stimulant पुढें काय चालणार ! लोकमान्य टिळक, महात्मा गांधी, इत्यादि महात्म्यांकडेही मजविरुद्ध तक्रारी केल्याचें मी ऐकलें होतें. पण खुद्द टिळकांच्या जवळ माझें प्रस्थ होतें, व महात्माजींसारखा महंत मजसारख्याच्या जीवितावर काय म्हणून उठेल ! मग महात्माजी अहिंसेचें चाहते उपासक कसले ! एकूण मला केव्हांच, कुठेंच व कधींच भीति नाहीं ! माझी सत्ता निराबाध आहे ! माझ्या प्रथमच्या भाषणांत थोड्याशा दुर्लक्षपणानें जे मुद्दे चुकून राहिले ते माझ्या बंधूनें शंका काढून मजकडून वदविले; याबद्दल त्यांचे व त्याबरोबर पुन्हां एकदां सर्वत्रांचे आभार मानून मी खालीं बसतों.

पुनःपुन्हां चहाच्या कपाचा जयजयकार झाला. सर्व परिषदेंत हिंदु-चहाच्या कपालाच श्रेष्ठत्व मिळालें. कित्येक दिवस कित्येक वर्तमानपत्रांतून हिंदु-चहाच्या कपाचीं स्तुतिस्तोत्रें येत असत ! अर्थात् कां नाहीं येणार कारण त्यानें आपल्या मुखानें सांगितलेला त्याचा पराक्रम काय खोटा आहे !

हिंदु तरुणांनो, आपल्या ताज्या सामर्थ्यावर चहाचा कप केवढें बळ बांधून बसला आहे, पाहिलेंत ! काय ! इतिशम्

---

## बाबू ड्रायव्हर ! : : : ८

"बाबू, बाबू, ए बाबू-अरे-ए—"

"शेटसाहेब!"

"आलास! ठीक, तुला मलबारहिलवरचा 'विश्राम व्हीला' माहीत आहे. तिथें काल ग्वालेरचे श्रीमंत सरदार जयसिंगराव आले आहेत. त्यांचा ड्रायव्हर आहे अजारी. त्यांना चार दिवस ड्रायव्हरची जरूरी आहे. त्यांनीं माझ्याकडे मागणी केली आहे. तेव्हां—"

"पण शेटसाहेब, आयत्या वेळेला कोण ड्रायव्हर-!" बाबूला वाटलें आपल्याला नवा ड्रायव्हर पाहून ताबडतोब दे असें आपल्याला शेटसाहेब म्हणताहेत. म्हणून जरा गोंधळूनच तो म्हणाला.

"तसें नव्हे रे!" शेटसाहेब त्याचा गैरसमज दूर करीत म्हणाले, "मी तुलाच सांगणार आहे त्यांच्याकडे जायला!"

बाबू त्यांच्याकडे वर मान करून नुसताच पाहूं लागला.

"पाहतोस काय माझ्याकडे असा!" बाबूची मनस्थिति त्यांच्या लक्षांत आली. ती ओळखून ते म्हणाले, "आपलं काम सोडून कसं जातां येईल, म्हणून तूं गोंधळलास ना! मी आठ दहा दिवसांकरितां जाणार आहें दिल्लीला. घरीं मुलांमाणसांची चार दिवस गैरसोय होईल, पण ती सोसली पाहिजे. जयसिंगराव माझे स्नेही आहेत. त्यांनीं मला शब्द टाकला आहे. त्यांचा शब्द खालीं पाडणं मला बरं दिसणार नाहीं. शिवाय तशी थोडीशी तुला माझ्या गैरहजेरीमुळें सवडहि देतां येण्यासारखी आहे. म्हणून जयसिंगरावांच्या दिमतीला तुलाच देणं भाग आहे—"

बिचारा बाबू काय सांगणार! मालकांचा हुकूम मानणें त्याला भागच होतें. परंतु अजूनहि तो बोलत नाहीं हें पाहून शेटसाहेब हंसत म्हणाले, "कारे, तुझ्या मनांतून जायचं नाहीं वाटतं! वेड्या! मी तुला त्यांच्या-कडे कायमचाच नाहीं धाडीत. तुला काय वाटलें, तुला कांहीं तरी निमित्त काढून घालवून देतों असें म्हणून! नाहीं हं. मी तुझ्यासारख्या चांगल्या

माणसाला केव्हांहि सोडणार नाहीं. समजलास ! तूं आमचा आहेस. काय वाटेल तें झालें तरी मी तुला कोणाला नेऊं देणार नाहीं. सोडणार नाहीं. अरे, ही तात्पुरती स्नेह्याची वेळ निभवायची आहे !—"

इतक्यांत पुन्हां घंटा वाजली. फोन आला. जयसिंगरावांचा तो फोन होता. तांतडीनें ड्रायव्हरला पाठविण्याबद्दलच तो फोन होता.

" चल. चपळाई कर. कपडे कर आणि ट्रॅम पकड अगोदर. " शेट-साहेब घाई घाईनें बाबूला म्हणाले.

" हं उभा राहूं नकोस. जा. जा. पहिल्यांदा ड्रायव्हरला पाठविला आहे म्हणून आतांच त्यांना फोनमधून कळवलंय ! जा–जा "

शेटसाहेबांची आज्ञा बाबूनें मान्य केली. तो लगेच जयसिंगरावांच्या 'विश्राम व्हीला' वर जायला निघाला. जातांना तो तसा कांहीं रंजिस दिसला नाहीं. थोडासा आनंदांतच दिसला. मग काय जातांना त्याच्या शेटसाहेबांनीं त्याला 'हुषार, विश्वासू, ड्रायव्हिंगच्या कामांत तरबेज, चांगला माणूस, आपला माणूस, या शब्दांनीं गौरविलें होतें, तेंच त्याच्या मनांत घोळत होतें त्याचाच त्याला आनंद होत होता कीं काय कोण जाणें ! आणि तसें असल्यास, त्यांत अस्वाभाविक तरी काय होतें ?

बाबू विश्रामव्हीलाकडे गेला.

× × ×

शेटसाहेबांच्याकडे कांहीं नाहीं म्हटलें तरी बाबूला राहून पांच सात वर्षें होऊन गेलीं असावींत. त्यांच्याकडे तो प्रथम मोटरड्रायव्हर म्हणूनच आला. आणि त्याला मोटरड्रायव्हरच म्हणून ठेवण्यांत आलें. एरव्हीं कामाव्यतिरिक्त मालकाला नोकराची आणि नोकराला मालकाची परवा नसते. मालक नोकरांकडून काम चोपून घेण्याच्या धडपडींत असतो, तर नोकर शक्य तितका कामाला चुकारपणा करून दामाला बिनचूक हात पुढें करायला हजर राहतो. मग नोकर मालकांत तेढ कां राहणार नाहीं ? अन्यत्र कसेंहि असलें तरी शेटसाहेब आणि त्यांचा बाबू हे परस्परांस पटले होते. आवडले होते. शेटसाहेबांना तो पसंत झाला होता. बाबूला शेटजींच्या घरचेच आपण एक आहोंत असें वाटत असे–तसा तो वागत असे तरी, निदान गाडींत शेटसाहेब बसले असले आणि बाबू गाडी चालवीत असला

म्हणजे बाबू सावधानतेनें—काळजीपूर्वक आणि कौशल्यानें आपलें काम करी. शेटसाहेब त्याच्या कामाच्या सफाईकडे—चातुर्याकडे पाहून अत्यंत आनंदित होत असत. त्यांच्या मनांतही ‘ काय ही एखाद्याला अशी कला साध्य होत असते पहा ! आपल्या पदरीं बाबूसारखा आपल्या कलेंत निष्णात असणारा नोकर असावा ही गोष्ट आपल्या वैभवाला साजेशीच आहे असें म्हटल्यास काय हरकत आहे ! असे बाबूसंबंधानें विचार न येण्याइतके शेटसाहेब विचित्र नव्हते !

हें जसें, तसेंच त्या निर्जीव यंत्रालाहि—बाबू आपल्या दिमतीला आहे, असें वाटलें म्हणजे चालण्यांत, धांवण्यांत, त्या यंत्रालासुद्धां विशेष स्फुरण आल्यासारखें वाटे; असा किती लोकांचा तरी समज होता.

शिवाय हा बाबू ड्रायव्हर म्हणजे—आजकाल ‘ ड्रायव्हरची जात ’ म्हणून जी एक निर्माण झाली आहे, त्या जातींतला नव्हता ! घाणेरडे खाकी कपडे अंगावर चढवायचे—कसला तरी बूट पायांत असायचा—डोईवर केस वाढविलेले असायचे—तोंडांत पानतंबाखूचा चोथा चघळीत असायचें—वाटेल तिथें पचदिशीं थुंकायचें, आणि दुकानाच्या फळीवर पाय ठेवून जाणाऱ्या येणाऱ्या स्त्रियांकडे बाष्कळपणानें पहात, हिडीस कोट्या करीत सभोंवतालच्या आपल्यासारख्याच सोबत्यांच्या हातावर टाळ्या देत किंवा पाठीवर थाप देत फिदीफिदी हंसावयाचे; गलिच्छ हॉटेलांतच चहाभज्यावर ताव मारीत, आपल्या एजंटस्, किन्नर (!)—क्लीनर—बरोबर पिवळ्या हत्तीच्या सिगारेटचे भपकारे सोडीत क्षुल्लक कारणावरून हुज्जत घालीत बसायचे; अम्मलपाणी करून रात्रीं अपरात्रीं ‘ तमाशा ’चीं थिएटरें धुंडाळीत किंवा त्याहूनहि दुर्गंधयुक्त ठिकाणीं हिंडत रहावयाचे—आणि अशा रीतीनें वागण्यांतच भूषण मानावयाचें; अशा जातींतला—अशा प्रकारचा बाबू नव्हता. त्याला तें जग माहीतच नव्हतें. आणि नव्हतें तेंच ठीक होतें.

जेव्हां शेटसाहेबांनीं बाबूला हांक मारून जयसिंगरावांच्याकडे जाण्यासंबंधीं फर्मान सोडलें तेव्हां त्याला वाईट वाटलें आणि त्याची समजूत करून, पाठ थोपटून, त्याच्या अंगच्या गुणांचें वर्णन करून त्याला आपण

कायमचें पाठवीत नाहीं, असें सांगितलें तेव्हां बाबूला आनंद झाला आणि तो जयसिंगरावांच्या बंगल्यावर जायला तयार झाला.

बाबूसारखा गुणी माणूस आपल्या पदरीं आहे, हें अनुभवानें जयसिंगरावांना कळलें म्हणजे, आपल्या मोठेपणांत आणखी भर पडेल, आणि बाबूचीही 'वाहवा' होईल, ही शेटजींना खात्री होती. तेंही बाबूला त्यांनीं सांगितलें. त्यामुळें तर बाबूला जयसिंगरावांकडे जाण्यास जास्तच हुरूप आला असल्यास नवल काय !

× × ×

नानीबाईचं बाळ रडत होतं, आणि ती गीत गाऊन त्याला झोंप आणण्याचा आणि समजावण्याचा प्रयत्न करीत होती. त्याला कडेवर घेऊन हिंडवलं. पाळण्यांत घालून हालविलं, दूध पाजलं, अंगाई केलं तरी तो राहीना. नानीबाई अगदीं रडकुंडीला येण्याच्या बेताला आली. आतां काय करावें तें तिला समजेना. हें असें आज चार दिवस झालं होतं. मग बाळाला काय झालं होतं कुणाला ठाऊक. तिनें बाळाला तीट लावली, काजळ घातलं, दृष्ट काढली, देवाला नवस केला, पण नानीबाईच्या बाळाच्या रडण्याला खळ पडेना.

बाळाला पाळण्यांतून काढून नानीबाईनं खांद्यावर घेऊन थोपटीत 'नाहीं–नाहीं–अं—माझ्या बाळाला—छकुल्याला–नाहीं. जारे काऊ–माझं सोनं तें.' म्हणत ती हिंडविण्यासाठीं दारापर्यंत आली. तोंच दारांत पाऊल वाजलं. कानावर शब्द आले. नानीबाईनीं वळून पाहिलें, इकडे बाळाचं तोंड मटकन् मिटकले, त्याचे बाळडोळे आवाजाच्या बाजूला वळले.

'अग बाई !–'

'कां ! बाळ रडत होता वाटतं ! '

चार दिवस झाले. सारखा टाळा पसरला आहे त्यानं, पण आतां कसा गुलाम शब्द ऐकतांच गप्प राहिला ! पण चार दिवस ठिकाणा कुठं होता आपला ! माझा जीव कसा उडून गेला होता. इकडे बाळ रडायला लागला. मला करमेना. घरीं न येण्याचं कारण पण कळेना. होय ! चार दिवस शेटजींनीं येऊं दिलं नाहीं घरीं, असं काय होतं तरी तिकडे ! ''

" चार दिवस मी शेटसाहेबांच्या इथं नव्हतोंच मुळीं " नानीबाई-जवळून बाळाला आपल्याजवळ घेऊन त्याचे मटामट मुके घेत, त्याला हातावर फुलासारखें झेलीत, म्हटलें, " गेले चार दिवस सरदार जयसिंग-रावांच्या दिमतीला शेटनीं मला दिलं होतं. त्यांच्या मोटारीवर होतों. चार दिवसांत जयसिंगरावांनीं मला क्षणाची फुरसद दिली नाहीं तर मी घरीं येणार कसा !—"

" सरदारसाहेब !–हे कुठले सरदार आणखी–! " नानीबाई अर्ध-वट पुटपुटली.

" ती सारी हकीकत सांगतों आतां. अगोदर झकास चहा कर. मग एकेक गमती सांगतों. एकेक गमती दाखवितों " बाबू अगदीं खुषीत होता. आनंदाच्या भरांत बायकोशीं बोलत होता. "हं चल, बाळाची काळजी नको. तो माझ्याजवळ आहे. रडायचा नाहीं तो आतां."

नानीबाई चहाच्या तयारीला लागली. तिचा चहा चालू असतांच बाबू तिला सांगत होता, " ग्वालेरचे सरदार जयसिंगराव आहेत. फार चांगला सरदार, सरदारणिबाई पण तशाच आहेत. बोलणं काय, वागवणं काय, माझ्या कामावर तर ते दोघे इतके खूष झाले कीं कांहीं पुसूं नकोस !"

" खरेंच ! " अशा अर्थी हंसत फक्त नानीबाईनें बाबूकडे पाहिलें.

" हं, मग, पुढें काय !" अशी मूकपृच्छा तिनें केली.

" शेटजी मला म्हणाले तेव्हां मला जाणं बरं वाटलं नाहीं. पण आतां वाटतं, गेलों हें ठीक झालें. या प्रसंगानें थोरामोठ्यांच्या ओळखी झाल्या. आपलं कसब त्यांना दाखविण्याची संधि मिळाली. माझं मोटरड्रायव्हिंग सरदार—सरदारीणबाईंना फारच आवडलं. सरदार हजार वेळां म्हणाले, ' असा ड्रायव्हर आपल्या पदरीं पाहिजे. ' बाबू बेहोष होऊन बायकोजवळ चहाचे घुटके घेत, आणि त्या बाळाला मांडीवरच हलवीत सांगत होता, ' शेवटीं त्यांना रहावेना. त्यांनीं मला विचारलंसुद्धां, कीं तूं आमच्याकडे येतोस कां ? त्यांनीं माझ्यासंबंधानें माहिती विचारली. कांहीं टिपून घेतलं. आज जातांनासुद्धां तूं आमच्याकडे येच, असें मुद्दाम त्यांनीं आग्रहानें सांगितलं. "

हें ऐकून नानीबाईलाहि फार फार बरं वाटलं. आपल्या नवऱ्याचा मोठेपणा ऐकून कोणत्या स्त्रीला आनंद होणार नाहीं ! नवराबायकोचा तो दिवस अतीशय आनंदांत गेला.

स्वयंपाक करतांना, जेवतांनाच काय, पण बाबू, शेटजींच्या बंगल्यावर जायला निघेपर्यंत त्याच त्याच गोष्टी नवराबायकोंत चालल्या होत्या.

" मुंबई सोडून ग्वालेरला जायचं कां ! " नानीबाईनं विचारलें.

" कां जाऊं नये !"

" इतकं दूर ! "

" त्या शिवाय आपलें भाग्य कसं उदयाला येणार !"

" पण शेटजींचा आपल्यावर लोभ आहे. ते आपल्याला कसें सोडतील !"

' आपणच त्यांना सोडणार ' नाहींतर शेटजी काय माझ्या जन्माला पुरणार आहेत ! देशावरून जसे मुंबईला आलों, तसेंच मुंबई सोडून ग्वालेरीवर स्वारी करायची ! "

" मला बाई कससंच वाटतं ! "

" त्यांत काय कससंच वाटायचं ! जिकडे माणसाची चलती होईल तिकडे गेलंच पाहिजे. शिवाय मी कांहीं आपण होऊन सरदारसाहेबांच्या मागें लागलों नाहीं. माझ्यावर खूष होऊन त्यांनीं बोलावलं आहे. माझी खात्री आहे कीं, शेटजींच्यापेक्षां ग्वालेरला गेलों तर सरदारसाहेबांच्याच पदरीं आपली भरभराट होईल. माझ्याप्रमाणंच तुला थाटामाटांत राहतां येईल. आपणापेक्षांहि आपला बाळ तिकडेच आपलं चांगलं नशीब काढील. तुला नाहीं असं वाटतं ! "

त्या काळयासांवळ्याच पण गुटगुटीत गोंडस भिरभिरत्या डोळ्याच्या बाळाकडे दोघांची दृष्टि एकदम गेली. आतां तो गोड हंसत होता. दोघांनाहि वाटलं आपला बाळ ग्वालेरीसच नशीब काढणार ! नानीबाईला तिकडे जावं असं वाटूं लागलं. बाबूचा तर तसा निश्चयच झाला.

जो बाबू शेटजींनीं प्रथम सांगितलें तेव्हां सरदारांच्याकडे जायला तयार नव्हता, तोच यक्षिणीची कांडी फिरल्याप्रमाणें चार दिवस त्यांच्या दिमतीला जातांच त्याचें इतकें मतांतर झालें.

पुढें काय करायचं याबद्दल आणखी नवराबायकोचं बोलणं होऊन त्या दिवशीं तरी बाबू शेटजींच्याकडे कामाला गेला.

x x x

तो महिना तसाच गेला. शेटजींच्याजवळ कसें सांगावें याचा बाबूला जरा विचार पडला. पण जाण्याचें त्याच्या मनानें एकदां पक्कें घेतल्यामुळें शेटजींच्या इथलें त्याचें मन उडालें. खरें सांगितलें तर शेटजी सोडणार नाहींत. अडवून ठेवतील, रागावतील अशी त्याला भीति वाटली. म्हणून त्याच्या कोत्या बुद्धीनें त्याला खोटें बोलणाची सल्ला दिली. महिन्याचा पगार घ्यायच्या वेळीं तो शेटजींच्या पुढें धाडस करून, जाऊन उभा राहिला-त्यानें खालीं मान घालूनच पण धीर करून सांगितलें—

" मी नोकरी सोडून देशावर शेतवाडी करायला जाणार आहे ! मला परवानगी द्यावी. "

शेटजी त्याच्याकडे आश्चर्यानें पाहूं लागले. त्यांनीं त्याला हजार प्रश्न केले. पण त्याचें उत्तर एकच. शेटाणिला समजलें. त्यांच्या मुलांबाळांना समजलें कीं बाबू आपल्या इथून नोकरी सोडून जात आहे ! सर्वांनीं त्याला राहाण्याचा आग्रह केला.

बाबू खालीं मान घालून उभा होता. त्याचें तोंड वाईट झालें होतें. सर्वांचा अगदीं नाइलाज झाला. त्याला कां वाईट वाटत आहे, कदाचित् नाइलाज म्हणून आपल्याला सोडून जावें लागत असल्यामुळेंच त्याला वाईट वाटत असावें, अशीच शेटजींची समजूत झाली असावी. एरव्ही शेटजींना दुसरी कसलीच शंका नाहीं. त्यांना शंका येऊं नये अशीच मुळीं बाबूनें त्यांच्या समोर थाप मारली होती.

निरुपाय होऊन शेटजींनीं शेवटीं बाबूला जायला परवानगी दिली. त्याचें पगारपाणी चुकतें केलें. आणखी आपली त्याला आठवण रहावी म्हणून बक्षिसादाखल बरीचशी रक्कमहि दिली. शेटाणीनेंहि आपल्या परी त्याची संजोगणा केली.

बाबू सर्वांचा निरोप घेऊन देशाला—देशांतराला निघाला.

जाण्याचें खरें कारण शेटजींना कळलें असतें तर त्यांनीं बाबूला अनु-

भवाच्या–उपदेशाच्या गोष्टी समजावून सांगितल्या असत्या का ? सांगितल्या असत्या तरी त्याला पटल्या असत्या का ?——कोणी सांगावें, काय झालें असतें तें !

घरीं येऊन नानीबाईला बाबूनें शेटजींच्या नोकरीला रामराम ठोकल्याचें सांगितलें. मोठ्या फुशारकीनें झालेली हकीकत सांगितली. खरा थांगपत्ता न लागूं देतां आपण कोणती लोणकडी ठेवून दिली हेंहि सांगितलें. नानी-बाईला बरेंही वाटलें आणि वाईटही वाटलें. आपणाला मोठ्या रोजगारावर जायला मिळणार म्हणून बरें वाटलें. पण वाईट कां वाटलें, हें मात्र तिचें तिलाच कळेना ! बाबू मनाच्या उतावळेपणानें कांहीं तरी करीत आहे. असा पोक्त विचार करण्याचें तिचें वय तरी होतें कां ? तिला तसा विचार असतां तर तिनें बाबूला कदाचित् घाई करूं दिली नसती. आणखी कांहीं दिवस तरी विचार करूं दिला असता. हातचें सोडून पळत्याच्या पाठीं लागणा-राच्या नशिबी एखादेवेळीं फसगत होण्याचाहि संभव असतो. हें तिला तरी कुठून माहिती असणार ! पण तिला वाईट वाटलें इतकें खरें. आणि म्हणून ती त्याला म्हणाली, ‘ मग जायच्या अगोदर एकदां देशावर आपल्या गांवांला तरी खरेंच जाऊन येऊं या. गांवच्या देवीच्या पाया पडूं; बाळाला पायावर घालूं. चार दिवस राहूं. आपल्या शेताची कांहीं व्यवस्था करूं. आणि मग जाऊं. बाबूला बायकोचा विचार पटला. त्यानें कबूल केलें. त्यालाहि आपल्या गांवच्या ओळखीच्या लोकांच्यापुढें आपणांस मिळणाऱ्या बड्या रोजगाराचा दिमाख दाखवावयाचा होता.

लगेच मुंबईचें चंबूगबाळें गुंडाळून बाबू सहकुटुंब देशावर आला.

त्याचे गांवीं हां हां म्हणतां महिना दोन महिने निघून गेले.

ग्वालेरास ‘ येणार ! येणार ’च्या जाहिराती बाबूनें पत्र पाठवून सरदारां-कडे लावल्या. त्यांच्याकडे जायचें म्हणून साजतील शोभतील असे स्वतःला बरेच कपडे केले. नानीबाईला लुगडीं घेतलीं. बाळाला सरदारपुत्र दिसेल असें नटविलें. त्यांतच त्यानें आपल्याजवळची बहुतेक पुंजी संपविली म्हणा ना !

त्याचें शेत तेथें एका सावकाराकडे गहाण होतें. त्यानें मुंबईस बचत करून त्यांतून थोडी फार त्याची फेडही केली होती. गांव सोडण्यापूर्वी तो आणखी आपणास कांहींतरी देईल अशी सावकाराची कल्पना होती. पण जाण्यास थोडे दिवस उरलें तरी तो कांहींच नांव काढीना, म्हणून नाइलाज होऊन सावकारच त्याच्याकडे ती गोष्ट काढायला आला. हळूंच त्यानें विचारलें, परंतु बाबूनेंच त्याच्याजवळ उलट पैशाची मागणी केली.

सावकाराला प्रथम थोडें चमत्कारिक वाटलें. पण नंतर त्याला काय वाटलें कोण जाणे. त्यानें बाबूची मागणी मान्य केली. त्यानें मागितली ती रक्कम सावकारानें त्याला बिनहरकत दिली.

ग्वालेरला जायचा दिवस निश्चित झाला. तो दिवस उजाडला, बाबू नानीबाई यांनीं सामानाची बांधाबांध चालविली.

कां कोणजाणे नानीबाईला आज उगीचच हुरहूर वाटत होती. ती कांहीं बोलली तर तिच्या तोंडासमोर कुठून तरी पाल चुकचुके !

त्यांतच बाळाला सकाळपासून बरें वाटेना. अंग तापलें तोंड लालभडक झालें. त्यानें एकसारखी रडायला सुरवात केली. पण तिने बाबूला बाहेर कांहीं एक दाखविलें नाहीं. त्याची उमेद कांहीं विलक्षण होती.

अगदीं धांवाधाव करून त्यानें नानीबाई, बाळ, व बरोबरच्या सामानासह स्टेशनवर येऊन आगगाडी तर गांठली !

X X X

' कोन है अंदर मत जाव ! '

फाटकांतच संगीनीवाल्या पहारेकऱ्यानें आंत शिरूं पाहणाऱ्या बाबूला रोखलें.

बाबू जागच्या जागींच थबकला. तो दाढीवाल्या पहारेवाल्यांकडे चमत्कारीक दृष्टीनें पहात राहिला.

बाबूला श्रीमंत सरदार जयसिंगरावांच्या बंगल्याच्या बाहेरच्याच फाटकांत पहारेकऱ्याकडून मज्जाव झाला. प्रथमग्रासे मक्षिकापातच तो ! बाबूच्या त्या पाहण्याचा पहारेवाल्यावर कांहींच परिणाम झाला नाहीं.

किती तरी वेळ तो तेथेंच उभा रहा रहा राहिला. एकाच जागीं घुटमळला. त्याच्या मनानें त्यावेळीं चांगलीच कच खाल्ली. अगोदरच ग्वाल्हेर

जसें जसें जवळ येऊं लागलें होतें, तसें तसें त्याला उगीचच उदास वाटत होते. कुठे भलत्याच प्रांतीं आपण आलों आहोंत, त्यांत बाळाला निघतांनाच बरें नव्हतें कुठें जावें, कुठें रहावें, याची सुद्धां प्रथम त्याला पंचाईतच पडली. तशांतहि मनाची मोट करून कुणाला तरी दीनपणें दादापुता करून माधवगंजांत एकाच्या पडवीला उतरला. जयसिंगरावांच्या बंगल्याची माहिती काढली. शोध करून तो बंगला हुडकून काढला आणि तेथपर्यंत आला, तों त्याला फाटकाचा धक्का बसला. त्याची वाळूवर रचलेली कल्पनेची इमारत एकदम हादरली.

मुंबईस जे सरदार, शेटसाहेबांची चिठी घेऊन गेल्यामुळें त्याला इतकें स्वस्त वाटले होते, ते आतां त्यांच्या बंगल्याच्या फाटकांत येऊन त्याला महाग झाले. दर्शनाला दुर्लभ झाले !

त्या दिवशीं थोडासा खट्टू होऊन—नाइलाजानें तसाच बिऱ्हाडी परतला त्याच्या तोंडावर प्रसन्नता न दिसल्यानें नानीबाई जरा मनांत चरकलीच. तरीपण थोड्यावेळानें तिनें हलकेंच ' काय झालें ?' हा प्रश्न केला. ' आज भेट झाली नाहीं ' एवढेंच त्यानें उत्तर दिलें.

दुसऱ्या दिवशीं जेवण उरकून नव्या उमेदीनें सरदारसाहेबांच्या बंगल्या-वर बाबू दाखल झाला. आज पहारेवाला बदलला होता. नम्रपणानें त्याला रामराम करून त्याच्याशीं बोलण्याचा प्रयत्न केला. तो बिचारा बोलला. कालच्या सारखा तो त्याला उर्मट दिसला नाहीं. बाबूनें ओशाळून सरदार-साहेबांची चौकशी केली.

या पहारेवाल्याकडून बाबूला कळलें, ' आज पहांटेच सरदारसाहेब शिवपुरीच्या जंगलात शिकारीला गेले आहेत. शिकारीकरितां शिवपुरीलाच पंधरावीस दिवस राहणार आहेत. '

निरुपाय झाला. ते परत येईपर्यंत स्वस्थ बसण्याशिवाय गत्यंतरच उरलें नाहीं. बाबू गेला तसा परत आला नानीला हकीकत सांगितली.

पदरमोड करीत तोंपर्यंत राहणें भागच होतें.

बाबू ग्वालेरला गेला ते दिवस तरी कसले वाईट होते, नुकता उन्हाळा

सुरू होत होता. त्याच्या देशावरचा किंवा मुंबईचा उन्हाळा निराळा आणि ग्वालेरचा प्राणघातक उन्हाळा निराळा. नानीबाईच्या आंगची तगमग होऊं लागली. बाळाच्या कोवळ्या अंगावर तर टरटरून फोड आले. अगोदरच तो आजारी आणि त्यांतून त्याच्यावर हा प्रसंग !

बाबू अस्वस्थ झाला.

तसेच कसेतरी त्यानें दिवस काढले. वीस दिवसांनीं तो पुन्हां बंगल्यावर गेला. सरदार आल्याचें कळलें. पण भेटीची मुष्कीलच झाली. पहिल्या दिवशींचा पहारेवालाच आज होता. तो बाबूची मुळींच डाळ शिजूं देईना. जास्त लघळपणा करील म्हणून तो सुरवातीबरोबरच त्याच्या अंगावर खेंकसला.

बाबू हिरमुसला झाला. त्यानें त्याचा नाद सोडला. तेथें जवळ उभाहि राहिला नाहीं, तो दूर जाऊन उभा राहिला, केव्हां ना केव्हां सरदार बाहेर पडतील. त्यांच्या दृष्टीस पडलों म्हणजे झालें. मग ते आणि आपण आहोंत. या पहारेवाल्याची पत्रास कोण ठेवतो मग !

खूब वेळ तो तिष्ठत राहिला. त्याच्या उभे रहाण्याचें सार्थक झालें. अगदीं संध्याकाळीं सरदासाहेबांची मोटर बंगल्यांतून पों पों करीत बाहेर पडली. बाबूनें आशेनें मान उंच करून पाहिलें तोंच मोटर फाटकांतून भुर्रकन् केव्हांच निघून गेली, त्यानें ओझरतें सरदारांना पाहिलें. त्याला सरदारांनीं पाहाणें कसें शक्य होतें !

बाबू त्यानंतर हताश झाला. रात्र झाली म्हणून तो जड पावलांनीं बिऱ्हाडीं आला.

दिवसेंदिवस त्याची पुंजी खलास होत चालली होती. बाळाचा आजार वाढतच होता.

दोघांच्याहि पोटांत कालवाकालव होत होती तरीहि रोज परस्परांना धीराच्या गोष्टी ऐकवीत असत.

खिन्न मनानें बाबू परत आल्याचें दिसलें.

नानीबाईच्या पोटांत धस्स झालें.

असाच क्रम आणखी कांहीं दिवस चालला. केव्हां बंगल्यांतून बाहेर

पडतांना तर केव्हां बाहेरून येतांना–आणि कधीं जातांना व येतांनाहि सरदारसाहेबांचा मोटर बाबू पाही पण कांहीं केल्या सरदारसाहेबांची व बाबूची दृष्टिभेट होईना आणि बाबूचें नष्टचर्य संपून नशीब उघडण्याचें चिन्ह दिसेना.

एक दिवस नानीबाईनें दुःखी आवाजांत बाबूला सांगितलें ‘ आपल्या-जवळची [illegible] शिल्लक सरली. धान्यहि पोत्यांत नाहीं.

बाबूला [illegible] ग्रासलें. तो कांहींच बोलला नाहीं.

थोड्या वेळानें पिळवटलेल्या काळजानें नानीबाईच्या तोंडांतून आणखी शब्द बाहेर पडले, ‘ आणखी ऐकलंत का, कालपासून बाळाचं चिन्ह कांहीं ठीक दिसत नाहीं. पैसा नाहीं म्हणून कालपासून औषध पण बंदच आहे. ’ बाबूच्या डोळ्यापुढें हिरवीं पिवळीं चक्रें आल्याचा भास झाला. त्याला चक्करसुद्धां आल्यासारखें वाटलें.

तरी आपली स्थिति नानीबाईच्या ध्यानीं येऊं नये. अशी त्याची इच्छा होती. ती सफल झाली कीं नाहीं कोण जाणे !

× × ×

सरदारसाहेबांची मोटर फाटकांतून सावकाश बाहेर पडत होती. जीव मुठींत धरून ठरल्या जागीं बाबू उभा होता. त्याला वाटलें आपला भाग्य-काळ आज आहे. त्यानें त्वरा केली. सर्व शक्ति एकवटल्या. तो भर्रकन मोटरीजवळ गेला. त्याच्याकडे आतां सरदारसाहेबांची नजर गेली ! बाबूनें जमीनीपर्यंत लवून त्रिवार मुजरा ठोकला. हात जोडून ‘ महाराज!–’ म्हणत त्यानें अत्यंत उत्कंठतेनें, हंसऱ्यामुखानें त्यांच्याकडे पाहिलें.

प्रथम सरदारसाहेबांनीं त्याला ओळखलें नाहीं “ कोण ! काय आहे ! ’ असे रुक्ष प्रश्न त्यांच्याकडून आले.

‘ मी–तो–मुंबईचा–ड्रायव्हर–सरकारांच्या ’

सरदारसाहेबांच्या डोक्यांत किंचित् प्रकाश पडला. त्यांनीं बाबूला ओळखलें. दरबारी स्मित त्यांच्या मुखावर झळकलें. “ हां, हां. तूं तो मुंबईचा ड्रायव्हर ! अच्छा ठीक आहे ना !”

बाबूनें किंचित् मान हालविली.

" बरं आहे. मुंबई सोडून इकडे कुठें आला होतास ! सहजच देश पहायला वाटतं ! आमचं ग्वालेर ठीक आहे ना ! बरं–बरं–अच्छा ! '

इतकें म्हणून आपल्या ड्रायव्हरास इषारा दिला.

गाडी हां हां म्हणतां त्याच्या पुढून दिसेनाशी झाली.

बाबू जागच्या जागींच मटकन् खालीं बसला. त्याला चोहींकडे अंधारच अंधार आहेसा वाटला. बाहेर अंधार, आंत अंधार !

त्याच्या अंगांतली शक्ति नष्ट झाली. पाय गळाले. तो त्याच जागीं किती तरी वेळ बसलाच राहिला. नंतर पाय ओढीत कसाबसा परत येत होता; परत आलेल्या सरदारसाहेबांच्या मोटरीचाच त्याला वाटेंत धक्का लागून तो वाटेंतच कोलमडला. पडला ! धांवत्या मोटारला त्याची दादही नव्हती.

घरीं जाऊन बायकोला काय सांगावें, याची बाबूला विचारशक्तीही राहिली नव्हती.

तो घरीं आला तों नानीबाईजवळ दोन तीन बायका जमल्या होत्या. नानीबाई हंबरडा फोडीत होती. तिच्या बाळाचें शव तिच्यापुढें पडलें होतें ! बायका एकीकडे रडत होत्या व एकीकडे नानीबाईला म्हणत होत्या. " बाई, कशाला तुम्हीं देश डोक्यावर घेतलांत ! या श्रीमंत लोकांच्या कशाला नादाला लागतात बरं ! सोन्यासारख्या बाळाला मुकलांत आणखी चाकरी तरी तुम्हांला मिळायची आहे ! जयसिंगराव तर म्हणतात विलायतेला जायला उद्यांच निघणार आहेत ! तुमचा नवरा त्यांच्याकडे जाऊन काय करणार मग ! उगी. उगी. आतां रडून काय करणार बरं !"

बिचारी नानीबाई !

वेडा बाबू ड्रायव्हर !

त्याच्या संबंधानें काय म्हणावें ! काय लिहावें !



# हिऱ्याच्या बांगड्या ! : : १

इंदुबालेच्या गोंडस चिमुकल्या हातांत मनाजोगत्या किंमतवान् हिऱ्याच्या बांगड्या पद्मावतीबाईसाहेबांनीं स्वतःच्या देखरेखीखालीं, बसून करून घेतल्या आणि घातल्या. पद्मावतीबाईसाहेबांना लाडक्या मुलीच्या हातांत त्या बांगड्या बघून किती तरी आनंद झाला. इंदुबालेला कडेवर घेऊन त्या अगोदर पतिराजांकडे गेल्या. ‘पाहिलंत का, इंदुबाला आतां कशी शोभतेय !’ म्हणून कचेरींत कामांत गढलेल्या पतीचें लक्ष्य आपल्याकडे व इंदुबालेकडे वेधविलें. इंदुबालेच्या ‘पपा’नीं कामांतून लक्ष्य काढून वर पाहिलें. ‘दाखव बघूं, इंदुबालें तुझ्या बांगड्या !’ म्हणतांच आपल्या ‘पपा’पुढें इंदुबालेनें आपले चिमुकले हात पुढें केले. हिऱ्याच्या बांगड्या तिच्या ‘पपा’नीं पाहिल्या. ‘अरे वा: ! आतां आमची इंदुबाला किती छान दिसतेय पण !’ म्हणत इंदुबालेला जवळ घेतलें. तिचें पटापट मुके घेतले. बांगड्यांनीं इंदुबालेच्या हातांना जास्त शोभा आणली कीं गोंडस गुबगुबीत हातांनींच त्या हिऱ्याच्या बांगड्यांचें तेज अधिक वाढलें हेंच तिच्या पपांना कळेना.

मनासारखी कलाकुसर करवून बांगड्या मुलीच्या हातांत घातल्यामुळें त्याकडे पहातांना पद्मावतीबाई आज विशेष खुषींत होत्या. त्या मुलीकडे पाहून हर्षनिर्भर झाल्या होत्या; तर त्या आनंदाच्या अलंकारानें पद्मावती-बाईसाहेबांच्या मूळच्या सौंदर्यांत आणखी भर पडल्याचें आढळून आल्या-मुळें ते त्यांच्याकडे अनिमिष नेत्रांनीं पहात राहिले होते. तो क्षण स्वर्ग-सुखाचा सर्वांनाच वाटला.

“आपल्या बाबाजीनें पाहिल्या का ह्या बांगड्या ?” जरा वेळानें पद्मा-वतीबाईसाहेबांकडे इंदुबालेला परत देत तिच्या ‘पपां’नीं पृच्छा केली. त्याला दाखवा. त्यालाहि आपल्याप्रमाणेंच फार आनंद होईल.

अजूनपर्यंत म्हाताऱ्या बाबाजीला—घरच्या पुष्कळ दिवसांच्या इमानी नोकराला त्या बांगड्या दाखविण्यांत आल्या नव्हत्या. इतर कोणाच्याच

त्या दृष्टीस पडल्या नव्हत्या. पण मग पद्मावतीबाईसाहेबांनीं वाड्यांत चोहीं-कडे फिरून त्या दाखविल्या. नोकर, मोलकरीण, स्वयंपाकीणबाई, शेजारी-शेजारिणी, आला गेला सर्वांना दाखविण्यांत आणि सर्वांकडून आपल्या श्रीमंतीचें, बांगड्यांचें, भाग्यवान इंदुबालेचें, आणि आपल्या हौसेचें मन-मुराद कौतुक करून घेण्यांतच पद्मावतीबाईसाहेबांचा त्या दिवशींचा सारा वेळ गेला. म्हातारा बाबाजी बाहेर कामाला गेला होता. तो आल्यावर इंदुबाला त्याच्याकडे धांवत गेली. बांगड्यांचे हात त्याच्यापुढें करीत, बोबडे बोल बोलत, हंसत खिदळत, बालिकेनें बाबाजीला आपल्या आईनें घातलेल्या बांगड्या दाखविल्या.

इंदुबालेला बाबाजीनें उचलून घेतलें. त्या बांगड्या पाहिल्या. आपल्या किलकिल करणाऱ्या डोळ्यांनीं तो किती तरी वेळ त्यांकडे पहात होता. ‘ आमच्या छोट्या बाईसाहेब लइ भाग्यशाली ! ’ असें कांहींतरी तो अर्ध-वटच पुटपुटला. बाबाजीनें घेऊन हिंडविल्यावर इंदुबालेला भारी आनंद झाला. घरांतील इतर कोणाहिपेक्षां बाबाजीला बिलगण्यांत इंदुबालेला जास्त आनंद होत असे. ती त्याच्याजवळच जास्त खेळत असे. अधि-कच आनंदीत असे.

कां कोण जाणे ! पद्मावतीबाईसाहेबांनीं आपण होऊन इंदुबालेच्या हातांतील हिऱ्याच्या बांगड्या इतरांना दाखविल्या. पण बाबाजीला दाख-विण्याचें मात्र टाळलें.

पण बाबाजीला इंदुबालेनेंच त्या बांगड्या दाखविल्या.

आणि त्यानंतर चांगले आठ दहा दिवस सर्व घरांत इंदुबालेच्या हिऱ्याच्या बांगड्यांच्या कौतुकाचाच विषय घुमत होता.

x x x

भवानरावसाहेब जहागीरदारांच्या घरीं म्हातारा बाबाजी त्यांच्या लहानपणापासून वाढलेला. भवानरावसाहेबांना त्यानें आपल्या अंगाखांद्यावर खेळाविलेलें. त्यांच्याच घरांत त्याचे काळ्याचे पांढरे झालेले. आतां त्याचे चाकरी करण्याचें वय नव्हतें—अशांत भवानरावांच्या वाड्यांत मोठ्या पगाराची आणि बड्या हुद्याची चाकरी होती असेंहि नाहीं. पण भवान-

रावांच्या वडिलांनीं इहलोक सोडतांना बाबाजीबद्दल मुद्दाम सांगितलें होतें, ' बाबाजी पायगुणाचा आहे. तो घरीं आल्यापासून आमची भरभराट झाली आहे. मनाचा मानी, हाडाचा गरीब, सहवासाला सज्जन—असा आहे. तर त्याला अखेरपर्यंत अंतर देऊं नका. त्याच्या पायांत आपली लक्ष्मी! त्याला दुखवून घराबाहेर घालवाल तर तुमचें भले होणार नाहीं. '

तसेंच बाबाजीलाहि जवळ घेऊन ' भवानरावाला सोडूं नकोस. त्यांचें हिताहित तुझ्याप्रमाणें पहाणारा इसम मिळणार नाहीं. ' असें कळवळून बजावलें होतें. पहिलीं माणसें भोळीं बिचारीं !

जहागिरदारांनीं सांगितलें, भवानरावसाहेबांनीं ऐकलें. बाबाजीनेंहि मानलें. तो आजतागायत त्यांचा संबंध तसाच चालू होता. भवानरावांची पहिली पत्नी निवर्तली तेव्हां ते खूब वैतागले! संन्यास घ्यायला निघाले.

पण बाबाजीनें त्यांना समजावलें. स्थीर केलें. संसाराकडे त्यांचें चित्त वळविलें. स्वतः मुलगी शोधून पसंत करून भवानरावांना दाखविली—तें कार्य जुळवून आणलें, घडविलें. पद्मावतीबाईसाहेब त्या ह्याच ! यांची माहेरची गरिबीच. पण त्यांच्या ईश्वरदत्त सौंदर्यानें, बाबाजीच्या खटपटीनें आणि भवानरावांच्या पसंतीनें त्या अशा थोर पदावर विराजमान झाल्या होत्या.

एकेकाचें नशीब म्हणतात, तें असें !

बाबाजीनें आपल्या धन्याला सुखी केलें. त्याच्याच प्रयत्नानें पद्मावती-बाईसाहेबांना सुखाचा—मोठेपणाचा, वैभवाचा, लाभ झाला—पण—

पण—त्यानंतर कांहीं थोड्या काळानें—पद्मावतीबाईसाहेबांच्या सासरीं—माहेरीं पाहिल्या चार दोन खेपा झाल्यानंतर, जसजसा त्या आपलें घर—आपल्या पतीचें मन आपल्या कह्यांत घेऊं लागल्या, त्या वेळीं त्यांना आपल्या वाड्यांत म्हातारा बाबाजी हे एक अवजड प्रस्थ आहे त्याची हुकमत खुद्द आपल्या यजमानावरहि चालते—

आपण सावधगिरी बाळगली नाहीं तर आपल्यालाहि तो जाचक झाल्या-खेरीज रहाणार नाहीं, असें त्यांना उगीचच वाटूं लागून त्या बाबाजी-बद्दलचा तिरस्कार बाळगूं लागल्या.

भवानराव त्याला मानतात—त्याचा शब्द ऐकतात—हे पद्मावतीबाई-साहेबांना आवडेनासें झालें होतें.

पत्नीचा रोष बाबाजीवर होत आहे हें भवानवरावसाहेबांच्या ध्यानांत येऊं लागलें होतें. इकडे आपल्यावरील बाबाजीचा निर्लोभ लोभ आणि इकडे सौंदर्यसंपन्न तरुण पत्नीचा अनावर मोह—भवानरावांचें मन घड्याळां-तील लंबकाप्रमाणें या टोंकापासून त्या टोंकापर्यंत हेलकावे घेऊं लागलें होतें.

तरुण—अल्लड अपरिपक्क धनीणीची दृष्टि आपल्यावर दिवसेंदिवस वक्र होत चालली आहे हें बाबाजीच्या केव्हांच ध्यानांत येऊन चुकलें होतें. पण त्याला त्याची पर्वा करण्याचें कारणच नव्हतें. व्यवहाराशीं चोख, निर्लोभ, चालीरीतींत रोखठोक—धन्याच्या—भवानरावांच्या हितहिताकडे पहाण्यांत पहिल्याइतकेंच दक्ष आहोंत याबद्दल त्याची त्याला मनोमन पूर्ण खातरजमा असल्यामुळें तो बेफिकीर असे. पद्मावतीबाईसाहेबांना मनाशीं 'बच्चा आहे!' असें समजे. त्यांच्या बोलण्याकडे, त्यांच्या वागण्याकडे भवानरावांकडे लक्ष्य देऊन दुर्लक्ष्य करी. हा प्रकार पद्मावतीबाईसाहेबांना इंदुबालेचा लाभ होईपर्यंत बराच प्रखर झाला होता. अधूनमधून धनीण नोकराचे लहानमोठे खटकेसुद्धां उडत.

पद्मावतीबाईंना बाबाजीची ब्याद आपल्या वाड्यांतून जाईल तर बरें असें वाटूं लागलें होतें. त्यांनीं वेळ पाहून भवानरावांनाहि आपला उद्देश कळविला होता.

पण भवानरावांनीं निक्षून त्याचा प्रतिकार केला होता.

त्या वेळेपर्यंप तरी त्या वाड्यांत बाबाजीचें नशीब जोरावर होतें.

मालकांची मर्जी सुप्रसन्न असली म्हणजे गरीब नोकरांना कशाची भीति असणार ? असेंच दिवसांमागून दिवस जात होते.

बाबाजीला वाटत नसलें तरी ज्यांना त्यानें मनोभावें सुखी केलें होतें; त्यांच्याच चिथावणीनें त्याचें दुर्दैव चाहूल लागूं न देतां त्याचा पाठलाग करीत येत होतें हें निश्चित !

दुर्दैवाशिवाय गरीबांचा दावेदार कोण असणार ?

× × ×

एक दिवस वाड्यांत खूपच गडबड उडाली होती. आरडाओरड करून पद्मावतीबाईसाहेबांनीं सारा वाडा डोक्यावर घेतला होता. नोकरांचाकरांची, मोलकरिणीची, स्वयंपाकाच्या बाईची कोणाचीहि त्यांनीं मुर्वत ठेवली नव्हती. ज्याच्या त्याच्यावर मनसोक्त तोंड टाकीत होत्या. त्यांच्या तोंडाचा पट्टा एकसारखा चालत होता. कां नाहीं चालणार ! इंदुबालेच्या हातांतील हिऱ्याच्या बांगड्या नाहींशा झाल्या होत्या ! तिच्या हातांत होत्या केव्हां आणि नाहींशा झाल्या कधीं हें सुद्धां कुणाला नीट आठवत नव्हतें. पद्मावतीबाईसाहेबांना सुद्धां आठवत नव्हतें. त्यांचेंहि दुर्लक्ष्य झालें होतें. पण जेव्हां बांगड्या मुलीच्या हातांत नाहींत हें त्यांच्या लक्ष्यांत आलें तेव्हां त्या चरकल्या. चौकशी करूं लागल्या. स्वतःहि आठवण करूं लागल्या. त्यांनाहि आठवेना आणि घरांत कुणी कबूलहि करीना. पद्मावतीबाईसाहेबांच्या अंगांत चामुंडादेवीचा संचार झाला होता कीं काय कोण जाणें ! भवानराव मलूल तोंडानें आपल्या लाडक्या पत्नीकडे पहात बसले होते. तिची समजूत करण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत नव्हतें. त्या तोफेच्या गडगडाटापुढें त्यांच्या तोंडून शब्दच फुटत नव्हता.

पद्मावतीबाईनीं पोलिसांत वर्दी दिली. पोलिस अधिकारी वाड्यांत आले. त्यांच्यापुढें मोलकरीण, नोकर, दिवाणजी, स्वयंपाकीण—सर्वांना उभें करण्यांत आलें. सर्वांच्या झडत्या घेतल्या गेल्या. सर्वांना उणीं दुरुत्तरें ऐकून घ्यावीं लागलीं. देवापुढचा बेलभंडारा उचलावा लागला.

इतर श्रीमंतांकडे अशावेळीं गरीब नोकरांचाकरांना जो अपमान सोसावा लागतो, ज्या माणुसकीला पारखें व्हावें लागतें, अपराध श्रीमंताच्या हलगर्जीपणाचा आणि प्रायश्चित्त निष्कारण गरीब–दुबळ्या नोकरांचाकरांना, तोच प्रकार आज भवानरावांच्या वाड्यांत केव्हांचा चालू होता.

गरीब नोकराचाकरांना ते सर्व 'सोहाळे' भोगावे लागत होते.

अजून बांगड्यांचा तपास लागला नव्हता !

हा वेळपर्यंत म्हातारा बाबाजी अलिप्त होता. तो अलिप्त रहाण्याचें कारण केवळ भवानरावांची तीव्र इच्छा ! इतर नोकरानांहि पोलिसांकडून 'समजूत' देण्यांत त्यांना उत्सुकता होती असें नव्हे—पण तसें बाबाजीच्या

बाबतींत करणें महा पाप आहे असें त्यांना वाटत होतें. पण शेवटीं त्यांचा नाइलाज झाला.

पद्मावतीबाईसाहेबांचा सारा राग–सर्व वहीम बाबाजीवर होता. तो एकटाच पुढें आला नव्हता.

सर्व नोकर सुटले, पाया पडून–शपथ वाहून, बेलभंडार उचलून–दोषमुक्त सुटले होते.

पद्मावतीबाईसाहेबांच्या मतें बाबाजी दोषमुक्त होणें शक्यच नव्हतें. त्यांनीं बाबाजीवर फर्मान सोडलें. भवानराव हताश झाले. पोलिस अधिकाऱ्यांना स्फुरण चढलें.

म्हातारा बाबाजी निर्विकार मनानें समोर येऊन दाखल झाला.

" काय रे, या मुलीच्या हातांतल्या हिऱ्याच्या बांगड्या तूं पाहिल्या होत्यास काय ! " पोलिस अधिकाऱ्यांनीं बाबाजीला दटावणीच्या आवाजांत प्रश्न केला.

" होय. "

" चांगल्या भारी किंमतीच्या होत्या ना !"

" होय. "

" तुला त्या फार आवडल्या होत्या म्हणतात !"

" होय. "

" बरं मग, आतां कुठें आहेत ! "

" मला माहीत नाहीं."

' माहीत नाहीं काय ! ' मध्येंच पद्मावतीबाईसाहेब कडाडल्या, ' चोर कुठला !–पोलिससाहेब, या म्हाताऱ्याचंच हें कृत्य आहे. यानेंच इंदुबालेच्या बांगड्या लुबाडल्या आहेत. माझा याच्यावर दाट वहीम आहे. इतकं म्हातारं वय झालें तरी एवढ्या तेवढ्या–अन् ज्याच्या अन्नावर जगायचं त्याच्याच घरांतल्या जिन्नसावर डल्ला मारायचा–थोडी तरी शरम वाटायला पाहिजे–कुठें लपविल्या आहेत त्या हिऱ्याच्या बांगड्या ! बोल. तो हिरा तसा पचायचा नाहीं बरं–सांगून ठेवतें—"

म्हातारा बाबाजी ! खुंभासारखा तटस्थ उभा होता. पहिले कांहीं शब्द त्याच्या कानांत घुसून त्यानें ऐकले असतील. त्याला समजलेहि असतील. पण नंतर तो गर्हिवरूनच गेला. आपल्यावर कसल्या आगीचा वर्षाव होत आहे हें तरी त्याला कळत होतें कीं नाहीं कोण जाणें !

त्याचें तोंड किंचित् लाल झालें. ओठ फुरफुरत होते. त्यानें एकवार वळून आपल्या धन्याकडे—भवानरावांकडे पाहिलें. त्यांचे डोळे त्याला कांहीं तरी विचारीत होते.

भवानराव त्याकडे पहात होते. ते अगदीं अगतीक झाले होते. त्यांच्यानें बाबाजीकडे फार वेळ पहावलं नाहीं. ते अधोवदन झाले. आपण बाबाजीच्या जन्मजात नेकीच्या नरडीला नख लावीत आहोंत—आपल्यावर सौंदर्यसंपन्न सौभाग्यवतीची अवास्तव हुकमत चालत आहे—हें भवानरावांना अजून कळत होतें—पण तें त्यांना कळवितां येत नव्हतें—हलकें हलकें सर्व सारासार बुद्धि त्यांना सोडून चालली असावी—

" हिऱ्याच्या बांगडया तूं चोरल्या नाहींस ?—"

उत्तर नाहीं.

" तूं चोरी केली नाहींस—तर इतरांप्रमाणें देवापुढचा बेलभंडारा उचलून दे ! "

बाबाजीची हालचाल बंद ! वाचा बंद ! निष्प्रभ नेत्र—पापणी हालविल्या-शिवाय भवानरावांवर रोखलें गेले होते.

काय बरें त्याच्या ह्या अचल पहाण्याचा अर्थ असेल ?

नंतरच्या कोणाच्याहि, कोणत्याहि प्रश्नाला बाबाजीकडून उत्तर मिळालें नाहीं.

भवानरावांना कळलें होतें—बाबाजीची इच्छा आपण बोलून दाखवावी—त्याचा पोक्तपणा आपण वदावा—पण त्यांची जीभ हलली नाहीं ! ती हलण्याकरितां वळवळत होती. पण समोर, सौंदर्यवती पद्मावतीवर त्यांचें लोचन खिळलें होतें. तिच्या सौंदर्याचा जबर मोह जिभेला बोलूं देत नव्हता.

सर्वांच्या मतें ठरलें. बाबाजी चोर आहे. त्यानें बांगड्या लांबविल्या. त्याला पोलीस अधिकाऱ्यांच्या ताब्यांत दिलें गेलें.

तो अजूनहि भवानरावांकडे पहात होता. त्याच्या डोळ्यांत करुणा नव्हती—भीक नव्हती—तो न्याय मागत होता.

भवानरावांनीं खालीं पाहिलें—" बाबाजीला घेऊन जा—तो अपराधी आहे ! " पोलीसअधिकाऱ्यांना उद्देशून ते म्हणाले.

म्हाताऱ्या बाबाजीच्या हातापायांत शृंखलेची लेणीं चढलीं—त्याला त्या निरपराध—अपराध्याला—पोलिस अधिकारी त्या वाड्यांतून पद्मावतीबाई-साहेबांदेखत भवानरावांदेखत घेऊन गेले.

श्रीमंतांच्या घरची गरिबांची चाकरी—म्हणजे सुळावरची पोळी म्हणतात तें उगीच नाहीं !

x x x

इंदुकलेच्या हातीं लवकरच नव्यां बांगड्या आल्या. आणखी नवीं नवीं लेणीं आलीं ! सर्वत्र स्थिरस्थावर झालें. हिऱ्याच्या बांगड्या हरवल्या. व त्याचें प्रायश्चित्त पिढीजाद म्हाताऱ्या बाबाजी नोकराला कारागृहांत डांबून दिलें गेलें हीहि गोष्ट वाड्यांतील लहान थोर मंडळी जवळ जवळ विसरूनहि गेली. मुद्दामच त्याची कशावरून तरी आठवण झाली म्हणजे तेवढ्यापुरती त्या गतगोष्टीसंबंधीं काय चर्चा होईल तेवढीच !

बाबाजीला आपण चांगलेंच प्रायश्चित्त दिलें म्हणून पद्मावतीबाई-साहेबांना तशाहि स्थितींत आसुरी आनंद झाल्याशिवाय राहिला नव्हता. त्यांना वाड्यांत आपली सत्ता निष्कंटक स्थापन झाली असें वाटूं लागलें होतें.

भवानरावाच्या अंतःकरणांत बाबाजीबद्दल काय वेदना झाल्या असतील होत असतील किंवा मुळींच कांहीं होत नसेल हें त्यांचें त्यांसच माहित. त्यांच्या मुखांतून बाबाजीबद्दल तो घरांतून तुरुंगांत धाडल्या दिवसापासून भलाबुरा एकहि शब्द निघालेला कोणी ऐकला नव्हता.

दिपवाळीचे दिवस जवळ आले होते. वाड्यांतील साफसफाईचें काम

चाललें होतें. झाडसारवणं चालूं होती. कपाटें, पेट्या, ट्रंका, यांची डागडुजी आणि स्वच्छता होत होती. पद्मावतीबाईसाहेब जातीनिशीं वरील कामें उभ्या राहून आपल्या देखरेखीखालीं करून घेत होत्या. केव्हां केव्हां तर भवानरावसुद्धां कर्तबगार सौभाग्यवतीची कार्यकुशलता पहाण्यासाठीं कौतुकानें काम चाललें असेल तेथें आपलें हातातलें काम दूर सारून पहावयाला येत.

असें काम चालू होतें. पद्मावतीबाईसाहेबांच्या देखरेखीखालीं काम चालू होतें.

हुजुंडीला लागून असलेल्या खोलींत दुरुस्ती--सफाई चालू होती. खोलींतील एका अलमारींत तळाशीं असलेली ट्रंक कामकऱ्यांनीं बाहेर काढली. त्याबरोबर ट्रंकेच्या मागील बाजूस कांहींतरी चटकन चमकल्यासारखें झालें. कामकऱ्याचें लक्ष्य वेधलें. पद्मावतीबाई यांचेंहि त्याच वेळीं त्या चकचकाटाकडे लक्ष्य वेधलें. सर्वांच्याच मुखांतून ' काय तें ! काय चमकलें ! ' असे शब्द आले. कामकऱ्यांपैकीं एकानें ट्रंक बाजूला करून चकचकणाऱ्या जिन्नसेकरितां अलमारींतील तळाशीं हात घातला.

तो जिन्नस–इंदुबालेच्या हातांतील हरवलेल्या हिऱ्याच्या बांगड्या होत्या.–

कामकऱ्यानें त्या बांगड्या धनीनींच्या हातीं आणून दिल्या.

इंदुबाला जवळच बागडत होती. तिनें त्या पाहिल्या. धांवतच जवळ आली. ' माझ्या बांगड्या त्या–माझ्या–आई, दे मला त्या माझ्या बांगड्या ' म्हणत तिनें उच्छाद मांडला.

' अगबाई ! या त्या इंदुबालेच्या हिऱ्याच्या बांगड्या ! अन् त्या अशा अलमारींत ट्रंकेच्या मागें गेल्या ! ' पद्मावतीबाई कांहींतरी उद्गारायचे म्हणूनच उद्गारल्या. घाईघाईनें त्या भवानरावांच्या खोलींत गेल्या. बांगड्यांची बातमी ऐकून तेहि चमकले. बाबाजीच्या आठवणीनें दोघांचाहि चेहरा फिका पडला होता—'

याच हिऱ्याच्या बांगड्यांपायीं म्हातारा बाबाजी—नेकजात् पिढीजात

नोकर हकनाक अब्रूला गमावून बसला—आम्हींच त्याच्या अब्रूवर बेगुमान-पणानें रखरखलेले निखारे ठेवले !—भवानराव कांहींसे आपल्याशीं उद्गारलें!

त्यांच्या डोळ्यांतून त्यावेळीं खरोखरच बाबाजीबद्दल वाईट वाटून अश्रु गळले.

पण पश्चात् बुद्धि काय कामाची !

श्रीमंतांना नोकर मिळत नाहींत—मिळाले तरी इमानी मिळत नाहींत—आणि तसें मिळाले तरी त्यांना टिकवून धरण्याची बुद्धि श्रीमंतांना तरी असते कुठें ! ते जातात आपल्याच तोऱ्यांत आणि नोकर मिळत नाहींत म्हणून ओरडतात मागाहून !—

पद्मावतीबाईनीं त्या वेळेंपुरतें नक्राश्रु ढाळले ! पण ते तेवढ्यापुरतेच. क्षणभरानें त्या कामांत मग्न झाल्या.

भवानरावांना मात्र ती गोष्ट अत्यंत लागली. व तेथुन आपल्या बैठकीच्या जागेकडे चालते झाले !—त्यांनीं कसलेसे कागदपत्र शोधायला सुरुवात केली !—

× × ×

योगायोग तरी किती विलक्षण ! ज्या दिवशीं हिऱ्याच्या बांगड्या चाड्यांत सांपडल्या; त्याच दिवशीं म्हातारा बाबाजी तुरुंगवास भोगून शिक्षेची मुदत संपून मुक्त झाला होता. तो घरीं आला होता. भवानराव कागदपत्रावरून बाबाजीला किती दिवसांची शिक्षा झाली हें पहात होते. आपलें वजन खर्च करून तेवढी शिक्षा पुरे झाली तो निरपराधी आहे, त्याला सोडवून आणविण्याची खटपट करून तेवढेंच श्रेय मिळवावें असें त्यांच्या मनांत आलें होतें.

पण तें श्रेय त्यांना मिळालें नाहीं. बाबाजीनें भरपूर शिक्षा भोगली. तो घरीं आला. भवानरावांनीं चौकशी केली. त्यांना कळलें.

स्वतः जाऊन भेटण्याची त्यांना छाती होईना. बाबाजीला बोलवावें. आपलें लहानपण आठवावें. बाबाजीच्या पायावर डोई ठेवावी आणि याच्याजवळ कृतापराधाची क्षमा मागावी, असें अंतःकरणपूर्वक भवानराव-

साहेब जहागिरदारांना वाटत होतें. पश्चात्तापदग्ध अंतःकरणानें त्यांनीं वाड्यांत येण्याविषयीं म्हाताऱ्या बाबाजीला निरोप पाठविला. तो येईल म्हणून उत्कंठेनें भवानराव त्याच्या वाटेकडे डोळे लावून राहिले.

पण म्हातारा बाबाजी वाड्यांत आला नाहीं! कुणाला भेटला नाहीं कीं, निरोपाला प्रतिनिरोप म्हणूनही एक अक्षरानें दिला नाहीं !

स्वाभिमानी--पाक म्हाताऱ्या बाबाजीनें केलें तें योग्यच केलें नाहीं काय !

---

# अनुभव म्हणजे काय ! : १०

"नमस्कार ! भाऊसाहेब ! नमस्कार !"

" नमस्कार ! नमस्कार !—अरे वाः ! रिसिव्ह करायला अगदीं स्टेशनवर हजर अं !—मला वाटलं होतं—"

" कीं मी स्टेशनवर रिसिव्ह करायला येणार नाहीं ! वाः, भाऊसाहेब ! माझ्याबद्दल इतका अविश्वास ! "

" तसं नव्हे; माझं पत्र वेळेवर मिळणार नाहीं, आणि पत्र मिळालं नाहीं कीं पुढील सर्व बाबींबद्दल निश्चितपणानं कांहींच ठरवितां येणार नाहीं! —"

गाडी स्टेशनांत शिरून हलके हलके प्लॅटफॉर्मवर थांबत असतांना मी बाहेर डोकवून पाहूं लागलों त्याच वेळीं अप्पासाहेब मला दिसले. त्यांना पहातांच मला आनंद झाला. मला पाहून अप्पासाहेबांचाहि चेहेरा खुलून आला. माझ्या खिडकीजवळ किंचित् धांवत येऊन आणि लोखंडी बारला धरून हास्यमुखानें स्वागत करीत नमस्कार–चमत्काराची त्यांनीं सलामी दिली. गाडी पूर्ण थांबण्यापूर्वीच त्यांचीं माझी वरील त्रुटित प्रश्नोत्तरें झालीं. गाडी थांबली, तोंच त्वरा करून अप्पासाहेबांनींच ' ए कुलीऽ ' करून हमालाला हांक मारली, आणि माझ्याकडे वळून व गाडींत डोकावून " भाऊसाहेब, आपलं सामान–ती बॅग, तें होल्ड–ऑल, तो खुजा, तो टिफिनकॅरिअर,– होय ना !—आणखीन् काय!—"

" बस्स, इतकंच !" असें मी म्हणतांच हमालाला माझें सामान उतरायला लावून, त्याचा नंबर पाहून त्यांनीं त्याच्या स्वाधीन तें सामान केलें. कुली सर्व सामान काढीपर्यंत आम्ही प्लॅटफॉर्मवरच हस्तांदोलन करीत औपचारिक प्रश्नोत्तरें करूं लागलों. त्यांनीं माझ्या घरची विचारपूस केली. अगदीं आस्थेनें विचारलें. मीं पण त्यांच्या मुलामुलींबद्दल आणि शकुंतला वहिनींबद्दल तत्परतेनें आणि जिव्हाळ्यानें कुशल विचारलें. हमालानें सामान

डोईवर—हातांत असें आपल्या सोईप्रमाणें घेतलें आणि 'हं, चला रावसाहेब' म्हणतांच आम्ही चालूं लागलों.

स्टेशनच्या बाहेर आलों. मी टांग्याकरितां इकडे तिकडे पाहूं लागणार तोंच अप्पासाहेबांची मोटर त्यांच्या ड्रायव्हरनें आमच्यापुढें आणून हजर केली.

" ही माझी मोटर, भाऊसाहेब ! नुकतीच घेतली मीं ! उत्तम्‌ली आहे. फार छान आहे ! " इतकें अप्पासाहेबांनीं मला म्हणून कुलीकडे वळून त्यांना सामान नीट ठेवण्यास त्यास बजावलें. त्यानें सामान नीट-नेटकें ठेवलें. नंतर " हं, चला, व्हा आंत भाऊसाहेब ! " म्हणून अप्पा-साहेबांनीं जवळजवळ प्रेमळ आज्ञाच केली !

मी मोटरींत चढलों. माझ्यामागोमाग अप्पासाहेबहि चढले. ते दार लावण्याच्या गर्दीत होते इतक्यांत कुलीला देण्याकरितां म्हणून मी खिशां-तून मनीबॅग काढीत 'हं, काय बोवा—' असें म्हणणार—पण त्या आधींच—जितक्या त्वरेनें अप्पासाहेबांनीं मोटरचें दार लावलें, तितक्याच त्वरेनें त्यांनीं हमालाच्या हातावर आपल्याच खिशांतून त्याची हमाली टाकली. तो रामराम ठोकून चालता झाला. मोटर चालू झाली. माझा खिशांतील मनीबॅग काढण्यासाठीं गेलेला हात तसाच परतला! ' हें काय अप्पासाहेब ! असें कांहींतरी मी विचारणार, पण तें तसेंच राहिलें. मी नुसताच सादरतेनें आप्पासाहेबांकडे पहात राहिलों. बरें झालें कीं त्यावेळीं त्यांचें लक्ष दुसरीकडेच होतें. नाहींतर त्यांनीं माझी त्यावेळची मुद्रा पाहून मला एखादें भलतेंच विशेषण दिलें असतें. ते मात्र मला विशेष प्रफुल्लित दिसत होते !

मोटर अप्पासाहेबांच्या बंगल्याच्या पोर्चमध्यें येऊन थडकली. तिचा हॉर्न वाजतांच अप्पासाहेबांची सर्व लहानमोठी बालसेना धांवत बागडत बंगल्याच्या बाहेर मला पहावयाला (!) म्हणून गोळा झाली ! कुणी अप्पासाहेबांस बिलगले, तर कुणी माझ्यापर्यंत येऊन दाखल झाले ! ' पाहुणेकाका आले ! पाहुणेकाका आले ! ' असा जिकडे तिकडे छोटे बाबा—लोकांत एकच गिल्ला सुरू झाला. मला कौतुक वाटलें. आनंद

झाला—आणि आणखीहि कांहीं कांहीं पुष्कळ झालें—वाटलें, पण त्याचें वर्णन नको !

मला अप्पासाहेबांनीं एका खोलींत नेऊन बसविलें. " ही पाहुण्यांच्याकरितां स्पेशल खोली आहे. नेहमीं माझ्याकडे कोणी ना कोणी पाहुणा असतोच. त्याची गैरसोय होतां कामा नये—आपल्याला अडचण भासतां कामा नये—कां, खरं कीं नाहीं ! " असें हंसत हंसत म्हणत व ' आलोंच हं इतक्यांत ' म्हणत अप्पासाहेब तेथून चालते झाले. बहुतेक ते शकुन्तलावहिनींना माझ्या आगमनाची वर्दी द्यायला आणि ' चहा ' सांगायला गेले असलें पाहिजेत. मग मी त्यांना कसा थांबविणार !

मीं प्रवासी कपडे उतरले. बॅगमधून धोतर टॉवेल वगैरे तात्पुरत्या आवश्यक त्या वस्तु काढल्या. बाजूच्या मोरीवर पाणी, साबण, टूथ-पावडरची डबी वगैरे जिनसा होत्याच. मीं हातपाय धुतले, तोंडावरून हात फिरविला, थोडें डोकीवर पाणी घेऊन तें थंड केलें, केसांची थोडी साफसफाई केली, खडावा काढल्याच होत्या त्या पायांत घातल्या, बूट कॉटखालीं सरकावून दिले व बाजूस असलेल्या इझिचेअरवर हुश्श करीत हलकेंच आंग टाकलें.

थोडक्याच मिनिटांत अप्पासाहेब घरगुती पोषाखांत आले. त्यांच्या पाठोपाठच त्यांचा ' बॉय ' चहाफराळाचें समारंभानें घेऊन आला. त्यानें कोपऱ्यांतील छोटेंसें राउंड टेबल ओढून पुढें आणलें. त्यावर चहाफराळाचें ठेवलें. बाजूची खुर्ची अप्पासाहेबांनीं ओढून घेतली, आणि तेहि माझ्या समोरच चहापानाकरतां बसले. आम्हां दोघांचेंहि चहापान यथास्थित झालें !

नंतर आप्पासाहेबांनीं आपला सबंध बंगला हिंडून मला दाखविला. बंगला भाड्याचाच होता, पण आंतील टापटीप, व्यवस्था, सामानसुमान हें सर्व त्यांचेंच होतें. बंगला वेलफर्निश्ड होता यांत शंकाच नाहीं. मी तो मोठ्या कुतूहलानें पहात होतों. प्रत्येक सामान श्रीमंतीला साजेसें होतें, आणि प्रत्येक ठिकाणची व्यवस्था अपटुडेट व कलापूर्ण होती. सामानाकडे अंगुलिनिर्देश करतांना अप्पासाहेब सांगत, ' हें असं फर्स्ट क्लास सामान आपल्याला हवं असतं—कमी दर्जाचं-टेस्टचं-आप-

त्याला आवडतच नाहीं. ' आणि व्यवस्थितपणाचा उल्लेख करण्याच्या वेळीं, ही अशी अपटुडेट व्यवस्था आमच्या शकुन्तलेची आहे. व्यवस्थेची हौस आणि कलापूर्ण मांडणी कशी करावी याचा तिला Eye आहे ' असें ते दर वेळीं ठांसून सांगत होते.

मलाहि तें सोळा आणे पटत होतें. खरेंच नाहीं का ? घरांतील गृहलक्ष्मी चतुर आणि हौशी नसेल तर अशी आर्टिस्टिक व्यवस्था रहाणार कुठून ?

आपल्या घरीं आलेल्या बड्या पाहुण्यास—त्यांतून तो आपला लहानपणाचा शाळासोबती असणारा त्यास——आपल्या संसारसुखाचीं, वैभवाचीं साधनें म्हणून अप्पासाहेब सर्व फिरून दाखवीत होते, तर मी एका बड्याच्या घरीं छोटासा पाहुणा म्हणून आलों असून बडयाचा आदरसत्कार आपण स्वीकारीत आहोंत——आपलें हें एक भाग्यच आहे, असें मी मानीत होतों !

पण त्यांतलें खरें काय होतें——कुणास माहीत ! आमचीं जेवणें आटोपल्यावर अप्पासाहेब आपला साहेबी पोषाख करून आपल्या मोटरींतून ऑफिसला मोठया लगबगीनें निघून गेले. पण जातांना मला-मुद्दाम थोडेंसें थांबूनच नव्हे—तर जेवतांनासुद्धां एकदां हेंच सांगण्यास मात्र ते विसरले नव्हते कीं, " भाऊसाहेब, आतां जेवल्यानंतर शान्तपणानं खुशाल विश्रांति घ्या. वामकुक्षी करा. लागल्यास आपल्या टेबलावर वाचनाकरितां पुस्तकं आहेत, ताजीं वर्तमानपत्रं आहेत, पत्रव्यवहाराकरतां सामान पण तिथं तयार आहे. हव्या त्या जिनसांचा उपयोग निःशंक करावा. आपण माझ्याकडे आलां अहांत——मी आपल्या सरबराईत यत्किंचितहि कमी पडूं देणार नाहीं, अशी उमेद बाळगून आहे ! मला माझ्या एक वेळच्या शाळासोबत्याचा——आजच्या बडया पाहुण्याचा परामर्ष घेण्याची मिळालेली संधि——"

" पण अप्पासाहेब, मी आपल्याकडे पाहुणचार घेण्याकारितांच केवळ आलों नसून—" पण त्यांनीं मला मध्येंच थांबविलें व म्हटलें, " तें सांगण्याची आवश्यकता नाहीं. आपण ज्या कार्याकरितां आलां आहांत त्या-

करितां तर मी जिवापाड झटण्याचा संकल्पच केला आहे मुळीं. आपणांला त्याकरितां निदान या मुक्कामांत तरी निदान काडीमात्र कष्ट पडूं नयेत व कार्य तर भरपूर व्हावं, आणि तें मीं करावं अशी माझी आत्यंतिक इच्छा आहे. आपण मात्र मी सांगेन तसं वागून ती पुरी करूं द्यावी एवढीच माझी आपल्याला विनंति आहे!"

याप्रमाणें मलाच उलट लांबलचक सुन्दर व्याख्यान ऐकवून अप्पासाहेब ऑफिसांत चालते झाले. परत लौकर––मधल्या वेळच्या चहालाच येईन असें मात्र त्यांनीं कबूल केलें.

ते गेले आणि मी वामकुक्षीकरतां कॉटवर आडवा झालों. पण मला झोंप मात्र मुळींच आली नाहीं. माझें मन अप्पासाहेबांच्या बोलण्याबद्दल, मला वागविण्याबद्दल, त्यांच्या संसारसुखाबद्दल, त्यांच्या ऐश्वर्याबद्दल, त्यांच्या मनमिळाऊपणाबद्दल, उदार धोरणाबद्दल आणि आपुलकीबद्दल एकसारखें नानाप्रकारें विचार करीत सुटलें होतें. अप्पासाहेब माझे लहानपणचे शाळासोबती खरे. ते नोकरींत शिरले, आज या वैभवांत लोळताहेत हें खरें. मी माझा अभ्यास पुरा करून नोकरींत न शिरतां स्वातंत्र्याचा बाणा बाळगून वागतों आहें. आज ना उद्यां यांतच मी वैभव मिळवीन हेंहि खरें. पण अप्पासाहेबांनीं लहानपणची इतकी ओळख बाळगून, माझ्या पत्राला मान देऊन घरीं आणावें, इतका सन्मान करावा, अशा ऐषआरामांत ठेवावें तें काय म्हणून! ही त्यांची संवय म्हणायची, मजविषयींचा लोभ म्हणायचा, कीं माझ्या प्रचंड उद्योगाचें महत्त्व पटून त्याकरितां कर्तव्य म्हणून ते मला असें सन्मानानें वागवीत आहेत म्हणावें!

माझा कोणताच निश्चय होत नव्हता आणि मनाला कांहींच पटत नव्हतें. मी लवकरच स्थापन होणाऱ्या 'अखिल भारतीय विश्वविद्यालया'करितां द्रव्यनिधि जमविण्याकरितां त्या संस्थेचा प्रचारक म्हणून बाहेर पडलों होतों. तसें ठरवून बाहेर पडलों तों प्रथम अप्पासाहेबांकडेच येऊन धडकलों होतों. निघतांना ओळखीचे, स्नेही, यांची यादी करून त्यांना त्यांना आगाऊ पत्रें पाठवून, आपल्या कार्याची रूपरेखा कळवून, आपल्याकडून अमक्या प्रकारचे सहाय्याची अपेक्षा आहे असें स्वच्छ लिहून नंतरच तिकडे पाऊल

घालावयाचें हें मीं निश्चित धोरण आंखलें होतें, व त्याला अनुसरून प्रथमच अप्पासाहेबांच्याकडे दाखल झालों होतों. मीं मोठ्या कार्याला हात घातला होता असें मला वाटत होतें, आणि अशा मोठ्या कार्याला हात घातला म्हणजे त्याला परोपरीनें उपयोगी पडणारे आणि प्रत्यक्ष झीज सोसणारे महाभाग आढळतात व त्यामुळेंच कार्य सुकर आणि यशस्वी होत असतें, हें तत्त्व मला माहीत होतें. तो दाखला सुरवातीसच आमच्या अप्पासाहेबांनीं पटवून दिल्यामुळें मला शकून तर चांगलाच झाला आहे तेव्हां आपलें प्रचारकार्य सर्वत्र उत्कृष्ट होणार आणि आपल्या हातून ‘ अखिल भारतीय विश्वविद्यालया ’ करितां प्रचंड द्रव्य जमणारच ही माझी बालंबाल खात्री झाली. मला अत्यंत आनंद झाला. आणि कां नाहीं होणार ?

मी विद्वान्, मी चतुरस्त्र, मी बोलका, मी दुसऱ्यावर अनेक प्रकारें ताबडतोब छाप पाडणारा—माझ्या पेशाला आवश्यक असणाऱ्या सर्व आयुधांची मजकडे जय्यत तयारी होती. आणि सुरवातीबरोबर यशाचीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागल्याबरोबर कोणास भरंवशाचें बळ चढणार नाहीं ! मला तें बळ आलेसें वाटूं लागलें. आतां आपण जाऊं तिथें असेंच चालू रहाणार ! मोठ्यांना मोठ्यांचे मोठे भोग मिळावयाचेच ! आतां आपण मोठे असायला आणखी काय शिंगें लावलीं पाहिजेत थोडीच ! निःशंक आपण मोठे आहोंत, आणि म्हणूनच दुसऱ्याकडून असा ऐषाआराम मिळविण्यास निखालस पात्र आहोंत ! माझ्या सुदैवानें सुरवातीलाच अप्पासाहेब हे शाळासोबती मिळाले हें सोडून द्या, पण शितावरून भाताची परीक्षा या न्यायानें आपली सर्वत्र अशीच चंगळ—चैनचमन् होणार हें निर्विवाद, अशीच माझी मनोदेवता, मला झोंप न येऊं देतां पुनः पुन्हां लाडिकपणानें सांगत होती.

तो दिवस तसाच गेला. दुसराहि त्याचप्रमाणें. सर्व ऐषआराम ठीक. दुसऱ्या दिवसापासून अप्पासाहेबांनीं मुद्दाम रजा काढली ! केवढें त्यांचें थोर हृदय. संध्याकाळीं त्यांनीं आपल्या मोटरींतून त्या ठिकाणच्या मोठ्यांच्या क्लबवर मला नेलें. तेथें कित्येकांच्या ओळखी करून दिल्या. कित्येकांशीं

माझी हस्तान्दोलनें झालीं. माझ्या नांवाचीं वॉलपोस्टर्स काढून अप्पासाहेबांनीं शहरांत ठिकठिकाणीं डकविलीं. कित्येक हजार हस्तपत्रकें काढून माझी आणि माझ्या कार्यांची भरपूर टिमकी वाजविण्यास अप्पासाहेबांनीं मुळींच कसूर केली नाहीं. त्यांनीं माझीं चारदोन ठिकाणीं मुद्दाम व्याख्यानें करविलीं. कांहीं ठिकाणीं तर ते स्वतःच माझ्या व्याख्यानाला अध्यक्ष (!) झाले. मला त्यांची धन्यता वाटूं लागली. दर क्षणीं त्यांच्याविषयीं आदर वाटूं लागला ! व्याख्यान झालें कीं जागच्याजागीं हजारों रुपयांचे आंकडे पडावयाचे ! तें पाहून मी स्वर्गीय सुखें मिळवीत आहे असें वाटे. माझ्या व्याख्यानाला टाळ्या पडत. त्याबद्दल घरीं आल्यावर अप्पासाहेब सहकुटुंब माझी मनमुराद स्तुति करीत. आणि खरें सांगावयाचें म्हणजे अशा वेळीं मला स्वर्ग दोन बोटेंच उरल्याचा भास होत असे !

त्या मुक्कामांत अप्पासाहेबांच्याच मोटरींतून दहापांच ठिकाणीं हिंडण्यापेक्षां आणि तीनचार व्याख्यानांपेक्षां मुळींच कसली तकलीफ अप्पासाहेबांनीं मला होऊं दिली नाहीं. किरकोळ वर्गण्या जमविणें वगैरे काम अप्पासाहेबांनीं आपण होऊन आपल्याकडे घेतलें होतें, आणि तें परिश्रमपूर्वक तें करीत होतें ना !

मी फक्त त्यानंतर अप्पासाहेबांच्या इथला मनसोक्त पाहुणचार झोडीत होतों. म्हणजे असाः——

दररोज निरनिराळ्या पक्वान्नाची मला मेजवानी होई, त्याचा समाचार घेतला जाई ! एक दिवस ‘ गंधर्व कंपनी ’ च्या नव्या नाटकाला आम्ही सर्वच गेलों—अप्पासाहेब, शकुन्तलवहिनी, त्यांचीं सर्व मुलें. मुलांना आमच्याबरोबर नाटकाला यावयाला व विशेषतः अगदीं पहिल्या रांगेवर बसावयाला मिळाल्यामुळें किती तरी आनंद झाला होता. नोकर लोकसुद्धां आनंदित झाले होते. शकुन्तला वहिनींहि नाटकाला बसलों असतांना विशेष खुषींत दिसत होत्या.

पुन्हां एक दिवस कोल्हापूरच्या ‘ प्रभात सिनेटोन ’चा नवा सुन्दर बोलपट पहावयाचाहि आप्पासाहेबांनीं बेत करून तो सर्वांना नेऊन पार पाडला.

दुसऱ्या जवळच्या गांवीं 'देवलांची ग्रँड सर्कस' आल्याचें समजलें होतें; तर एका रात्रीं ती पहायला मुलांबाळांसुद्धां आम्ही गेलोंच.

त्याच आठवड्यांत त्या शहरांत 'फॅन्सी फेअर' उघडला होता. शकुन्तला वहिनी म्हणाल्या, 'तिकडे जायचं' नको कोण म्हणणार! गेलों तिथेंहि. मुलांलेकरांना तिथें किती तरी गंमती गंमती घेऊन दिल्या. मुलांची अगदीं चंगळ उडाली. नको नको म्हणत पण शकुन्तलावहिनींनाहि कांहीं तरी मनाजोगतें घ्यावें लागलेंच! नाहीं म्हणायला मला किंवा अप्पासाहेबानांच तिथें कांहीं घेतां आलें नाहीं. घेण्यासारखें होतें तिथें, पण सवडच मिळाली नाहीं.

अप्पासाहेबांचें याबद्दल मुळीं म्हणणेंच होतें कीं, दिवसभर आपण इमानेंइतबारें उद्योग केल्यावर उरलेल्या वेळांत प्रत्येकानें रिक्रीएशनकरतां असें वागलेंच पाहिजे. प्रत्येकाचा तो हक्कच आहे! त्यांतून माझ्यासारख्याबरोबर अशा गंमतीजमतीची संधि आली असतां ती दवडणें महामूर्खपणाचें काम आहे! मग त्याला नकार कुणाचा असणार!

आतां मी, शकुन्तलावहिनी आणि त्यांचीं मुलें मिळून फावल्या वेळांत कॅरमसुद्धां खेळत असूं ना! आणखी काय पाहिजे!

अशा वेळीं अप्पासाहेब तेथें असले म्हणजे त्यांना फार बरें वाटे. ते शकुन्तलावहिनींना म्हणत—"पाहिलंस, मोठे लोक हे असे असतात. खेळांतहि मोठे आणि आपल्या कामालाहि मोठे!" अन् मग मला म्हणत, "भाऊसाहेब, तुम्ही आमचा गांव नागवणार बुवा! तुमच्या व्याख्यानाचे वेळीं—सभेच्या ठिकाणीं जागच्याजागीं हजारों रुपयांचे आकडे भराभर पडतांना पाहून मी थक्क होतों. त्याचप्रमाणं मी गांवांत तुमचा प्रतिनिधि म्हणून जिथं जिथं जातों तिथं तिथं माझ्यापुढं यथाशक्ति टाकायचं तें तावडतोब टाकतात. खोटी मुळींच करीत नाहींत. मग काय तुमच्याजवळ जादू आहे कांहीं कळत नाहीं."

हें ऐकून मला मूठभर मांस चढे. अस्मान ठेंगणें झाल्यासारखें वाटे. पण मी विनयपूर्वक म्हणे, "कामहि प्रचंड आहे. त्याचं महत्त्व आहे. शिवाय तुमची कर्तबगारी आहे. होतंय हें तुमच्यामुळं होत आहे. तुमच्या

वजनाचा उपयोग मीं केला नसता तर आम्हांला कोण विचारणार होतं ! तुमच्यासारखीं माणसं असतात म्हणून अशीं कामं धसाला लागतात!--"

हें अप्पासाहेबांना पटे. ते म्हणतच "अहो कांहीं झालं तरी तुम्ही ते तुम्ही आणि आम्ही ते आम्ही. तुमच्यामुळं आम्हांला स्फूर्ति मिळते म्हणून असं होतं. एरव्ही आम्ही काय ! आम्हांला विचारतो कोण !"

शकुन्तलावहिनीदेखील हंसऱ्या मुखानें आणि गोड शब्दांनीं माझ्यावर स्तुतिसुमनांचा वर्षाव करीत. त्या वेळीं मला जें कांहीं होई तें होई ! !

'अहोरूपमहोध्वनि' या न्यायानें आम्ही परस्परांचीं स्तुतिस्तोत्रें जेव्हां तेव्हां गात बसलों असतां सहज एक दिवस असा विषय निघाला. कीं, "आम्हां तरुण लोकांच्या कर्तबगारीबद्दल वयोवृद्ध लोक उगाचच अविश्वस्त असतात. ते आमच्या विद्वत्तेकडे, तरतरीकडे, उत्साहाकडे दुर्लक्ष करून आम्हांला हिणकसच ठरवितात. कां ! तर आम्हांला अनुभवाचं ज्ञान नसतं आणि अनुभवाच्या ज्ञानाशिवाय सर्व व्यर्थ होय, म्हणून ! याच एका मुद्द्यावर आमची धडाडी ते लोक दाबून टाकतात. तें काय म्हणून !"

अप्पासाहेबांना तो पूर्वानुभव होताच.

मलाहि पुष्कळ लब्धप्रतिष्ठांनीं याच एका मुद्द्यावर अनेकदां नामोहरम केलें होतें.

तो विषय निघाला त्या वेळीं अप्पासाहेब कडाडून बोलले, "अनुभव—अनुभव म्हणजे काय !"

मी पण तितक्याच त्वेषानें कडाडलों होतों.

"होय तर काय ! अनुभव—अनुभव म्हणजे काय हेंच मला समजत नाहीं. आणि याचबद्दल बुद्रूक लोक वेळीं अवेळीं याचं अकांडतांडव करतात ! कुठं अनुभवाच्या ज्ञानावांचून आमचं अडलं आहे !—उठलों, धडाडीनं उद्योगाला लागलों–लागलंच कीं नाहीं यश यायला ! कुठं वाण पडली आहे अनुभवाच्या ज्ञानाची मला !"

"मी तर तेंच म्हणतों. माझं आजचं बस्तान बसलं आहे त्याला तरी कुठं अनुभवाच्या ज्ञानाचा मला पाठिंबा मिळाला होता !--भाऊसाहेब, आतां आपण एकदां असं करा, तुम्हांला ज्यांनीं अनुभवाच्या ज्ञानाकरिता

खिजवलं असेल, चिडवलं असेल, नामोहरम केलें असेल, कमी लेखलं असेल, त्यांना संधि साधून चारचौघांदेखत आपली चालू यशस्वी कामगिरी पुढं ठेवून असं झणझणीत अंजन द्या—की देखते रहेना !—"

मला बरें वाटलें.

शकुन्तलावहिनींनीहि या अप्पासाहेबांच्या बोलण्याला सुंदरसा मुरका मारून पुष्टि दिली ! मीं तर तो बेत अमलांत आणण्याचा संकल्पच करून टाकला होता !

अप्पासाहेबांकडील माझा मुक्काम संपत आला. पुढच्या गांवाकडे ओढ लागली. सर्व मंडळींच्या आपुलकीच्या वागणुकीमुळें मला तेथून हालूं नये असें वाटूं लागलें. पण कार्यावर नजर ठेवून निघणें भाग होतें. पुढच्या गांवीं इतकी चांगली मंडळी मदतीला मिळतील कीं नाहीं याची शंका मधूनच वाटत होती. मी तसें बोलूनहि दाखवीत होतों. पण गांवाचा वकूब संपला होता, तेव्हां मुक्काम हालवलाच पाहिजे होता.

आतांपर्यंत अप्पासाहेबांनीं मला काडीमात्र कष्ट पडूं दिले नव्हते. एखादा पगारी कारकूनदेखील करणार नाहीं असें सर्व हिशेबाचें——लिहिण्याचें काम तितक्यांतून अप्पासाहेब मजकरतां करीत होतें. तसें करतांना ते म्हणतसुद्धां कीं ' भाऊसाहेबांची कारकुनी करणं हें देखील मी आपलं भाग्य समजतों ! '

वर्तमानपत्रांतून माझ्या कामाचा साद्यंत वृत्तान्त छापून येत होता. माझे रिपोर्टस् अप्पासाहेबांनीं तयार केलेले व त्यावर मी फक्त सह्या केलेल्या आमच्या ऑफिसकडे शक्य तितक्या वक्तशीर जात होते. ऑफिसचीं मला पत्रें येत त्यावरून ऑफिस माझ्या कामावर बेहद्द खुष होतें हें स्पष्ट दिसत होतें. आणखी मला जास्त काय पाहिजे होतें ! माझा उत्साह, आणखी कार्य करावयाला शतगुणित होत होता हें सांगावयाला का पाहिजे !

मी अप्पासाहेबांकडून निघालों. निघतांना मला वाईट वाटलें, अप्पासाहेबांना, शकुन्तलावहिनींना, त्यांच्या मुलांबाळांनासुद्धां फार फार वाईट वाटलें, शकुन्तलावहिनींना तर डोळ्यांना पदर लावतांना आणि निरोप देतांना हुंदका आवरतांना मीं प्रत्यक्ष पाहिलें, मला कसेंसेंच झालें,

अप्पासाहेबांच्या मोटरींत मी बसलों, माझें प्रवासी सामान त्यांच्या नोकरांनीं नीट मोटरींत ठेविलें, ते पण अदबीनें मुजरा करून मजपुढें उभे राहिले, त्यांच्या हातीं जरा चिरीमिरी टाकावी असें मला वाटलें-- मी जरा चुळबूळ करूं लागलों, तें लक्ष्यांत येऊन अप्पासाहेब त्यांना म्हणाले, " अरे, भाऊसाहेबांनीं तुमची बक्षिसी मजजवळच दिलेली आहे, स्टेशनवरून आलों कीं ज्याची त्याला बक्षिसी देईन, समजलांत जा आतां लागा उद्योगाला--" ते सर्वजण मुजरे करून चालूं लागले.

आमची मोटर स्टेशनवर आली, माझी सीट अगोदरच रिझर्व करण्यांत आली होती. माझें सामान नीट लावलें. मी डब्यांत चढलों. गाडी सुटायला थोडासा अवकाश होता. त्या तेवढ्या वेळांत अप्पासाहेबांच्या निर्हेतुक, निस्सीम, सहाय्याबद्दल, श्रमाबद्दल, अविश्रान्त खटपटीबद्दल हजार वेळां तरी उपकार मानले असतील. पण त्यांना तें पसंत नव्हतें. ते म्हणत, " यांत माझे उपकार कसले मानतां ? माझं कर्तव्य मीं केलं. हेंहि केलं नसतं तर मी कृतघ्नच ठरलों असतों ! "

केवढा अप्पासाहेबांचा मोठेपणा—दिलदारपणा—निःस्वार्थीपणा ! आणि कार्यासाठीं कळकळ ! अशीं माणसें सर्रास जास्त निपजतील तर देशाचें उज्ज्वल भविष्य दूर का कुठें राहील ! कार्यकर्त्यांस कवडीचीहि तोशीस न लागूं देतां त्यांच्याकरितां अविश्रान्त खपणारा केवढा महात्मा म्हणावा ! मी जाहीर रीतीनें आणि खुल्या मनानें अप्पासाहेबांस त्या श्रेष्ठपदावर चढविलें. त्यावेळीं अप्पासाहेबांचा चेहरा अगदीं प्रेक्षणीय झाल्याचा भास झाला !

गाडी चालू होणार, त्याच वेळी अप्पासाहेबांनीं सर्व हिशेबाचें—अगदीं टाइप केलेल्या कागदांचें पुडकें--माझ्या स्वाधीन केलें. " हें तुमचं इथलं झालेलं कार्य ! आतां तुमचं तुम्हीं पाहून घ्या. त्यांत सर्व कांहीं आहे. आतां मी मोकळा झालों ! कृतकार्य झालों !" आणि गाडी चालू झाली! अप्पासाहेबानीं उंच हात करून नमस्कार ठोकला. मीहि नमस्कार केला. गाडींत आपलें कृतकार्य नीटपणें एकदां पहाण्याचें मी ठरविलें होतें.

हिशेबांचे कागद मी गाडींत पाहूं लागलों तेव्हां मला काय दिसलें—

हिशेब चोख व स्वच्छ होते. सभेंत जागच्या जागीं पडलेले मोठाले रकमेचे आंकडे कोणाकडूनच वसूल झालेले नव्हते ! ( आणि असे आंकडे दिखाऊच असतात. ते वसूल होण्याकरतां नसतातच ! असें मला नंतर पुष्कळ दिवसांनीं कळलें. ) बाकी जमा झालेल्या रकमा आणि खर्चीचें आंकडे, मला दिलेल्या सर्व मेजवान्यांचा तपशीलवार खर्च, नाटकांना–सिनेमाला–सर्कशीला–फॅन्सी-फेअरला झालेली उधळपट्टी—मजकरितां मोटार पळविली त्यांत पाण्याप्रमाणें पेट्रोल जाळलें त्याची अवाढव्य रक्कम, हमाली, छपाई, टपालखर्च ( माझा व अप्पासाहेबांचाहि ) नोकराचाकरांची चिरीमिरी—–वगैरे वगैरे पैन् पै अप्पासाहेबांनीं बिनचूक टिपलेली दिसली ! इतकेंच काय, पण शेवटच्या तीनचार दिवसांत वर्गणी तर जमली नाहीं; आणि मोटार तर खूप धांवली; त्याप्रीत्यर्थ फक्त पंचावन्न रुपये पांच आणे खर्च जादा झाला होता; व मोठ्या मनानें अप्पासाहेबांनीं मजकडे पाहून अगोदर खर्च केला होता. तो त्यांत न लिहितां तो स्वतंत्र पत्र जोडून मला कळविला होता. आणि मोठ्या नम्रपणानें लिहिलें होतें कीं, ‘ पुढील मुक्कामांतून तेवढ्या रकमेचा चेक पाठवून द्या म्हणजे ज्याचा त्यास देऊन मोकळा होईन. दुसऱ्याचें आणखी थोडक्याकरितां हें नको–! ”

× × ×

अप्पासाहेबांनीं दिलेले हिशेब वाचीत असतांना प्रथम कसेंसेंच होऊं लागलें. डोळ्यांपुढें अंधेरी आल्याचें भासूं लागलें. पण नंतर लगेच खाड्कन् डोळे उघडले. आणि मला आतांपर्यंत न सुटलेलें कोडें चटदिशीं सुटलें—जें कळलें नव्हतें तें कळलें—‘ अनुभव म्हणजे काय ? ’ या प्रश्नाचें उत्तर अप्पासाहेबांनीं सक्रिय व सोदाहरण मला पटवून दिलें होतें.

त्या अनुभवाची किंमत म्हणून मीं पुढील गांवीं जातांच मुकाट्यानें आणखी पंचावन्न रुपये पांच आण्यांचा चेक अप्पासाहेबांकडे धाडून दिला. पण त्या किंमतींत मिळविलेल्या अनुभवाचा–ज्ञानाचा भरपूर उपयोग करून घ्यावयाचें आज नक्की ठरवून टाकलें. अस्तु !

# प्रेमळ झुडुप ! : : : ११

"अं ? हें काय ! सुमित्रा ! अन् तूं !"

"वाः ! फार छान झालं ! सुभाष तूं इथं स्टेशनवर अचानक कसा ! मी जायला निघालें हें कसं कळलं तुला ! माझ्यासाठीं आलास ना !"

"छट् ! मला काय माहीत तूं अशी जाणार आहेस म्हणून—मी आमच्या त्या ह्यांच्याबरोबर आलों होतों. तुझं जायचं केव्हां ठरलं ! मला कसं कळविलं नाहींस ! कां—"

"थांब, सारं सांगतें—हें सामान नीट लावतें—जागा आपलीशी करतें आणि मग बोलूं."

सुमित्रेची आपलें सामान गाडींत नीटनेटकें लावण्याची, आपलें अंथरूण बांकावर पसरून जागा काबीज करण्याची कोण धांदल ! ती अगोदरच देखणी पोर. त्यांत धांदलींत असली म्हणजे तिचें सौंदर्य आणखीन खुलून दिसलें तर काय नवल ! सुमित्रा सामान मोजून पहात होती, सुभाष सुमित्रेच्या चपळ व नयनमनोहर हालचालींकडे नुसता पहात राहिला होता !

कल्पना नसतांना अकस्मात सुमित्रा त्याला दिसली. त्यामुळें त्याला कल्पनातीत आनंद झाला होता कीं, ती त्याच गाडीनें आपल्याला न विचारतां जायला निघाली आहे, म्हणून त्याचें मन चांगलेंच खट्टू होत होतें कोण जाणें ! "हें बघ सुभाष." गाडींतून प्लॅटफॉर्मवर टुणकन् उडी मारून सुभाषच्या जवळ येत सुमित्रा म्हणाली, "काल आईचं पत्र आलं आज बाबांची तार आली—"

"आणि तुला न भेटतां एकदम असं चुकवून जावसं वाटलं—" सुभाष मध्येंच म्हणाला.

"असं रे काय म्हणतोस सुभाष ! माझें थोडं ऐकून तरी घे" किंचित रुष्ट होऊन सुमित्रा सांगूं लागली. "आणखी आज सकाळीं आमच्या रेसिडेन्सींत उंदीर पडला ! झाली एकदम धांवपळ सुरू. बोर्डावर नोटीस

लागली ज्यांना जायचं असेल त्यांनीं लवकर जावं. हें स्कूल एक तारखेला बंद होत आहे. तुला भेटून हें सांगण्याइतकी फुरसदच मला मिळाली नाहीं. त्याला मी काय करूं ! मी घरीं जातांच तुला पत्रानें कळविणार होतें–"

" काय कळविणार होतीस !–"

"मी घरीं आलें आहे. तूं पण ताबडतोब ये ! " सुमित्रेच्या तोंडावर आशायुक्त हंसूं आलें. लगेच तिनें विचारलें, " खरेंच, सुभाष, तूं कधीं घरीं यायला निघणार आहेस ! "

" आतांच तुझ्याबरोबर असाच चलूं कां !"

" हं ! किती छान होईल ! तुझ्याशिवाय मला तिथें मुळींच करमायचं नाहीं बघ ! चलतोस ! '

' पण आमच्या रेसिडेन्सींत अजून उंदीर कुठें पडला आहे !'

' कांहीं तरीच बोलतोस !–"

' अग खरंच ! माझ्या आईचं पत्र नाहीं. तात्यासाहेबांची तार नाहीं, आणि कॉलेजला एकदम सुट्टी मिळेल तर तसा रेसिडेन्सींत उंदीरहि पडला नाहीं. मग तुझ्याबरोबर कितीहि इच्छा असली तरी निघणार कसा ! तूंच सांग ! '

तें बोलणें उत्तर देण्यासारखें नव्हतें. हंसण्यासारखें होतें. सुमित्रा व सुभाष मनमुराद हंसल्याशिवाय राहिले नाहींत.

गाडी सुटायला आणखी बराच वेळ होता. उतारूंची गडबड, पोर्टरांची धांवपळ, गार्डांच्या शिट्या, इंजीनचें कर्कश ओरडणें, पानपट्टी, विडीमॅचिस ' चाई गरम् ' वगैरेचा मात्र गोंगाट चालूं होता. कुणी निरोप देत होते. कुणी निरोप घेत होते. कुणी या टोंकापासून त्या टोंकापर्यंत गाडी ' न्याहाळावया ' ला आले होतें, ते आपलें काम इमानेंइतबारें बजावीतच होते.

सुमित्रा–सुभाषचें संभाषण चालू होतें. बोलायला त्यांना एकच विषय होता कां !

खरोखरच सुभाषला आजच सुमित्रेबरोबर जायला मिळालें असतें तर, त्याला किती आनंद झाला असता ! पण त्याचा इलाज नव्हता ! सुमित्रा

आज जाणार आहे हे जर त्याला अगोदर माहित असते, तर एखादा उंदीर मुद्दाम मारून तो ' प्रिन्सिपॉल ' पुढें नेऊन दाखविला असता कॉलेज एकदम बंद कसें करतां येईल अशी त्यानें जालिम युगत लढविली असती.

" आता तूं घरीं जाऊन काय करशील ? " सुभाषनें सुमित्रेला विचारलें.—

" मी काय करणार म्हणजे ! " नीटसा बोध न होऊन गोंधळून सुमित्रेनें उलट प्रश्न केला.—

" मी सांगतों तूं काय करशील तें—" हंसत सुभाष बोलूं लागला, तुझ्या बाबांनीं नवा मळा घेतला आहे ना ? मोठा छान आहे म्हणतात. पाणी चांगलं आहे. झाडी चांगली आहे, बाग उत्तम आहे. त्या मळयांत उठल्या सुटल्या तूं हिंडत फिरत रहाणार ! होय ! शेजारच्या ओढयाचें खळखळणारे गूढ संगीत ऐकत तूं उभी राहशील—झाडांवरच्या पाखरांची गोड किलबिल, मोटेच्या चाकांची ' किरकिर ,' मोटकऱ्याचें आपल्या बैलांना उत्तेजन देणारें गाणें ऐकण्यांत घटकान् घटका तूं घालवशील. मंद वाऱ्याच्या झुळकेनें हिरवीगार शेतें डोल घेत असतां त्याकडे लक्ष लावून तूं पाहतांना स्वतःलाहि विसरून जाशील—शेतकऱ्यांच्या मुलींत मिसळून त्यांचीं ' लोकगीतें ' त्यांना गायला लावून तूं ऐकशील आणि—"

" सुभाष ! सुभाष ! " सुमित्रा त्याच्या बोलण्यानें बेभान होऊन म्हणाली—किती तू चांगलं बोलतोस. तुझी कविता जितकी चांगली असते तितकेंच तूं असें सुंदर बोलतोस रे ! तुझं बोलणें तुझ्या नांवाला साजण्या-सारखेंच आहे ! सुभाष ! तूं मला कां नाहीं तुझ्याप्रमाणें कविता करायला शिकवीत ? तुझ्यासारखं गोडगोड बोलायला शिकीवत ? हें तुला तरी कोणीं शिकविलें रे ?—"

कुणी ? कुणी ? तूंच ! माझी स्फूर्ति सुमित्रा आहे ! माहित नाहीं वाटतं तुला ! " हर्षभरानें सुभाष उद्गारले. बोल सुमित्रा मी कल्पना केली तीच खरी आहे ना ?—"

" खरी आहे, बरी आहे, पण सुभाष, ती अपुरी आहे ! " आनंदून सुमित्रा बोलली " संपूर्ण कल्पना अशी आहे बरं का सुभाष, तूं गांवाला येणार, तुझ्या बरोबर मी पण शेतामाळांत, रानारानांत हिंडणार तुझी कविता तुझ्या मुखांतून ऐकणार तूं न मी कविता रचलेली बघत बसणार । माझ्या मळ्यांत—" ' वा ! वा ! बरीच कीं आहेस ! तुझ्या मळ्यांत जायचं म्हणे ! जसा कांहीं माझा मळाच नाहीं. आम्हांला शेतवाडीच नाहीं ' सुभाष आणखी कांहीं पुढें म्हणणार होता, पण इतक्यांत ठणठण-ठण—रेल्वेची तिसरी घंटा झाली. इंजिन ओरडलें. गाडीचें हिरवें फडकें फडफडलें. सुमित्रा बोलणें अर्धेंच ठेवून भर्रकन अगोदर डब्यांत शिरली ! गाडी सुटली.

परस्पर दिसेतनांशी होईपर्यंत सुमित्रा हातरुमाल उडवून सुभाषला आणि सुभाष हात उंच करून नुसताच हालवीत सुमित्रेला कांहीं संदेश सांगत होते !

शेजार बरा असला तर बरा नाहींतर त्याच्याइतका त्रासदायक दुसरा कोणी नाहीं. जोड्यांतल्या खड्यासारखा काढतां यायचा नाहीं. बोचल्याशिवाय रहावयाचा नाहीं. घरोबा वाढण्याकरितां प्रथम शेजार करावासा वाटतो, पण केव्हां तरी मध्येंच कुणा एकाचा स्वार्थ आडवा आला कीं पहिला घरोबा बिरोबा चटसारा कुठच्या कुठें जातो आणि स्वार्थसाधनासाठीं शेवटीं परस्परांचे साताजन्मींचे हाडवैरी बनतात. परस्परांच्या सर्वनाशाकरितां टपून राहतात.

बाबासाहेब वऱ्हाडपांडे आणि तात्यासाहेब तासगांवकर यांचेंच पहा. अगदीं असाच प्रकार अलीकडे लोक पाहूं लागले होते. कित्येक वर्षें ही दुक्कल स्नेही म्हणून जगाला माहीत. बाबासाहेब धंदेवाले देशभक्त. तर तात्यासाहेब सरकारभक्त. पण असें असलें तरी दोघांच्या खासगी स्नेहांत आतांपर्यंत तसें कधींच अंतर आलें नव्हतें कीं वितुष्ट पडलें नव्हतें. एखाद्या तिऱ्हाइताला लुबाडावयाचें असलें किंवा तिऱ्हाइताच्या तावडींत आपल्यापैकीं कोणी अडचणींत सांपडणार असलें तर बाबासाहेब—तात्या-साहेबांची दुक्कल त्या तिऱ्हाइतांना लुबाडतांना किंवा त्यांच्या कचाट्यांतून

क्त होण्याकरितां अगदीं प्रशंसनीय एकोपा दाखवी. कित्येक दिवसपर्यंत लोकांच्या तोंडीं तोच एक विषय चाले.

बाबासाहेब तात्यासाहेबांचा स्नेह त्यांच्या अर्धांगी यमुनाबाई आणि नर्मदाबाई यांच्यांतहि बहिणी बहिणी म्हणविण्याइतका लोभ निर्माण करता झाला होता. यांच्याशिवाय त्यांच्या आणि त्यांच्याशिवाय यांच्या घरांत पान हालत नसे.

हेंच काय पण बाबासाहेब–तात्यासाहेबांचा स्नेह आणि यमुनाबाई नर्मदाबाई यांचें बहिणीबहिणीचें प्रेम आपल्या आपल्यांतच खुंटून बसलें नव्हतें. त्याची वाढ झाली होती. त्याचा धागा त्यांच्या मुलां–मुलींपर्यंत पोंचला होता. बाबासाहेब–यमुनाबाईची कन्या सुमित्रा आणि तात्यासाहेब–नर्मदाबाईचा मुलगा सुभाष यांच्यांत निर्मल स्वच्छ, आनंददायक मैत्री अगर लहानपणापासून नांदूं लागली होती.

सुभाष हायस्कूलांत गेला. सुमित्रा शाळेंत जाऊं लागली. सुभाष कॉलेजांत गेला. त्याच्या आग्रहानें आणि सुमित्रेच्या हट्टानें तिच्या आईबापांस तिला हायस्कूलांत धाडावें लागलें. हें सर्व काय उगीच होत असतें !

पिढ्यान्‌पिढ्या घरोबा–लोभ एकसारखा चालत असतो कीं नाहीं कोण जाणें ! पण बाबासाहेब–तात्यासाहेब यांच्यांत तरी आज कैक वर्षें तसा घरोबा–एकोपा चालत होता हें निर्विवाद. 'चालत होता' असें म्हणण्याचा अर्थ हल्लीं तो तसा–निदान तितका नाहीं, असें म्हणण्यासारखेंच आहे, आणि तें थोडेंसें खरें आहे.

तात्यासाहेबांच्या सल्ल्यावरून बाबासाहेबांनीं त्यांच्या मळ्याला लागून असलेला मळा आडगिऱ्हाईकी विक्रीला निघाला होता, तो खरेदी केला होता. उभयतांच्या मळ्यांची सरहद्द एक–बांध एकमेकांना लागलेले. कित्येक बांध, ऐरणी ( सीमेचे दगड ) तर यांच्या कोणत्या व त्यांच्या कोणत्या हें ओळखण्यास पंचाईत पडे ! त्या बांध ऐरणीवरूनच प्रथमप्रथम बाबासाहेब तात्यासाहेब, यांच्या नोकरांत भांडण निर्माण झालें. त्यांनींच आपापल्या मालकाकडे त्या भांडणाचें कोलीत नेलें. जवळ जवळ असलेल्या शेतांच्या वादग्रस्त बांधऐरणींच्या योगानें दुसरा आपलें लढतो आहे, तें

त्याला लढूं द्यावयाचें नाहीं, किंवा सहजासहजीं दुसऱ्याचे शेताचा बांध लुबाडायला मिळतो आहे, तर ' स्वार्था 'करितां तो लुबाडलाच पाहिजे; असा ' स्वार्थी ' हेतु दोघांच्याहि मनांत उभा राहिला. वितुष्ट आलें. कोणी कोणाचें ऐकेना. कोणी कोणाची समजूत काढण्यास, प्रत्यक्ष वस्तुस्थिति पाहण्यास पुढें येईना. आपापल्या ठिकाणाहून ' पाहूं दे त्याला चीत करतों ' अशा वल्गना निघूं लागल्या !

यमुनाबाईना वाटलें आपल्या पतीला लुबाडायला नर्मदाबाईचे यजमान सिद्ध झाले आहेत. त्यांनीं नर्मदाबाईचें नांव सोडलें. नर्मदाबाईना त्यांच्या पतीच्या सांगण्यावरून ठाम वाटलें कीं, यमुनाबाईचेच यजमान आगळीक करतात, आमचा कान कातरायचाच त्यांचा विचार आहे. नर्मदाबाईनीं यमुनाबाईची घरीं बसूनच गडी फू केली.

शाळा कॉलेजांत शिकत असलेल्या सुमित्रा–सुभाषपर्यंत मात्र हें वितुष्टाचें लोण येऊन पोंचलें नव्हतें. त्या निष्पाप, निर्मल जीवांना त्या कलागतीचा दादपत्ताहि नव्हता ! तीं तिकडे होतीं. इकडे कर्त्या लोकांचें वैर वाढतच चाललें होतें. आपापल्या हक्कसंरक्षणाकरितां आणि आपापल्या मुलांचें कल्याण पाहण्याचें निमित्त करून बाबासाहेब व तात्यासाहेब आपापल्या मळ्यांच्या सरहद्दीवरील–बांध ऐरणीच्या लढ्याचा निकाल करून घेण्याकरितां पूर्वीचे सर्व संबंध विसरून कोर्टाची पायरी चढले होते.

कोर्टाच्या एकदोन तारखा होऊनसुद्धां गेल्या होत्या. आतां कोर्टानें कमिशन नेमून दोन्हीं शेतांच्या बांधांची पहाणी प्रत्यक्ष करून यावें. वादग्रस्त जागा कोणती–लढा कोठें व काय आहे, हें पहावें; किंवा त्याऐवजीं वादग्रस्त जागेचा ' फोटो ' च काढून कोर्टापुढें आणावा; म्हणजे वादाचा निकाल योग्य रीतीनें लावतां येईल–येथपर्यंत कोर्टात प्रकरण शिजत आलें होतें.

बाबासाहेब किंवा तात्यासाहेब दोघे मिळून एकदां स्वतःच्या शेतावर गेले असते आणि वादाची जागा कशी आहे हें ते पहाते तर कदाचित् वाद त्यांचा त्यांनाच मिटवितां आला असता–पण–पण–पण–काय ! असें झालें असतें तर जग आहे याहून निराळें दिसलें नसतें का ?

सुमित्रा घरीं आली. बाबासाहेबांना बरें वाटलें. आईला आनंद झाला हें विचार, तें विचार, इकडे जा, तिकडे फीर अशी तिची कोण धांदल उडाली. बोलतां बोलतां आईजवळ तिनें नर्मदाकाकूंची, तात्यासाहेबांची सहज पण उत्सुकतेनें चौकशी केली. पण यमुनाबाईकडून त्या चौकशील नीटसें उत्तर मिळालें नाहीं. यमुनाबाईची अळंटळं सुमित्रेच्या ध्यानांतच आली नाहीं. त्यांनीं प्रथम ऐकलें न ऐकलेंसें केलें. मग विषय बदलला. पुन्हां मग निभेचना तेव्हां आंवढा गिळीत, दुसरीकडेच पहात, त्या रुक्ष आवाजांत म्हणाल्या "अग सुमे, तुझी नर्मदा काकू आतां पहिली क राहिली आहे ? तिच्या यजमानांना बढती मिळाली आहे. मोठा किताब सरकारकडून आला आहे. आतांशा त्यांचा दिमाख कुणीकडे ! आतां आम्हीं गरीब माणसं त्यांच्या नजरेंत कां भरणार आहोंत ? आम्हीं त्यांच्या आतांशा खिसगणतींत देखील नसतों. आहे तें बेश आहे ! देव त्यांचेंच चांगलं करूं दे ! वगैरे ! वगैरे !

सुमित्रा गप्प बसली. दोघींचें कांहीं तरी बिनसलें आहे एवढें तिला कळलें पण कां कशासाठीं हें विचारण्याइतक्या खोल पाण्यांत ती गेली नाहीं. तिला बरें वाटलें नाहीं खरें पण त्याचें कारण हुडकून काढण्याची गरज मात्र तिला वाटली नाहीं.

सुमित्रा दुसऱ्याच दिवसापासून आपल्या शेतामळ्यांतून हिंडायला मात्र जाऊं लागली.

सुमित्रेच्या नंतर चार आठ दिवसांनींच सुभाष गांवीं आला. प्लेगमुळें कॉलेजला सुट्टीच मिळाली, मग तो राहतोच कशाला ? तो आला त्यावेळीं तात्यासाहेब कचेरींत गेले होते. आईला भेटला. बोलला. आईनें पण त्याचें पुष्कळ कौतुक केलें. त्या सबंध दिवसांत आईच्या तोंडून यमुना-काकूंबद्दल चकार शब्द निघाला नाहीं, कीं त्यांच्याकडून कोणी फिरकलेंहि नाहीं; हें प्रथम जरी त्याच्या ध्यानांत आलें नाहीं तरी नंतर त्याला तें समजल्याशिवाय राहिलें नाहीं. एव्हांना सुमित्रेची तरी निदान एखादी खेप व्हायचीच ती देखील नाहीं. याबद्दल सुभाषला आचंबा वाटला. त्यानें आईजवळ चौकशी केली ती यमुनाकाकूंची !

पण यमुनाकाकूंचें नांव सुभाषनें काढतांच निर्मलाबाईंचें तोंड आंबट ाालें. त्यांना मुलाला काय सांगावें हें क्षणभर कोडें पडलें. त्यांना खरी कीकत सांगावीशीं वाटेना कांहीं तरी सांगावयाचें म्हणून त्या म्हणाला, अरे बाबा, तुझ्या यमुनाकाकूंचें अन् त्यांच्या मंडळींचें नांव काढायची ोय उरली नाहीं आपल्या घरांत ! त्यांचं नांव आपल्या घरांत घ्यायचं हणजे आपल्या पोटावर आपणच पाय आणायचं होईल. त्यांच्या आंगांत ालिकडे देशभक्ती शिरली आहे. त्यांची देशभक्ती म्हणजे जाज्वल्य ! आमचा नोकरपेशा त्यांना पहावतोय ! त्यांचं म्हणणं सरकारी नोकरी ोडा सुखाचा जीव आमच्यासारखा दुःखांत घाला. हातांत भिकेची ोळी धरून आमच्याबरोबर निघा. देशाकरतां फकीरी पत्करा, तर तुमचं आमचं जमेल. नाहींतर तुमचा आमचा संबंध संपला समजा. असं आहे ाहा. त्यावेळेपासून तुझी यमुनाकाकू आपल्याकडे येत नाहीं. मला तिच्या- कडे जायची बंदी आहे. पूर्वी होतं कसं आतां आहे काय ! अन् पुढें कोणत्या थराला गोष्टी जाणार आहेत, हें मला तर बाई कांहीं कळेनासें झालें आहे; मी पुष्कळ म्हणतें कीं—'

पण नर्मदाकाकूंच्या पुढील बोलण्यांत सुभाषला फारसा अर्थ वाटला नाहीं. दोघींचें—कांहीं तरी बिनसलें आहे हें त्याला समजलें. आणि त्यांतून तो एवढें मात्र उमजला कीं, अशा विषमपरिस्थितींत निदान आजच्या आज सुमित्रेला भेटायला तिच्या घरीं जाण्यांत विशेष औचित्य नाहीं. साहजिक तिची कुठें गांठ पडली तर भेटूं. तिकडचा खुलासा विचारूं. आपसूक खरेंखोटें काय तें कळेल. थोर आपल्या चालीनें चालूं देत. त्यांना अमूक रीतीनें तुम्हीं चाला, असं सांगण्याचा अधिकार आपला नाहीं. आपण आपल्या चालीनं चालू थोरांची कळ पोरांत कशाला ! आपल्या सुमित्रेच्या संबंधांत नसतां विकल्प कशाला आणा ! आपण पूर्वी वागत आलों तसेंच पुढेंहि वागणार !—

नर्मदाबाईंच्या जवळून उठतांना सुभाषकडे जर कोणी पाहिलें असतें; तर त्याच्या एकंदर चालचर्येवरून वरीलसारखेच विचार त्याच्या मनांत चालले असावेत असा कोणीही तर्क केला असता, तर तें फारसें चुकलें नसते.

तो उठला आणि एकटाच कुठें तरी आपल्या रानांत फिरायला गेला

× × ×

" अहो बळवन्तराव ! हें हो काय ! ही कुठली काच डेव्हल करायला दिलीत ! अगोदर ती ह्या बाबासाहेब वऱ्हाडपांड्यांच्या शेतावरच बांधाचा फोटो घेतला आहे ती कांच डेव्हलप करायची आहे ना !' डा रूममध्यें सातपुते फोटोग्राफर तयार काचा डेव्हलप करीत होते. जवळ त्यांचे सहकारी बळवन्तराव उभे होते. बाबासाहेबांच्या शेतावरच बांधाचा फोटो उद्यां कोर्टात हजर व्हावयाचा होता. बाबासाहेबांची ह बांधाचा फोटो काढून आणण्याची ऑर्डर सातपुते फोटोग्राफरला मिळाल होती. त्यांनीं ' आऊटडोअर ' काम आपला दुसरा कॅमेरा देऊन बळवंत रावांवर सोंपविलें होतें. बळवन्तराव कालच त्या जागेचा फोटो घेऊ आले होते. आतां डार्करूममध्यें त्याच फोटोची कांच डेव्हलप केली जा होती. थोडया वेळानंतर बाबासाहेब तो फोटो घेऊन जाण्याकरितां फोटो ग्राफरकडे येणार होते.

" त्या शेतावरच्या बांधाच्या फोटोचीच ही कांच कां ! "

" हो ! "

" तें झुडूप त्यांत आहे !—"

" आहे !—"

" आणि त्या झुडूपाच्या आडोशाला-हें काय हो !–"

" तो रोमान्स आहे. ती गंमत आहे ! सातपुते, त्या दोघांच्यापि पोझेस किती सुंदर, रम्य, फोटोला लायक आहेत, त्या पहा. मला फा आवडल्या. मोह आवरला नाहीं, म्हणून मी तो फोटो तसाच झटकन् घेऊ टाकला ! अशी मुद्दाम पोझ कुणाला देऊ म्हटलें तर देतां येणार नाहीं- घेतां येणार नाहीं–तुम्हांला नाहीं असं वाटत !" बळवंळतराव म्हणाले.

सातपुत्यांनाहि तें म्हणणें कबूलच करावें लागलें. त्या काचेवर उमट लेल्या फोटोंत—त्या झुडुपाच्या आश्रयाला असलेलें जोडपें सर्व जगाल विसरून गेलें होतें. गवताच्या हिरवळीवर तरुण बसला होता. त्याच्यासमो कसलेसें पुस्तक होतें. पण त्याची दृष्टी दुसरीकडेच होती. जवळच कुणी

तरुणी त्याच पुस्तकाकडे लक्ष्य लावून बसली होती पाठीवरचा पदर वाऱ्यावर खेळत होता. ती गात होती तन्मय झाली होती. दोघेही जगाला पार विसरून गेली होती. कुणा फोटोग्राफरनें आपला फोटो काढून नेला असेल याची त्यांना गंधवार्ताहि नव्हती. त्यांना तशी नुसती चाहूल लागती, तर त्या त्यांच्या पोझीशन्स राहिल्या नसत्या. आज बळवंतरावांना 'रोमान्स'चा सुन्दर नमुना म्हणून फोटो मिळाला, तसा त्यांना कधींच मिळता ना!

सातपुते फोटोग्राफरनीं त्या फोटोची खूप प्रशंसा केली. तो फोटो प्रदर्शनांत पाठवा म्हणून बळवंतरावांना त्यांनीं आग्रहाची सल्ला दिली. त्या फोटोखालीं घालावयाला त्यांनीं बळवंतरावांना नांवसुद्धां सुचविलें. निसर्गनिर्मित झुडुपाचा फोटोला बॅकग्राऊंडसारखा उपयोग करून घेतला आहे. त्या झुडूपाचाहि उपयोग झाला आहे. त्याखालीं रोमान्स तर आहेच ! त्याला "प्रेमळ झुडूप !" असें नांव द्या !

बळवंतरावांना तें नांव चांगलें वाटलें ! ! कांच डेव्हलप झाली. फोटो प्रिंट केला. इतक्यांत बाहेर बाबासाहेबांचा आवाज ऐकायला आला.

"अरे बाबासाहेब आले. बाकी फोटोहि तयारच आहे म्हणा !–"

"पण त्यांना हा फोटो बरा वाटेल ना !"

"कां बरें ! त्यांत त्यांना जें पाहिजे तें सर्व आहे, बांध आहे, ऐरणी आहेत. बांधाचे दगड आहेत. वादांत असणारें हें झुडूप आहे. शिवाय प्रेमळ जोडपेंसुद्धां आहे !–"

"हा फोटो कोर्टाचीसुद्धां चांगलीच करमणूक करील !"

बळवंतराव व सातपुते यांच्यांत हा संवाद झाला. फोटोग्राफर बाहेर आले. बाबासाहेबांनीं पृच्छा केली. फोटोग्राफरनीं 'फोटो' च त्यांच्या हातांत दिला.

बाबासाहेबांनीं चष्मा चढवून फोटो पाहिला ! फोटो पाहतांच त्यांनीं तोंडाचा 'ऑ' केला. त्यांचे डोळे मोठे झाले !

बाबासाहेबांनीं फोटोंत असें काय पाहिलें ? त्यांचा 'आ' कां वासला ? डोळे विस्फारित कां झाले ?

झुडुपाच्या–वादग्रस्त–भांडण ज्यामुळें होतें त्या, झुडुपाच्या आडोशाला

कोण होते ! त्यांची लाडकी लेक सुमित्रा होती—आणि तिच्या सांगा तो दुसरा–त्यांच्या मित्राचा–त्यांच्या शत्रूचा सुपुत्र–सुभाष होता !

मुलांमुलांचा एकोपा–आपणाला त्याची दाद नाहीं.

आमचें भांडण–कोर्ट कचेऱ्या–धुसपुसी–त्यांना याची दाद नाहीं !–

कशाकरितां, कुणाकरितां भांडावयाचें ? कुणी भांडावयाचें ?

चला ! भांडण मिटलें. आपल्या मुली–मुलांनीं मिटविलें. त्या भांड उकरून काढणाऱ्या झुडूपाजवळ बसून मिटविलें. तेव्हां आपणहि तें ए दम आपसांत, ताबडतोब मिटविलेंच पाहिजे ! !

बाबासाहेबांनीं फोटोचें बिल चुकतें केलें. आणखी त्याच्या बऱ्या प्रतींची ऑर्डर दिली. आणि तेथून तडक बाहेर पडले. मात्र ते कोर्टाव गेले नाहींत. भांडण मिटविल्याची दिलखुष खबर द्यायला पुष्कळ दि सांनीं आपण होऊन आज ते तात्यासाहेबांच्या घराकडे चालते झाले !

---

# अपराधांची यादी ! : १२

एका संवत्सराची समाप्ति आणि दुसऱ्या संवत्सराची सुरुवात अशी ती वेळ होती. मित्रमण्डळींत गप्पा चालल्या असतां एका रात्रींत एका संवत्सरांतून दुसऱ्या संवत्सरांत आपण शिरणार—अशा प्रकारचा थोडासा गमतीचा कोटीक्रम करण्यांत आला होता. घरीं येत असतांना कसा कोण जाणें तोच एक विचार किंचित् गंभीर स्वरूप धारण करून मनांत शिल्लक राहिला होता. अमावास्येच्या काळ्याकुट्ट अंधारांतून मी घरीं आलों. सौभाग्यवतीनें दार उघडलें. मी अंथरुणावर जाऊन आंग टाकलें "किती उशीर झाला घरीं यायला. आज तरी लवकर यायला काय झालं होतं !" असें जांभया देत, अळसटत सौभाग्यवती पुटपुटली. ती आणखी कांहीं पुटपुटली असती, पण झोपेनें बहुत दिवसांनीं मजकडे कृपादृष्टी वळविल्याचें मला समजल्यामुळें सौभाग्यवतीच्या बोलण्यावर मी कांहींच बोललों नाहीं. तीही मग विशेष बोलण्याच्या भानगडींत न पडतां पांघरूण अंगावर घेऊन झोंपीं गेली. पलीकडे माझीं मुलें तशीच वांकडींतिकडीं आणि उघडीच खुशाल झोपेचें सौख्य अनुभवीत होतीं. मला झोंप लागली. स्वप्नमालिका सुरू झाली. एकांतून दुसरें, दुसऱ्यांतून तिसरें—चालली स्वप्नांची मालिका वाढत. कांहीं स्वप्नांच्या दर्शनानें मन उल्हासित होत होतें, तर कांहींनीं छातीवर मोठा थोरला दगड दिल्यासारखें होऊन आंबल्याआंत गुदमरल्यासारखें होत होतें.

कोणतें स्वप्न संपलें आणि दुसऱ्या कोणत्या स्वप्नाला,कां खरीच जाग येऊन जागेपणींच्याच व्यवहारांना सुरुवात झाली, हें आतां नक्की सांगतां येत नाहीं. परंतु तशांतही अजून असें आठवतें कीं, दूर—बाहेर—जवळपास कसला तरी गोंगाट, गडबड, हंसणींखिदळणीं, धावपळ ऐकावयाला येऊं लागलीं. मी कुठें आहे हें कांहीं माझ्या लक्षांत आलें नाहीं. सर्व प्रकारच्या कोलाहलानें माझी उत्कंठा वाढली. मी उठून दारांत गेलों. इकडे तिकडे पाहूं लागलों. नुकतेंच झुंजूमुंजू झालें असावें. स्त्रिया, पुरुष, मुलें, जागीं

होऊन मोठ्या उत्सुकतेनें आनंदानें कसल्या तरी उद्योगांत मग्न आहेत-कुणाच्या तरी स्वागताची तयारी करीत आहेत. कुणीतरी मोठे-थोर-सन्मान्य पाहुणे घरोघरीं यावयाचें आहेत, त्याकडे दृष्टी लावून बसले आहेत असा क्षणभर मला भास झाला ! आंगणांत सुवासिनी सडासंमार्जन करून बाहेरच्या खांबाजवळ जागा सारवून, त्यावर रांगोळी घालीत आहेत. पुरुष एक लांबसा चिवा आणून, त्याच्या एका टोकाला पीतांबर, लहान मुलाची टोपी, आंगडें किंवा असेंच कांहींतरी मौल्यवान वस्त्र-व त्याव: चांदी-पितळ-तांबें, पैकीं कशाचा तरी आपापल्या ऐपतीप्रमाणें कलश ठेवून, त्यालाच एक लिंबाची बारीक डहाळी जोडून-घट्ट बांधून तो चिवा ती मंगलकारी पताका उभारण्यांत दंग झाले आहेत, असें मला दिसलें.

" वर्षप्रतिपदा आज. पाडवा आज. मंगलस्नान करा. गुढया उभारा. अमृतवल्ली चाखायला तयार व्हा-गोड बोला. सद्भावना धरा. मनांत चांगले विचार आणा. नूतन संवत्सराचें-संवत्सररूपी परमेश्वराचें, आनंदानें, प्रेमानें, मोकळेपणानें, खुल्या दिलानें स्वागत करा. आज जें कराल तें वर्षभर आपलें सर्वतोपरी मंगल करील " इत्यादि प्रकारची आपापसांत कुजबूज चालल्याचें माझ्या कानीं येत होतें.

मुलें हंसत होतीं. स्त्रिया प्रसन्नवदन दिसत होत्या. वृद्धांच्या तोंडावरही कसला तरी विशेष तजेला ठाण मांडीत आहे, असें आढळून येत होतें.

त्या सर्व प्रकारांकडे पहात असतां मला हंसूं आलें. "काय या आमच्या खुळ्या वेड्या चालीरीती. गुढ्या काय उभारताहेत—जनावराप्रमाणें झाडपाला खाण्याचा काय अट्टाहास धरताहेत-त्यांतून तोंडाला कडवटपणा-आणणारा कडुलिंबांचा पाला चाखण्यांत, या गतानुगतिकांना कसलें भूषण वाटतें आहे ! जुनी चाकोरी सोडून आपण जात नाहींत, आणि आपल्या मुलांबाळांनाही तोच पुराणा कित्ता गिरविण्याचा काय आग्रह करताहेत ! काय हा भावडेपणा-कोण हा धर्मभोळेपणा-काय ही अडाणी रीती!-प्रतिवर्षी पालटणाऱ्या वर्षाचा दिवस असा साजरा केला म्हणजे काय होणार असतें असें या लोकांना वाटत असतें ! " या प्रकारचे प्रश्नावर प्रश्न माझ्या मनांत उत्पन्न होत होते. त्याला उत्तर मात्र मिळत नव्हतें. कोण

देणार उत्तर ! मी दुसऱ्याला विचारीत नव्हतों. आणि दुसऱ्याला विचारणार कसा ? जो तो नूतन संवत्सराच्या स्वागताची तयारी करण्यांत गुंग झाला होता ना ? माझ्याच मनांत प्रश्न उद्‌भवत होते—माझ्या मनाजवळ त्याचीं उत्तरें नव्हतीं.

मी आपल्याशींच हंसलों. पण हंसतां हसतांच माझें मन एकदम खट्टू झालें. खिन्न बनलें. उदासीनतेचे ढग भराभर जमूं लागत आहेत, असें वाटलें. असें कां झालें हें मला कळेना. मी त्या औदासीन्याला प्रयत्नानें दूर सारून—विचारानें प्रसन्नता आणण्यासाठीं प्रयत्न करूं लागलों. पण तें मला जुळेना.

या वेळीं समवयस्क, समविचारी, नेहमींचा खेळीमेळींतला एकादा दोस्त मिळेल, तर त्याच्याशीं हंसून—बोलून मनाची खिन्नता घालवितां येईल अशी कल्पना आली. तसेंच बाहेर पडावेसें वाटूं लागलें—पण कां कोण जाणें, जागचे पाय हलेनात. तितक्यांत, रस्त्याच्या उजव्या बाजूकडे माझी दृष्टि वळली. दुरून, सोंवळे नेसलेला, आंगावर शाल घेतलेला, अनवाणी, हातांत, पळी—पंचपात्री, फुलें, तुळशी, बेल, अक्षता, निरांजन असलेलें ताम्हन घेऊन आमच्या कुलोपाध्ययांची मूर्ति आपली तुंदिल तनु मानेवर शेंडीची गांठ लोळवीत लुटुलटु येत असलेली मला दिसली. आज कित्येक दिवस मी या कुलोपाध्यायाला माझें घर वर्ज्य केलें होतें—त्याला येतांना पाहतांच मला तिरस्कार आल्याशिवाय राहिला नाहीं. त्याचें दर्शनच टाळावें म्हणून मी त्याला टाळण्याचें मनांत आणलें. आतां मागल्या पावलीं आंत जाणार, तों ती स्वारी समोर दत्त म्हणून ठाकली. माझें मनोगत त्यानें जाणलें असावें. आपण कांहींच बोललों नाहीं, तर ती स्वारी आल्या पावलीं परत जाईल अशी माझी कल्पना झाली म्हणून मी स्वस्थ राहिलों. त्याच्याकडून दुसरीकडे दृष्टि वळविली. परत जाणाऱ्या कुलोपाध्यायाच्या पावलांचा आवाज ऐकावयाला येईल असें मला वाटलें होतें. पण त्यांच्या पावलांच्या आवाजाऐवजीं त्यांचे शब्दच माझ्या कानीं आले.

“महाराज, आपण कुलोपाध्यायाकडे यापूर्वीच पाठ केली आहे. आतां दृष्टि बाजूला वळविण्याचें कारण नाहीं. आपल्याला कुलोपाध्याय

नको असतां, देवपूजा, धर्मकर्म, हव्यकव्य, श्राद्धपक्ष नको असतां, कुलो-पाध्याय आपल्या इच्छेच्या विरुद्ध आपल्यावर कशाला बळजबरीनें लादील ! आपल्या घरीं येऊन, देवपूजा करून, आपल्या पानाजवळ आपलें पान येऊन कशाला थापटील ! आपल्याकडे घृतकुल्यामधकुल्या करून, दक्ष-णेची मागणी कशाला करील ! आपण काळजी करूं नये. धास्ती बाळगूं नये. कुलोपाध्याय आपण होऊन येण्याचें धाष्टर्य करणार नाहीं. आपल्याला कठीण दिवस आले आहेत. देवापायीं, धर्मापायीं, होणारा अनाठायीं खर्च आपल्याला अवजड झाला आहे हें आम्हीं जाणत कां नाहीं ? पूर्वपरंपरेचे हे खर्च आपण चालवूं लागलांत–तर 'ब्रह्मोसमाज, आर्य–समाज, प्रार्थना–समाज, ख्रिश्चन सोसायटी,' या सारख्याशीं कालमानाप्रमाणें आपल्याला संबंध ठेवावयाचा असतो, कांहींचे सभासदत्व स्वीकारावयाचें असतें, त्याची वर्गणी भरावयाला आपल्याला जड जाणार नाहीं कां ! आम्हीं आपल्याला देवपूजेचें तीर्थ देऊन आपल्याकडून दक्षणा उकळूं लागलों–आणि त्या दक्षणेवर आम्हीं आमचा चरितार्थ चालवूं लागलों, तर पेस्तनजी, दोरा-बजी, या सारख्यांकडून आपल्याला 'तीर्थ' आणवावें लागतें, त्यांना दक्षणा द्यावयाची आपल्याला पंचाईत नाहीं का पडणार ! तें 'तीर्थ' आपण आणलें नाहीं, त्याची 'दक्षणा' त्या भटभिक्षुकांना मिळाली नाहीं, तर त्यांचा चरितार्थ कसा चालावा ! ते उपाशी मरतील, त्यांचीं पवित्र तीर्थस्थानें नामशेष होतील. त्यांची काळजी आपल्याला आहे, त्याची जबाबदारी आपल्यावर आहे हें आम्हीं जाणत का नाहीं ! आपले आम्हीं 'उपाशी मेलों' तरी हरकत नाहीं; आमचें नशीब आम्हांला कुठेंहि जेऊं घालील–पण आपले ते, त्यांच्याकडे आपलें दुर्लक्ष झालें तर त्यांची गत काय होईल ! गरीब बिचारे ते ! असो. अशी धर्मवासना आपली नसली–तरी तोही धर्मच आहे. त्या धर्माची पाळणूक आणि जपणूक आपण तत्पर-तेनें करतां आहांत, हें काय कमी आहे ! त्यांतही आम्हांला आनंद मान-लाच पाहिजे–समोर पहा. कष्टी, उदास होऊं नका. नमस्ते यजमानमहाशय ! येतों–घेतों आपला निरोप. इत्यादि मुक्ताफळें माझी पर्वा न करतां–माझी मुर्वत न ठेवतां त्या कुलोपाध्यायांनीं मजवर उधळलीं. आणि त्यानंतर क्षणही

न थांबतां–मार्गें वळून न पाहतां तडक पुढें चालते झाले ! मी त्यांच्याकडे पाहातच राहिलों. माझ्या वर्मी त्यांनीं चांगलेच घाव घातले. मला त्यांचा राग आला. मी त्यांच्यावर चिडलों–त्यांची चांगली कानउघाडणी करावी–त्यांना एकदम झाकलून द्यावें, असें मनांत आलें. पण मी तसें करण्या-पूर्वींच ते निघून गेले होते. मी चिडलों. दांतओठ चावलें. पण तें सर्व व्यर्थ होतें.

कुलोपाध्यायांनीं उधळलेलीं मुक्ताफळें सर्वच कांहीं खोटीं नव्हतीं. लक्षांत आलें. मनाला कसेंसेंच झालें. त्यामुळें मनाची अस्वस्थता–मला नकळतच वाढली. आलेली मनाची अस्वस्थता जावी म्हणून काय करावें, त्याकरितां अन्यत्र कोठें तरी चित्त वेधवावें याबद्दल विचार येतो न येतो तोंच दारांत–माझ्यासमोर एक टांगा येऊन उभा राहिला. टांग्यांतून माझी पाठची बहीण–माझी लाडकी ताई उतरली. तिच्याकडे पाहिलें मात्र ! काळीज कसें चर्रर्र झालें. गेल्या एकदोन वर्षांत आम्हां बहिण–भावंडांची गांठच पडली नव्हती. एकेकाळीं माझी ताई मनानें आनंदी–शरीरानें सुदृढ असलेली ताई, यावेळीं मला कशी दिसली. अंगावर जुनेर. कृश झालेली. तोंडावरचा तजेला जाऊन दुःखी, कष्टी, हीनदीन–जिच्या पाठीशीं वास्त-पुस्त करायला कोणीही नसल्यासारखी–अशी मला ती दिसली. तिचा पति छंदीफंदी निघालेला. तिला मारहाण करणारा, धड वेळेला तिच्या पोटांत दोन घांस तरी जात असतील कीं नाहीं, याबद्दल शंकाच यावी, अशी माझी ताई मला दिसली. माझा तिला केवढा आधार, असें तिला पहिल्यापासून वाटे. माझ्याबद्दल केवढी तिला आशा असावयाची ! माझ्या-बद्दलचा तिला आधार वाटत असे, याची जाणीव तिनें मला एका भाऊ-बिजेच्या प्रसंगीं, माझ्याचसंबंधीं केलेली एक कविता अजून माझ्या जिव्हाग्रीं नाचत होती–ताईला समोर पाहिलें, आणि ती कविता मला आठवली—

“ प्रेमळ बंधो करुणासिंधो । वर्षाची ये बीज खरी ॥
नवीन वाटे आजच मजला । प्रेमळतेची साक्ष पुरी ॥

श्रीकृष्ण बंधु द्रौपदिसतिचा । पाठीराखा तो झाला ।।
तिजसम माझें वाटे । मम जीवाला आधार खरा ।।
रखरखलेले उन्हच जैसे । जीवित माझें आजवरि ।।
शंकित जें मन–हळवें बनलें । कोणिं न आतां मज वाली ।।
निराधार ती समज चुकीची । कृतीनें भाई ! मज कळली ।।
मंगल दिन हा आज उगवला । वर्षाची ये बीज खरी ।। ”

पण या गाण्यांत ताईला माझा वाटत असलेला आधार माझ्या बेगुमान वृत्तीनें नाहींसा झाला आहे, असें तिच्या मुखावर स्पष्ट मला दिसलें. माझ्या ताईला मी खरोखरच विसरलों होतों. माझा आधार तिला उरलेला नव्हता ! ती माझ्यासमोर आली. तिनें एकदां मान वर करून मजकडे पाहिलें आणि मग खालीं घातली. तिच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. तिला पुष्कळ बोलावेसें वाटत होतें. पण तिच्या तोंडांतून शब्दच फुटत नव्हते. माझा जीव कळवळला. पण तिची समजूत कशी काय करावी हें मला समजेना. माझ्या, तिच्या विषयींच्या अपराधी मनाजवळ, तिचें समाधान होईल असें शब्दच नव्हतें. आतांही माझ्याकडून शाब्दिक आधार सुद्धां मिळत नाहीं, पाठीवर बंधुप्रेमाचा हात ठेवला जात नाहीं, असें वाटून ताई जास्तच व्याकूळ झाली. ती तेथून जड पावलांनीं परत वळली. जातां जातां हुंदके देत कसेबसे मला उद्देशून कांहींतरी बोलली. कंठ दाटून आल्यानें तिचे शब्द स्पष्ट येत नव्हते. भांबावून गेल्यानें मला ते ऐकावयाला येत नव्हतें. तरीही “ बरं भाऊ ! मला तुझी फार आशा होती–पण आपल्या सुखापुढं तूं मला विसरलास–मला तुझ्याबद्दल असं कधीं वाटलं नव्हतं. भावांनीं बहिणींची काळजी अशीच घ्यावयाची असते कां रे !–बहीण जीवंत आहे कां मेली आहे ! सुखानें नांदते कां दुःखानें होरपळते आहे, याची चौकशीसुद्धां करायची बुद्धि इतके दिवसांत तुला झाली नाहीं ना ! तुझ्यासमोर येऊन उभी राहिलें तरी एका गोड शब्दाला सुद्धां महाग केलंस ना रे !–आपल्या धाकट्या भावाला निर्दयपणानें घराबाहेर घालविलेंस, त्याला अन्नाला मोताद करून देशोधडीला लावलंस, हें

कळलं, तेव्हांच तुझ्या स्वभावांत फरक झाला आहे, तूं आमचा लहान-पणींचा प्रेमळ पाठीराखा भाऊ राहिलेला नाहींस, हें मला समजायला पाहिजे होतं. पण वेडी मी ! आलें तुझ्याकडे ! पण आतां चांगलं कळून आलं ! तूं आपल्या भावाला बहिणीला पार विसरून गेला आहेस ! तुला आपल्या कर्तव्याची देखील जाणीव राहिलेली नाहीं. ईश्वराची इच्छा ! आले तशी जातें बरं. पुन्हां तुझ्या दारीं–तुझ्या प्रेमाची भिक्षा मागायला ही तुझी ताई कधींही येणार नाहीं बरं ! तुझी अभागी ताई जगांतून नाहींशी झाली—मेली असं मान आणि खुशाल आनंदांत रहा बरं कां !—" शब्द कानांत घुमत होते. ताई केव्हांच दिसेनाशी झाली होती ! आतां मनाला समाधान कुठलें !—माझ्या ताईनें माझी चांगलीच शोभा केली होती. तिच्या— माझ्या भावाच्या संबंधींचा माझा अपराध आपल्या काळीज पिळवटून काढलेल्या शब्दांनीं माझ्या पदरांत घातला होता.

ताईचे वाक्प्रहार मला असह्य झाले. आतांच्या आतां ताईच्या मागोमाग जावें व तिचे पाय धरून तिची क्षमा मागावी, पुन्हां माझ्या हातून असें होणार नाहीं, असें सांगावें, असें वाटलें, त्या भरांत मी पाय उचलला, तोंच कोणी तरी दणकटानें माझा हात पकडला आणि मला दरडावलें—

" अहो राजेश्री ! निघालांत कुठें ! थांबा अगोदर, अगोदर आपल्या पाजी वर्तनाचा जाब द्या. "

हात धरणाराकडे पाहिलें. तो माझा निःसीम देशभक्त असा एक मित्र होता. त्याची संतप्त मुद्रा, त्याचें दरडावणें, यामुळें माझ्या सर्वांगाला दरदरून घाम सुटला. नखशिखांत माझें शरीर चळचळ कांपूं लागलें. मी आ वासून त्याच्याकडे पाहूं लागलों. मी कांहीं बोलणार, तों तो मित्रच वीज कडाडल्याप्रमाणें कडाडला, " आमच्याशीं मैत्री करतां. आम्ही देशोद्धाराकरितां तनमनधन वेचतों, त्याला बाह्यात्कारी सहानुभूति दाखवतां आणि त्याच वेळीं स्वतःच्या क्षुद्र स्वार्थासाठीं अंतस्थपणानें सरकाराच्या अंतरंगांत शिरून सरकाराचे बगलबच्चे बनून–आमच्या खोट्यानाट्या चुगल्या सरकारांत सांगण्याचें नीच कृत्य करीत असतां काय ! आम्हांला

संकटांत घालतां ! आणि आपल्या सुखाची पोळी पिकवीत असतां अं ! मैत्रीला चांगलेच जागत असतां म्हणायचें ! आमच्यावर पाळत ठेवतां. कुणाच्या तरी फुसलावणीनें किंवा स्वतःची प्रतिष्ठा वाढावी म्हणून-आणि त्याच वेळीं आमच्यांतही आपला मान रहावा म्हणून बाह्यतः शहाजोग राहून वेळप्रसंगीं टोपण नांवानें आमच्यावर टीकांचा भडिमार करीत असतां नाहीं ! तुम्हांला काय वाटलें ! या आपल्या घाणेरड्या कृति आम्हांला समजल्या नाहींत ! इतके दिवस समजल्या नाहींत हें खरें. परंतु पाप कितीही सप्तपाताळांत लपवलेत तरी केव्हां ना केव्हां तरी तें वर येतच असतें. आपलें मित्रद्रोहाचें–देशद्रोहाचें पाप आम्हांला आतां पूर्णपणें कळलें आहे. आपलें अंतःकरण किती काळेबेरें आहे याचा उलगडा झाला आहे. तुमच्यासारख्या मित्रद्रोह्याची–देशद्रोह्याची यापुढें गय केली जाईल, अशी आपली कल्पना असेल, तर ती आपली साफ चूक आहे. ध्यानांत ठेवा, आम्हीं आपल्याला आतां पुरेपूर ओळखलें आहे. आमच्यांत आपल्याला इतउत्तर थारा नाहीं. आमच्या विरुद्ध आपल्याला कारवाईही करतां येणार नाहीं, याची खातरजमा असूं द्या. आपला साळसूदपणा आतां मातीला मिळाला आहे. तुम्ही तोंडानें आपले अपराध कबूल करा किंवा नका करूं ! आपलें उतरलेलें तोंड–काळवंडलेला चेहराच आपल्या पापी मनाची साक्ष देत आहे. तुमच्यांत जर थोडी माणुसकी असेल तर तुम्हीं आपलें मित्र-द्रोहाचें–देशद्रोहाचें पाप कबूल कराल–पापाचरणापासून परावृत्त व्हाल–पण छेः ! तुमच्या हातून तें होणें शक्य नाहीं. तुमचें मन पुरें निलाजरें–निगरगट्ट झालें आहे. पण एकदां आम्हीं तुम्हांला ओळखल्यावर तुमच्या-कडून आमचें रतिमात्र वांकडे होऊं देणार नाहींच–नाहीं. आतां जर कधीं काळीं तुमच्या वर्तनाची तुम्हांलाच शरम वाटली आणि—"

पण पुढें तो देशभक्त मित्र आणखी काय म्हणाला हें मला समजलेंच नाहीं. माझें मन गहिंवरून गेलें. बुद्धि शुद्धीवरच राहिली नाहीं. माझे त्या मित्रानें उच्चारलेले अपराध खरे होते–तें अक्राळविक्राळ स्वरूप धारण करून माझ्या दृष्टीपुढें थयथयाट करून मला एकसारखें भेवडावीत होतें.

ती वेळच वाईट होती. आयुष्यांतल्या माझ्या सर्व अपराधांची भुताषळ

एकाच वेळीं माझ्या सभोंवतीं जमून नाचावयाला आली होती कीं काय कोण जाणें !

कसाबसा मी भानावर येत होतों–इकडे तिकडे कुठें पळून जायला मार्ग आहे काय हें शोधूं पहात होतों, तोंच–आणखी एक व्यक्ति मला लगटून उभी आहे; माझ्या गळ्यांत आपला एक गोंडस हात घातला आहे. माझ्या छातीवर आपलें मस्तक टेंकलें आहे, दुसऱ्या नाजूक हातानें माझा एक हात पकडला आहे. लाडीक नजरेनें–मिस्किलपणानें माझ्याकडे पहात, दोन्हीं हातांतून सुटल्यामुळें वाऱ्यावर सुटलेला रेशमी साडीचा पदर माझ्या अंगाशीं फडफड करून खेळत आहे. केसांला लावलेल्या सुगंधी तेलाचा दरवळ नाकांत घुसून मनाला उन्माद आणीत आहे, मृदु अंग, कोमल स्पर्श लाडकें लाडकें पहाणें—गोडगोड गालांतल्या गालांत हंसणें—मी कुठें आहे ! काय परिस्थितींत आहे, काय करतों आहे, हें क्षणमात्र विसरलों. मी पहात राहिलों. ती एक माझी फार दिवसांची स्त्रीमित्र होती. किती तरी दिवसांनीं अशी अचानक मला येऊन भेटत होती. ही सुखाची शीग चढविण्याकरितां आली असावी, असें वाटलें. क्षणभरापूर्वींची तापद सृष्टि क्षणमात्रच विसरलों. मी तिच्याकडे आकर्षक दृष्टीनें पाहिलें, ओंठावर हंसूं येत आहे, इतक्यांत ती म्हणाली––

“ हें खोटं हंसणं, हें खोटं प्रेम समजतं बरं का मला !—मला इतकी भोळी कां समजतां ! किती दिवस कुठें दडी दिली होती ! घरीं येणं नाहीं, भेट नाहीं, गांठ नाहीं. माणसाला अगदीं विसरून जायचं हें तुम्हां पुरुषांना बरं साधतं नाहीं ! अगोदर नादीं लावायचं. तुझ्यावर माझं प्राणापलीकडे प्रेम आहे म्हणायचं. मी तुला घरीं नेईन. मी तुला सुन्दर टुमदार—छानदार बंगला बांधून देईन. तुझ्या नांवानं बँकेंत पैसा ठेवीन. तुझ्या नांवाची भरगच्च इस्टेट करून देईन. अशा वाटेल तशा थापा मारायच्या–आणि लहर फिरली कीं कुठें मध्येंच गुंगारा मारायचा तों पुन्हां कधीं फिरकायचंसुद्धां नाहीं. माणसाला अगदींच विसरून जायचं का ! मला का विसरायचं सांगावं बरं ! कुणा तरी दुसरीच्या नादीं लागल्याशिवाय मला विसरायला व्हायचं नाहीं, हें मी ओळखून आहे ! कोण ती दुसरी !

कुणी नादीं लावलं आहे ? माझ्याप्रमाणेंच त्या दुसरीला देखील अनेक लोणकढ्या दिल्या असतील. तीसुद्धां माझ्यासारखीच एक दिवस फशी पडणार आहे. होय ना ? मी आतां तुमच्याकडें शोध घेत आलें आहे. असं घट्ट धरून ठेवलं आहे. आतां आपल्याकडून मला वेळोवेळीं मिळालेलीं सारीं अभिवचनं पुरती करून घेतल्याशिवाय माझ्या हातून आपली सुटका व्हायची नाहीं. समजलं का ? तशी सोडणार नाहीं. आतांपर्यंत मी साधी-भोळी होतें. वचनावर विश्वास ठेवला. पण आतां तशी मी फसायची नाहीं. माझे अनेक अपराध आपण आजवर केले आहेत—होय ना ?—''

ही एक ब्यादच माझ्या मानगुटीवर बसली. प्रथम मला बरें वाटलें. पण तें खरें नव्हतें. माझ्या अपराधांची रास तिनें माझ्या माथ्यावर बसविली होती—आणि ती उतरणें—सहजासहजी उतरणें मला अशक्य होतें. हें पाप निस्तरावें कसें हें मला समजेना. गालावरची लज्जेची लाली, पान खाऊन लालभडक झालेलें तोंड, तो गोड मुरका, एरव्हीं मला कितीही आकर्षक वाटला, तरी आतां तें मला नको होतें-पण माझ्याकडून तोही अपराध झाला होता—त्या अपराधाची भरपाई—पण विचाराला वेळ कुठें होता—ती मला बोलूं कुठें देत होती—तिनें माझ्या हाताला घट्ट धरलें आणि " चला, मला तुमच्या घरीं यायचें आहे. तुमच्या घरीं रहाणार आहे मी '' असें म्हणत घरांत ओढीत नेऊं लागली ती. माझा अगदीं नाइलाज झाला. अगदीं अगतीक होऊन नाइलाजानें मी तिच्यासह घरांत जावयचें ठरविलें.

घरांत जाण्यासाठीं तोंड वळविलें तों अरे बापरे ! संतापानें फणफणलेली रागानें लालभडक झालेली, डोळयांतून आगीच्या ठिणग्या टाकणारी, मत्सरानें पेटलेली, वैतागानें जळफळणारी, गुरगुरणारी, चवताळलेली बाघीण, फणा काढून फूत्कार करणारी नागीण—जशी कांहीं; दोन्हीं हातांत दोन मुलांना घेऊन, कांखेला लुगड्याचा बोळा घेऊन, माझी अर्धांगी समोर !

तिला पाहून, मी दचकलों, शरमलों, भांबावलों. तिच्याकडे पाहण्याची मला छातीच होईना. एकाद्या घोर अपराध्याप्रमाणें—मी

तिचा मोठा अपराधीच होतों–खालीं मान घालून उभा राहिलों. जागच्या-जागींच खिळून गेलों.

महाकालीची शापवाणीच ऐकावी, तसे तिचे शब्द मला ऐकावयास येऊं लागले.

“ पतीधर्म–गृहस्थधर्म–संसाऱ्याचीं कर्मं चांगलीं आचरतां बरं. चांगलीं पाळतां ! आपल्याला घरदार आहे. बायकोमुलें आहेत. त्याची शुद्धि तरी आहे का जराशी ! बायकोला बघायचं नाहीं. मुलांना संभाळायचं नाहीं, घरांत तीं जेवलीं आहेत का उपाशीं मेलीं आहेत, त्यांच्या अंगावर चिरगुटें आहेत का नाहींत, हें कधीं पहायचं नाहीं. बायकोला घरीं धायधाय रडत बसवायचं, मुलांना अनाथासारखें शेजाऱ्यांच्या तोंडाकडे दीनवाणीनें पहावयाला लावायचं आणि आपण बरीक बाहेर, चारचौघांत, क्लबांत, नाचगाण्यांत, बाजारच्या सुखांत अष्टौप्रहर दंग असायचं. देशोद्धारावर, समाजोद्धारावर, लांबलचक कंठशोष करून कोरडीं व्याख्यानें द्यायचीं. नाहीं देव, नाहीं धर्म, नाहीं वडिलांच्याबद्दल कृतज्ञता, नाहीं भाऊ, नाहीं बहीण, नको बायको, नकोत मुलेंबाळं, नको संसारप्रपंच, कीं कांहीं नको ! मुलाबाळांना पोसायचं नव्हतं, त्यांच्या संगोपनाकडे, शिक्षणाकडे लक्ष द्यायचं नव्हतं–तर त्यांना जन्माला तरी कशाला घातलंत ! झाली इतकी विटंबना पुष्कळ झाली. निघाले इतके धिंडवडे पुरे झाले. सण नाहीं वार नाहीं, विचारणं नाहीं, पुसणं नाहीं, वैतागलें मी. हें सहन होत नाहीं. घ्या आपलं घर. रहा कुणालाही घेऊन. मी माझ्या लेकरांना घेऊन जगांत कुठेंही भीक मागत हिंडतें मी. मग होईल तुमच्या मनाजोगतं !”

असें म्हणत, दणदण पाय आपटीत मुलांना रट्ट्याला धरून ओढीत अर्धांगी बाहेर जाऊं लागली. मुलें माझ्याकडे ओढ घेऊं लागलीं. रडूं लागलीं. माझ्या अपराधांना सीमा राहिली नाहीं. मला असह्य झाले माझे अपराध—अक्षम्य अपराध–एक का दोन ! गणनाच करवेना. त्यांतल्या एकेक अपराधानें माझी नरकांत भरती व्हायची. तो इतके डोंगराएवढे अपराध माझ्या माथ्यावर ! मी हैराण झालों. आतां माझी गत काय ! एकेक अपराध माझ्यावर चाल करून येऊं लागला. माझे हालहाल करूं

लागला. जीव नको नकोसा करूं लागला मी त्यांच्या तावडीतून निसटण्याचा आटोकाट प्रयत्न करूं लागलों—तर त्यांतच मला ओढ लागूं लागली. माझा जीव गुदमरूं लागला. किंचाळावें असें वाटूं लागलें. शरीराची आणि जीवाची एकसारखी धडपड होऊं लागली—

इतक्यांत मी झोपेंतून जागा झालों. मुलें अंगावर लोळत होतीं. मला जागें करीत होतीं. “ आज पाडवा आहे ना ! आपल्या घरांत गुढी उभारायची आहे. बाबा, माझी जरीची टोपी गुढीवर ठेवा बरं कां ” असें मुलगा म्हणत होता. तर “ नाहीं जा. माझा जरीचा परकर गुढीला लावायचा, बरं काहो बाबा ! ” म्हणून माझी चिमुरडी पोर कानाजवळ तोंड आणून हळूंच सांगत होती. हात पुशीत, हंसत सौभाग्यवतीहि मंजुळ आवाजांत बोलत होती, “ हें काय हें ! किती झोंप ही ! पाडवा नाहीं कां आज ! एरव्हीं आहेच. पण आज तरी लवकर उठायचं नाहीं कां ! मुलें जागीं करताहेत, तरी आपली झोंप चाललीच आहे. बाजारांत जायचं बरं अगोदर ! ”

मी डोळे उघडून पाहिलें. जरा माझें मलाच हंसूं आलें. चमत्कारिक नजरेनें सौभाग्यवतीकडे मुलांकडे पाहिलें. हंसूंही आलें आणि चमत्कारिकच वाटलें !

स्वप्नातल्या सर्वच अपराधांचा कांहीं मी अजून कर्ता नव्हतों. पण कदाचित् पुष्कळसे अपराध होण्याचा संभव नव्हता असें मात्र नव्हे ! असें मनांत आलें—हायसें वाटलें. अनंत काळरूपी परमेश्वराला वंदन करून सद्बुद्धी जागृत केली, तर—अनेक अपराधांचा धनी मी खास होणार नाहीं, याची खात्री पटली व त्यासरशी पाडव्याचा सण मुलांबाळांसह साजरा करण्याकरितां लगबगीनें उठलों. मनाला बरें वाटलें !

यत् कृतं यत्करिष्यामि तत्सर्वं न मया कृतम्
त्वयाकृतं तु फलभुक् त्वमेव मधुसूदन ॥

समाप्त